तरुण साहित्य-३

# विवाहानंतर-


लेखक :

प. स. देसाई



महाराष्ट्र ग्रंथ भांडार-कोल्हापूर.

एप्रिल १९३९] [किंमत १॥ रु.

# —प्रेमसुनीत—

—प्रेमा आणि हेमा म्हणजे एकाच देठाला आलेली दोंन फुलें! त्या बहिणी बहिणी होत्या आणि मैत्रिणीही होत्या.

—लहानपणचा काल कसाही गेला असला तरी तारुण्यात त्यानीं स्वातंत्र्याचा उपयोग करून घेण्याला कमी केले नव्हते. त्यानीं नियंत्रण मानले नाही आणि अनियत्रित स्वातत्र्याचा जाणून बुजून दुरुपयोगही केला नाही. निदान प्रेमा तरी या बाबतींत निष्कलक राहिली.

—कारण प्रेमाने आपला शिक्षणक्रम झपाट्याने चालविला; पण हेमाला तो तसा चालविता आला नाहीं. विभिन्न स्वभावधर्मामुळे व प्रकृतीमुळे विभिन्न जीव एकाच जीवनप्रणालीतून जाणे अशक्य आहे.

—तारुण्यसुलभ मनोविकाराना अजाणतेपणामुळे–अदूरदर्शित्वामुळे हेमा थोडीशी बळी पडली. मात्र शिक्षणाचा व पूर्वसुकृताचा सस्कार चागला असल्यामुळे तिचा पुरा अधःपात झाला नाहीं. वेळीच प्रेमाने तिला हात दिला. आपल्या हातची काठी ऐनवेळी तिने तिच्या हातीं दिली. हेमा सावरली, फुशारली आणि मळलेले कपडे साफसूफ करून मी त्या गावचीच नव्हे असे भासविण्यात गढून गेली.

—प्रेमा शात, प्रेमळ आणि विचारी होती, पण हेमा उतावीळ, काहींशी उच्छृखल आणि हटवादी होती.

—मात्र दोघीचेही अन्तःकरण गगाजलाप्रमाणे निर्मळ होते. आणि ते तसे सर्वांचेच असतेही. विकाराचा आणि स्वातन्त्र्यसुलभ अविचाराचा थोडा अतिरेक झाला तर ते गगाजल गढूळ होते. नकळत पाऊल घसरते.

—पण तसेच ते घसरत जावे असा काही नियम नाहीं. आपण घसरत आहों असे जाणवताच मनात असेल तर सावरता येते. इच्छा असेल तर मदत मिळते. कारण निर्मळ पाण्याचा जोरदार प्रवाह मिसळला तर गढूळ पाणी पुनः निर्मळ होते.

—मिळालेल्या शिक्षणाचा इतका उपयोग करून घेतला नाहीं तर ते शिक्षण कसले आणि वयाच्या मानाने आलेला समजसपणा तरी कसला?

❧ ❧ ❧ ❧ ❧

—पुनीत आणि सुनीत दोघेही मित्र. दोघेही तरुण. दोघेही चाग शिकलेले, पण एकाचे शास्त्रीय शोधाकडे–केमिस्ट्रीकडे–लक्ष तर दुसऱ्याचा ललितकलाकडे ओढा. दोघेही प्रेमळ, दोघाचीही अन्तःकरणे उदात्त, दोघेही निरोगी आणि दोघानाही शरीरसामर्थ्याची भरपूर देणगी मिळालेली. दिसण्यात सुदर, बोलण्यात गोड, अन्तःकरणे भावनामय आणि एकमेकाबद्दल अत्यत प्रेम. आदरयुक्त जिव्हाळा, पण दोघाच्या वागणुकींत अत्यत फरक!

—एक पुस्तकातील किडा, केमिस्ट्रीचा आराखडा तर दुसरा बाह्य जगातील वेडा! तारुण्यसुलभ बेफिकीरी, श्रीमतीची बेदरकारी आणि निरकुशतेची अनावर वजिरी!!

—पुनीत आपल्या केमिस्ट्रीच्या एकाच खोलीत कोडून घेणारा तर सुनीत मन मानेल तसा बाह्य जगात भटकणारा; पण एकमेकाना सावरण्यात आवरण्यात दोघेही दक्ष. एकमेकाबद्दल एकमेकाचीं अन्तःकरणे पराकाष्ठेची शुद्ध.

—एकाच उच डहाळीला लटकलेली दोन सुदर फळे. जगाने कितीही टवकारून पाहिले तरी त्याचा हात पोचणे अशक्य.

—पुनीत आवरणारा तर सुनीत ओढ घेणारा. एक शिव तर दुसरा जीव. प्रवाहात वाहात जाण्याची एकाला आवड तर तीरावरून प्रवाहाची मौज पहाण्यातच दुसरा कृतकृत्य! मात्र सुनीत वाहू लागला तर त्याला त्यातून बाहेर ओढून आणण्यात पुनीत दक्ष.

❧ ❧ ❧ ❧ ❧

—पण हे दोघेही एकमेकाना नकळत प्रेमा आणि हेमाकडे पहात चाललेले. प्रेमाने सुनीतकडची नजर काढून पुनीतकडे आधी पाहिले, पण हेमा मात्र नतर त्याच्याकडे पाहूनही पुनीत झाली. सुनीतचा हात धरता धरता हेमाला पुनीत सापडला. मैत्रिणीचे हित तेच आपले हित, पुनीत सुखी तर आपण सुखी असे मानणारी प्रेमा, हेमा–पुनीत मीलनाने प्रथम

दुःखित झाली, तरी अन्तःकरणाच्या उदात्ततेमुळे मत्सरी बनली नाहीं. विधि लेख तसा होता. त्यात तिचा काय दोष!' असे म्हणून पुनीतला आनंद वाटावा या आतरिक इच्छेने तिने हेमाला मगलाशीर्वाद दिला.

—हेमा फुशारली आणि खुललीही. प्रेमाचा आत्मत्याग तिला जाणवलासुद्धा नाही. पुनीत मुग्ध झाला. सुनीत खेदावला, पण त्याने आपण त्या गावचेच नाही असे दाखविले आणि उसळी मारून तो प्रवाहात वाहात चालला.

—प्रेमात वत्सला आणि कळवळा असल्यामुळे तिचे त्याच्याकडे लक्ष गेले. ती कळवळली आणि विनीतच्या स्वार्थी उच्छृखल भोवऱ्यातून वाचविण्यासाठी ती पुढे सरली.

—हेमाला आपल्या सुखसौभाग्याचा अभिमान वाटला. ती लहान असून तेवढ्याच भाग्याने थोर बनली. आणि प्रेमा वास्तविक थोर असून प्रम, करुणा, माया, दया, वात्सल्य, त्याग, वगैरे देवतासदृश भावनाच्या भोवऱ्यात सापडल्यामुळे व्यवहारी जगाच्या दृष्टीने लहान बनली.

—पुनीत हातचा गेला, हुकमाच्या पानाने दगा दिला म्हणून तिला वाईट वाटले नाहीं असे नाहीं, पण हेमाचा तिने हेवा केला नाही. आपला पुनीत सुखावला, यातच तिने आनद मानला आणि हुकुमाचीं पाने सपल्यावर राहिलेल्या एकतर्फी रगातच आपण डाव जिकू, अशी तिने पक्क्या खेळाडूप्रमाणे खूणगाठ मारली. वाहात जाणाऱ्या सुनीतला सावरण्याचे मिष करून तिने आपले मनोविकार आवरले.

—पण या खेळाचा परिणाम पुढे काय झाला, वाहणारा सुनीत कुठे गेला, त्याच्या जीवनाचा अत करणारा विनीतचा भोवरा त्यानें सहजगत्या कसा चुकविला, दैवी घटनेने प्रेमाचे साहाय्य त्याला कसे मिळाले, हेमाने निष्कारण निर्माण केलेला खळबळाट आणि गढूळपणा कसा नाहींसा झाला हे कळल्यावाचून या प्रेमसुनीताची परिसमाप्ति कशी व्हायची?

—म्हणूनच विवाहानतरचे शब्दचित्र रगविण्याची आवश्यकता. आणि हे चित्र रगदार सजावटीने आकर्षक झाले आहे कीं नाहीं हे जाणण्याचे काम रसिकाचे!!

———

# विवाहानंतर-

## : १ : नव्या संसाराची तयारी!

हेमा आता गृहस्वामिनी झाली. प्रेमापेक्षा वयानें लहान असूनहि सौभाग्यवतीच्या पोक्तपणानें कुमारी प्रेमाकडे ती पाहूं लागली. कर्त्या स्त्रीच्या आविर्भावानें प्रेमाच्या सुखदुःखाचा विचार करण्याचा आपणाला हक्क आहे असें तिला वाटूं लागलें.

हेमाच्या या मानीव मोठेपणाचें प्रेमाला कौतुक वाटल्यामुळें वेळोवेळीं तिच्याकडून मिळणारे उपदेशाचे डोस ती कुतूहलानें प्राशन करूं लागली.

एकदा अशीच ती हेमाला भेटण्यासाठी तिच्या सौधस्वरूप बंगल्यावर आली असतां हेमानें तिला विचारलें, 'आतां पुढें ग?'

'म्हणजे? याचा अर्थ काय?' प्रेमानें हसत हसत आपल्या सहोदर-तुल्य मैत्रिणीकडे पाहून प्रश्न केला.

'अगदीं लहानच कीं नाहीं! अग, माझ्या विचारण्याचा अर्थ असा, तूं आतां पुढें काय करणार?' मोठेपणाच्या अविर्भावानें डोळे मोठे करून प्रेमाकडे पहात हेमानें खुलासा केला.

'वाः काय करणार म्हणजे? बी. एस्सी. झालेच आहे एम्. एस्सी. चा अभ्यास करीत आहे! फावल्या वेळांत 'विरलेली,' 'विखुरलेली' पुस्तकें वाचून करमणूक चालली आहे. आणखी ग काय करायचं?' आळसावलेल्या स्वरानें प्रेमा बोलत असली तरी तिचे मिस्किलपणानें हेमा-कडे पाहणारे डोळे अद्याप प्रश्नचिन्हांकितच होते. कारण हेमाच्या मनांत

निराळेच कसले तरी विचार घोळत असल्याचे प्रेमाने तिच्या तरळत्या नजरेवरून जाणले होते.

' पुढे एकादी लॅबोरेटरी काढशील अगर प्रोफेसर होशील. ते नाहीं मी विचारले, तू आता लग्न करणार की नाहीं? तुला आता लग्न केलच पाहिजे. !'

' स्वतःला लग्नातील गोडी कळल्यामुळे इतरानाही आपले अनुयायी करावे अस तुला वाटू लागल आहे म्हणायच! मिळालेला अमृततुल्य घास एकट्यान खाऊन आगाला लागत नाही वाटत!'

' तू माझ बोलण अस थट्टेवारी नेऊ नको गडे! मी काही तस थट्टेन नाही विचारीत. स्वतःचा काही ससार असायला नको का?'

अगदी भलतीच पोक्त झालीस बर का तू हेमा! हे सगळ माझ चौवीस वर्षाच वय. अग, आणखी दहा पधरा वर्षं जाऊ देत, डोळे मिटण्याची पाळी येऊ दे, म्हणजे मग त्या वेळी मुलाबाळाचा ससार पहायचा!'

' अग पण मुलबाळ काही आपोआप होत नसतात! लग्न हे केलच पाहिजे.'

यावर प्रेमा हसून म्हणाली, ' होईल झाल तर लग्न! नाही तर अशीच होतील मुल!'

प्रेमाच्या फुगीर गालावर हळूच एक टिचकी मारून हेमा म्हणाली, ' ही कसली मेली थट्टा! सरळ साग बघू. तू आपल्या लग्नाची काय व्यवस्था करणार?'

' हे पुरुषी चाळे बर.'

' आणि तू मात्र मघा बोललीस ते बायकासारख? तू उगाच भलती-कडे बोलण फिरवू नको. माझ्या प्रश्नाच आधीं उत्तर दे.'

' काय पण घटकेत ' सिरीअस ' होतेस! अग, मुलींना स्वतःच लग्न स्वतःच ठरविता येतं वाटतं? मला बाई बोलायलाही लाज वाटते!' बोलता बोलता प्रेमाने लाजल्याचे ढोंग करून खालीं मान घातली.

' अहाहा! काय लाजरी वेल सजली आहे पण! जाऊ द्या. एवढीच

काळजी ना ? ती सगळी व्यवस्था मी करते. तुझं मत काय आहे, एव- ढच विचारण्यासाठीं मी तुला हा प्रश्न केला. तुला शोभेल असा वर आज माझ्या हातात आहे !'

'छे: तुझ्या बोलण्यावर विश्वास कुणी ठेवावा ? तू एकदा अशीच चांगली तयारी केली होतीस, मीही मोठ्या आशेने तिकडे डोळे लावून बसले होते. मला वाटलं, आता माझं लग्न झालंच, पण प्रत्यक्ष अनुभव निराळाच आला! तूच आपलं त्याच्याशी लग्न लावून बसलीस!! आता नाही ग बाई तुझ्या असल्या या बोलण्यानं मी फसायची!'

हेमा काहीशा खिन्न चेहेऱ्याने एक सुस्कारा सोडून म्हणाली, 'मला माहीत असतं तर असं केलं नसतं बाई मी! तुला दुःखात ठेवून मला हे सुखोपभोग गोड वाटतात अशी का तुझी समजूत आहे? माझ्या अंतः- करणात काय होतं ते माझं मलाच माहीत? —'

बोलता बोलता हेमाचे डोळे अश्रूंनी भरून आले

प्रेमा हसून म्हणाली, 'काय बाई तरी! एवढीशी थट्टा केली तर तीही तुला कळू नये? चल वेधळी कुठची! एवढंसं तोंड करून बसा- यला मी काय खरोखरच तसं म्हटलं तुला?'

'तू कशाला म्हणशील? मला काय कळत नाही! खरीच गोष्ट आहे ती!! आणि म्हणूनच तो प्रसंग आठवला की तुझी ही अवस्था पाहून मला रडू येतं. मला जर हे सौभाग्य लाभलं नसतं आणि खरोखर त्या- च्याशी तुझं लग्न झालं असतं, तर दुःखातिरेकानं छाती फुटून मी मेलें असते! आजही तुझ्याकडे पाहून मला ते दुःख जाणवत आहे, आणि अन्तःकरणही विदीर्ण होत आहे, पण तुझं हे हसतमुख पाहून मी या लग्नाच्या बाबतीत तुझ्या अन्तःकरणाला केवढी जखम केली आहे हे काय मला कळत नाही? प्रेमाताई, खरोखर तू शापभ्रष्ट देवता आहेस, म्हणू- नच हे दुःखरूपी हलाहल पचवून माझ्याशीं हसतमुखानं बोलतेस आणि माझ्यावर प्रेम करतेस. मला हे शक्य झालं नसतं.'—

प्रेमा हसली, आणि हा दुःखदायक विषय बदलावा या हेतूनें मध्येंच म्हणाली, 'ते असू द्या, पण माझ्यासाठीं कोणता वर पाहिला आहेस तें

तरी सांग. हो. म्हणजे मग त्या दृष्टीने विचार करायला ठीक होईल.'

पदराने डोळे पुसून किंचित् हसऱ्या चेहेऱ्याने हेमा म्हणाली, ' मी सांगत होते तो माझा दीरच आहे. त्याचा तो आतेभाऊ. मुलगा चांगला आहे. शिवाय श्रीमंत आणि नामांकित घराणें— '

' हं आता मला तुझा मतलब समजला. आपल्या एका दिराशीं माझं लग्न लावून देऊन स्वतः वडील जाऊ होण्याचा हा तुझा प्रयत्न आहे. छे. ते नाही जमायचं ! मी माझ्या वयाच्या मानानं मोठीच राहाणार. दीरबीर नको बाई सांगू. वडीलकीचा मान मला पाहिजे. '

' तुझी आपली सगळीच थट्टा ! अग, मी खरंच सांगते, आमच्या सासुबाईना फारच आवडली आहेस तू. तुझी संमती मिळाली तर त्या अगदी फारच खूष होतील. भाऊजींना कबूल करावयाला लावण्याचं माझ्याकडे लागलं. '

' तू तेवढं काम करू शकशील बाई ! या देशातील बायकाच जर लग्न जुळविण्याचं काम करू लागल्या, तर एकाही मुलीला त्या अविवाहित ठेवणार नाहीत ! '

' पण माझ्या या योजनेला तुझी मान्यता आहे ना ? बोल की—'

' अहं, दीर नको. तुझ्या दिराशी मी लग्न करणार नाही. तुझी सासू होण्याची काहीं शक्कल निघत असेल तर पहा. कोणी तरी तसा नातेवाईक शोधून काढ. मग तो बिजवर का असे ना ! चालेल. '

' ही थट्टा नव्हे बरं प्रेमा. जशी मला तू त्याच्या हातात दिलीस, तशीच मीही तुला आता माझ्या दिराच्या हाती सोपविणार. पाहू मला कोण अडविते ते. आणि याचा आता समक्षच काय तो उलगडा होईल. एकदा त्याला पाहिलस कीं तू आपण होऊन होय म्हणशील—'

प्रेमा मध्येच म्हणाली, ' अगबाई, म्हणतेस काय तू ? ते आताच इथं येणार आहेत कीं काय ? मी पळूनच जाते मुळीं इथून '

हेमा तिचा हात धरून आग्रहाने म्हणाली, ' तसं करायचं नाहीं. त्यांना भेटल्यावाचून तुला जाता कामा नये. भाऊजींना बोलवायलाच जाणं झालं आहे. इतकंच नव्हे तर तुला ' दाखवायची ' असं सांगूनच

ते त्याना आणणार. तेव्हा अस आता पळून जाऊन कस चालेल ?"

प्रेमा काहीशी गभीर होऊन म्हणाली, 'म्हणजे? तुम्ही दोघानीं माझ्या विरुद्ध हा एक कटच केला आहे म्हणायचा ? वाः फार चागल केल!'

"अशी रागावू नको बघ. तस पाहिल तर यात माझा अपराध काहींच नाही. भाऊजीना तुझ नाव त्यानींच सागितल. तुझी प्रशंसा करताना त्याची शब्दगगा कशी धो धो वहाते हे तुला माहीत आहेच! मग आता माझ्याकडे काय आहे साग पाहू. भाऊजी म्हणाले, बरं तर पाहूया! या सगळया त्याच्या आपसातल्या गोष्टी. त्यानी ठरविल. मी फक्त त्याच्या हुकमाची ताबेदार. सागितल्याप्रमाण तुला इथ हजर ठेवण एवढच माझ काम—"

हेमाचे हे खुलाशाचे आणि स्पष्ट बोलणे ऐकून प्रेमाचा विनोदपूर्ण चेहरा एकदम पालटला. आतापर्यंत तिला सगळी थट्टाच वाटत होती; पण हेमाच्या सागण्यावरून यात बरेच तथ्य असावे असे तिला वाटलें आणि तिचा चेहरा भयग्रस्त झाला. आपल्याला न विचारता न सागता या मडळीने इतका हा उपद्व्याप करावा याचा तिला विषादही वाटला. रागावता येत नाही, टाळून जाववत नाही आणि मान्य करवत नाहीं अशा बिकट परिस्थितीत सापडल्यासारखी होऊन दुःखपूर्ण स्वराने प्रेमा म्हणाली, 'का बर तुम्ही अस केल? मी लग्न करणार नाही हे तुला माहीत आहे ना? बर माझा विचार तरी घ्यायचा?'

हेमा काहीशा खिन्न स्वराने, 'तर माझ्या पापाच प्रायश्चित तू मला केव्हाच घऊ देणार नाहींस! तुझ हे एकाकी नीरस जीवन—' बोलता बोलता हेमाला गहिवर आला.

प्रेमाने तिला जवळ घेऊन तोडावरून हात फिरवीत म्हटले, 'तू काहींच पाप केलेल नाहींस, मग प्रायश्चित तरी कसल घ्यायच? उगाच झाल्या गेल्या गोष्टीचा विचार करून तू मनाला लावून घेतेस! माझ्या मनातही जी गोष्ट कधी येत नाही त्याबद्दल तू खत बाळगतेस. काय म्हणाव तुला? खरच तू अगदीं चुकते आहेस. तुझ्या सुखाचा मी हेवा करीन अस तुला वाटल तरी कस? तू माझ्या जिवाभावाची

मैत्रीण. मला आवडलेला नवरा तुला मिळाला, तुमच दोघाच चागलं झालं याबद्दल मला का बरं वाईट वाटेल? तुम्हीं दोघही मला प्रियच आहा. ईश्वरी नेमानेमाप्रमाण सर्व गोष्टी होत असतात! मी इतकी स्वार्थी असतें, तीच गोष्ट मनाला लावून घेतली असती तर पहिल्या नबऱ्चे मार्क घेऊन मला बी. एस्सी. होता आलच नसत. तूं मला परकी का आहेस! तुझं हित तेच माझ हित असं मी आजवर मानल आणि पुढही तसंच मानीत आहे. मग उगाच का बर त्या गोष्टी आठवून तूं दुःखी होतेस? इतराच्या सुखान सुखी होणारीं काही माणस असतात, असं नाहीं तुला वाटत? सगळ जग स्वार्थान भरलेल असत तर ते कधीच इतक रमणीय वाटल नसत--'

हेमाचें लग्न होऊन तीन वर्षं झालीं होतीं. प्रेमा आणि हेमा याचे हें तीन वर्षानतरचे बोलणे आहे. पुनीत हा प्रेमाचा आवडता तरुण; पण हेमाला तो हवासा वाटला. तिला दुःखी ठेवणे प्रेमाला योग्य वाटले नाहीं आणि तिने मैत्रिणीसाठीं जबरदस्त त्याग स्वीकारून तिला तो अर्पण केला. हेमाच्या मनाला टोचणारी गोष्ट ती हीच. आणि त्यासाठीं प्रेमाच्या लग्नाची तिला काळजी!

---

## : २ :

## : याला म्हणतात दैवयोग !

आता तीन वर्षांनतरची हकीगत सागण्यापूर्वी त्याच्या कौटुंबिक व्यवस्थेबद्दल दोन शब्द सागणे अगत्याचे आहे.

हेमाच्या वडिलाचे नाव काचनराव. प्रेमा ही त्याच्या मेहुणीची मुलगी. दोघींनाही ते आवळयाजावळया मुलीप्रमाणे मानीत. प्रेमाचे वडील नव्हते आणि हेमाची आई नव्हती. आईवेगळी मुलगी म्हणन काचनरावाचे हेमावर जितके उत्कट प्रेम होते, तितकेच बापावेगळी मुलगी म्हणून प्रेमावरही होते. आजवर त्या दोघीही एका देठाला आलेलीं दोन फुलेच होतीं. दोघीही एकत्र वाढल्या, एकेच ठिकाणीं शिकल्या आणि एकेच ठिकाणीं त्यानीं हितगुजाच्या गोष्टी सागितल्या.

तसे म्हटले तर प्रेमा काही गरीब नव्हती. प्रेमाची आई सावित्री ही मोठी श्रीमतीण नसली तरी तिचे घरदार, सावसावकारी आणि बॅंकेत बराचसा पैसाही होता. तरीपण हेमाचे वडील हे तिला परकेपणानें वागवीत नसल्यामुळें आणि त्या दोन्हीं मुलीची एकमेकावर माया असल्यामुळें ती दोघींची आई व ते दोघींचे वडील अशाच तऱ्हेने त्यानीं मुलाचे सगोपन चालविले होतें.

काचनराव हे स्वतः उद्योगधदेवाले असून, त्यानीं जमीन–जुमलाही बराच खरेदी केला होता. त्याचीं तीन चार घरेंही होतीं; पण धद्यात बूड आल्यामुळें थोडासा जमीन जुमला विकून त्याना कर्ज वारावे लागलें. त्यात प्रेमाच्या आईचा जमीन जुमलाही त्याच्या उपयोगी पडला. अर्थात् प्रेमा आणि हेमा या दोघींची पुढे चागली व्यवस्था राहील, अन्नवस्त्राची त्याना वाण पडणार नाहीं, अशा तऱ्हेची व्यवस्था करणे, त्याना जरूरीचें वाटल्यामुळे त्यानीं मृत्युपत्रही करून टाकलें आणि हेमाचे ज्यावेळीं लग्न झालें, त्यावेळीं हेमाचा नवरा पुनीत याच्यासाठीं त्याना बराच खर्चही करावा लागला; कारण पुनीतचे वडील वारले त्यावेळीं त्यानीं बरेंच देणें

करून ठेवले होते. पुनीत हा व्यवहारांत अगदींच वेडा असल्यामुळे शिक्षण आणि रसायनविद्या याखेरीज त्याने कशाकडेही लक्ष दिले नाहीं. प्रेमा आणि हेमा या कॉलेजात असताना प्रेमाचा ओढा रसायनविद्या शिकण्याकडे फार असल्यामुळे तिची पुनीतशी जास्त मैत्री जमली. तो एम्. एस्सी. होता तर तिने बी. एससी. चा कोर्स घेतला होता. अर्थात् हेमा वेगळी पडली आणि पुनीतचा मित्र सुनीत हा शिक्षणापेक्षा फॅशन विलासातच जास्त दग असल्याचे पाहून हेमाने त्याच्याशी मैत्री जोडली. दोघाचेही शिक्षणाकडे असावे तसे लक्ष नव्हते. तरी पण चौघेही कॉलेजात जातच होती.

पुनीतच्या शिक्षणाच्या वेडामुळे घरचे त्याचे लक्ष अगदीच उडाले होतें आणि तितक्यात धद्यात ठोकर बसल्यामुळे त्याचे वडील त्या धक्क्यानें मृत्यु पावले. अर्थात् स्नेही या नात्याने काचनरावाना पुनीतच्या व्यव हाराकडे पहाणे माग पडले.

अशा स्थितीत हेमाच्या सुनीतशीं जडलेल्या मैत्रींत अतिशय निकट सहवासामुळे असो अगर अन्य काही कारणामुळे असो,—वैगुण्य दिसू लागले. तशात वडील वारल्यामुळे पुनीत हवालदील झाला आणि शिक्षणाकडचेही त्याचे लक्ष उडाले. काचनरावाच्या घरी व्यवहाराचे सगळे कागदपत्र दाखविण्यासाठी आणि सावसावकाराचे देणे भागविण्यासाठीं त्याला वरचेवर जाणे भाग पडे. सुनीतला कटाळल्यामुळे हेमाचे वावटळींत सापडलेले मन कुठे तरी स्थिर होण्यासाठी जागा पहातच होते, तोंच पुनीत तिच्या नजरेला पडला. अगोदरची ओळख, कॉलेजातील सहवास, चौघाचेही एकत्र बोलणे चालणे आणि प्रेमाचा अतरग—मित्र म्हणून थोडीशी मनाची ओढ यामुळे पुनीत हा हेमाला परिचित होताच. अर्थात् सुनीतबद्दल थोडासा तिटकारा मनात येताच उतावळ्या मनाची हेमा चट्कन् पुनीतकडे वळली. आपल्या प्रेमळ बहिणीचा तो मानलेला प्रियकर आहे आणि सुनीतची निवड आपणहून केलेली आहे, असे असता पुनीतबद्दल जास्त आपलेपणा बाळगणे योग्य नाही असे समजत असूनही मनाच्या दुर्बलतेमुळे तिला ते उमजले नाही. इतकेच नव्हे तर ‘ केले तर पुनी-

तशींच मी लग्न करीन ' असेही बोलतां बोलता ती प्रेमाकडे म्हणाली आणि वडिलानाही तिने तसे स्पष्ट सागितले. वडिलाना ते गैर वाटले नाहीं. हेमाला आपल्या मित्राचा मुलगा आवडला हे एकपरी त्याना बरेच वाटले. त्यानीं त्याचे कर्ज वगैरे निवारण करण्यात आपले २५–३० हजार रुपये खर्च केले आणि हेमाचे पुनीतशीं लग्नही लावून टाकले.

झाला हा प्रकार बरा झाला की वाईट झाला याचा दोघापैकीं कोणीच विचार केला नाही. पुनीत, सुनीत, प्रेमा आणि हेमा ही चौघे एकत्र वागणारीं, एकत्र कॉलेजात जाणारीं, आणि मनाने एकमेकाचीं बनलेली अशीं असल्यामुळे काचनरावाना आपण काही गैर केले असे वाटले नाही ते बरोबर; पण सुनीत आणि प्रेमा ही दोघे या बाबतीत विलक्षण परिस्थितीत सापडलीं. सुनीतला वाटे 'हेमा आपली आहे' आणि प्रेमाला वाटे 'पुनीत आपला आहे'. पण पुनीत हा भावनाप्रधान नसल्यामुळे 'प्रेमाचा आपल्याशीं येणारा सबध केवळ समानशील आणि शिक्षणाचे व्यसन यामुळेच असला पाहिजे, इतर कोणत्याही नाजुक भावना त्यात नसाव्यात' अशी त्याची समजूत होती. 'प्रेमा आपली सहधर्मिणी झाल्यास ते गैर आहे' असे जरी त्याला वाटत नव्हते तरी उत्कट प्रेमाचे खेळ कसे असतात हे तो जाणत नव्हता. प्रेमालाहि ही त्याची मनःस्थिति माहीत असल्यामुळे तिने त्याला तसे जाणविले नाही; पण 'हेमाचा ओढा जर सुनीतकडे आहे तर हेमाच्या बाबतीत निश्चित रहाण्याला हरकत नाहीं. अर्थात् पुनीत हा माझाच आहे' अशी तिची दृढभावना असल्यामुळे आणि ती स्वतः मनाची खबीर असल्यामुळे तिने प्रेमाविष्करणाचा उतावीळपणा केला नाहीं. अर्थात् पुनीतला तिचे मन जाणता आलें नाहीं. सुनीतचीही तशीच अवस्था झाली. 'हेमा आपली आहे' या धोरणाने वागून तिच्यासाठीं त्याने निरनिराळ्या रगाढगात कितीतरी पैसा उधळला. 'आपले एक प्रकारे लग्न झालेच आहे' असे त्याने मानले. इतराचीहि तशीच भावना झाली. अशा स्थितींत 'काचनरावाना ती गोष्ट सागितलीच पाहिजे,' असे त्याला वाटले नाहीं.

प्रेमा आणि सुनीत याना या लग्नामुळें जबरदस्त धक्का बसला; पण

प्रेमा ही धीरगभीर स्वभावाची आणि सबल मनाची असल्यामुळें तिनें इतर कोणाला नाहींच; पण आपल्या आईलासुद्धा आपल्या मनावर झालेला परिणाम जाणवू दिला नाहीं. सुनीतचे तसे झाले नाहीं. तो वेडा बनला, त्यानें कॉलेज सोडले आणि मन मानेल तसे वागून विलासात आणि कर्जात तो आकण्ठ बुडत चालला. हेमाला सर्व गोष्टी कळत होत्या; पण मुद्दाम ती मुग्ध राहिली. पुनीतला तिनें काहीहि जाणवू दिले नाहीं. प्रेमाला थोडासा हेवा वाटला, पण आपली बहीण सुखी झाली, तिचा चागला ससार थाटला, आपल्या आवडत्या पुनीतचेही कल्याण झालें, या उच्च भावनेनें तिनें आपल्या मनाला आवर घालून शिक्षणाकडेच सर्व लक्ष वळविले.

काचनराव हे स्वतः स्त्रीस्वातंत्र्याचे भोक्ते असल्यामुळे हेमाच्या लग्ना बरोबरच प्रेमाचें लग्न करावे आणि एका जबाबदारींतून मोकळे व्हावें, असे जरी त्याना वाटले तरी तो प्रश्न त्यानीं तिच्या इच्छेवर सोपविला असल्यामुळे; प्रेमाच आपण होऊन आपली निवड करील अगर आपल्या आईमार्फत कळवील या भरवशावर ते राहिले. ‘ शिकलेल्या मुलामुलींची लग्नें शक्य तो त्याच्या तत्राने करावीं, आपण त्यात खर्च करण्यापलीकडे भाग घेऊ नये ’ असे त्याचे मत होते. परिणामाची जबाबदारी ज्याची त्याने पत्करली म्हणजे अगतिकत्व येत नाही असे ते बोलून दाखवीत असत. तरी पण हेमाच्या लग्नात पुनीतचे कर्ज निवारण करण्यासाठीं त्याना कित्येक हजाराची भरती करावी लागल्यामुळे त्यानीं लग्नाचा व्यवहार आटोपताच आपले ‘ वुइल ’ केले, दोन्हीं मुलींना सारखी इस्टेट वाटून दिली आणि प्रेमाच्या आईलाहि एकप्रकारें काळजींतून मुक्त केलें. भरपूर वार्षिक उत्पन्न, रहाण्याला घर आणि शिक्षणाची सोय अशी चोख व्यवस्था केल्यामुळे प्रेमासबधानें त्याना काळजी राहिली नाहीं आणि पुनीतचा सगळा व्यवहार सुरळीत करण्यात ते स्वतः खपत असल्यामुळे हेमाबद्दलही ते एकप्रकारे निश्चित झाले होते; पण तो व्यवहार त्याचे हातून पुरा व्हावा असा ईश्वरी संकेत नसल्यामुळे ते अकस्मात् दोन तीन दिवसांचें दुखणे येऊन त्यात वारले. पुनीतला संसाराकडे लक्ष देणें अर्थातच

भाग पडले आणि शिक्षणाकडचा ओढा त्याला कमी करावा लागला.

हें सगळे वादळ जरी होऊन गेले, तरी प्रेमा आणि हेमा या दोघी पूर्वीप्रमाणेच प्रेमळ बहिणी आणि जिव्हाळयाच्या मैत्रिणी राहिल्या. प्रेमाला वाईट वाटले हे हेमा जाणून होती. तिच्या हृदयाला आपण जखम केली याबद्दल हेमाला मधून मधन दुःख होत होतें, पण सुखाच्या परमोच्च स्थितींतील ते दुःख तिला फारसे जाणवत नसे. प्रेमा मात्र मनात झुरत असली तरी बाहेर एका शब्दानेहि ती आपले दुःख व्यक्त करीत नसल्यामुळे झालेल्या प्रकाराचा तिला विसर पडला, अशी हेमाची समजूत झालेली होती. इतकेंच नव्हे तर प्रेमाची सर्व प्रकारची काळजी आपण वाहिली पाहिजे असला भलताच पोक्तपणा ती आपल्या अतःकरणात वागवीत होती. प्रेमाला मात्र तिचा हा नसता उपद्याप सहन होत नसे; पण आपल्या स्वभावधर्माप्रमाणे तिने एका शब्दानेही तिला दुखविले नाहीं.

पुनीत आपल्या व्यवहारात गढून गेलेला असला तरी सुनीतकडचा त्याचा ओढा कमी झालेला नव्हता आणि त्याबद्दलच हेमाला नेहमीं विषाद वाटत असे.

---

## : ३ : : हटवादी बहीण !

पुनीतचे लग्न झाल्यानंतर कांचनरावांच्या सल्याप्रमाणें वागल्यामुळे त्याच्या वडिलांच्या वेळचे सर्व व्यवहार पुनः सुरळीत होऊन गहाण पडलेलें घर आणि शेतवाडी पुनीतच्या ताब्यात आली आणि लागोपाठ तीन वर्षे उत्पन्नात थोडथोडी वाढ होऊन तो पूर्वीच्या स्थितीला येऊन पोचला. अर्थात् कांचनरावांनीं खर्च केलेले पैसे परत करावे, अशी पुनीतला इच्छा होणें साहजिक होते. हेमालाही तसेंच वाटत असे, पण वडील वारल्यामुळे 'ते पैसे द्यायचे कुणाला' हा प्रश्न आलाच, शिवाय वडिलांकडून मिळालेली अर्धी इस्टेट तिच्या नावावर होतीच. शेवटीं बरीच वाटाघाट होऊन तो सर्व पैसा प्रेमाला द्यावा असे ठरले.

या मुदतीत हेमाला एक मुलगा झाला होता. त्या मुलाचे कोडकौतुक करण्यासाठी प्रेमा नेहमी तिच्याकडे येत असे. एकदा अशीच बोलता बोलता हेमाने इस्टेटीसंबंधाने गोष्ट काढली आणि 'आपल्या वाट्याला आलेला सर्व पैसा मी तुझ्या नावानं लिहून देणार' असे ती म्हणाली.

प्रेमाने तें ऐकून घेतले आणि थोडा वेळ थांबून म्हटले, 'यात माझा अपमान आहे. तुझ्या वडिलांनी दिलेली इस्टेट माझ्याकडे असून, शिवाय माझा स्वतःचाही बराचसा पैसा बँकेत आहे, मग पैशाची गरज मला तरी कसली ?'

हेमा काहींशी चिडून म्हणाली, 'तू आता क्षणोक्षणीं असंच मला दुःख देणार. आणि तेंही बरोबरच आहे, कारण मी तुझ्या हृदयाला जी जखम केली ती केव्हाच भरून निघण्यासारखी नाहीं.'

प्रेमा खाली मान घालून म्हणाली, 'तू असं बोलून मला उगाच हिणवितेस. आम्हा हिंदु स्त्रियांना विधिलेख हा मानावाच लागतो. अर्थात् तुझा वाटा तुला मिळाला यात माझा कसला उदारपणा ! ज्याच्या दारची फुलें उचललीं त्यालाच तीं परत दिलीं. यात माझा काय संबंध ?'

'ते काही असल तरी तू हे पैसे घेतल्यान मी काही भिकारी होत नाहीं आणि राजाची राणी होण्याचा जो तू मला मान दिला आहेस, त्याचा काही असल्या बोलण्यान मला विसर पडणार नाहीं. जिच्या उदारपणामुळ मला एवढ वैकुंठीच सौभाग्य प्राप्त झाल आणि कुबेराची संपत्ति मिळाली, तिला मी एक लहानशी देणगी देण म्हणजे गैरच आहे; पण देणगी स्वीकारण हा मात्र तुझा मोठेपणा आहे. तू मोठी आहेस, तुला सगळ काही कळत आहे. तेव्हा माझ्या मनाला थोडासा आनंद वाटेल असं—' बोलता बोलता हेमाचे डोळे भरून आले आणि ती गहिंवरली. अर्थात् कोमल आणि उदात्त अंतःकरणाच्या प्रेमाला त्या देणगीचा अव्हेर करता येईना. तिने त्या दानपत्राचा स्वीकार केला आणि विषण्णतेचे आलेले मेघ नाहींसे करावे म्हणून ती हसून म्हणाली, 'शेवटीं तू मनासारख केलसच. वास्तविक हा सगळा पुनीतचा पैसा आहे. तो तू मला दिलास आणि वर—दान न घेता वर—लाभ मिळविलास. एकप्रकारे विकतच घेतल म्हणेनास.'

हेमाचा खिन्न चेहरा किंचित् उल्हासित झाला. ती तिरप्या नजरेनें आपल्या बहिणीच्या सुंदर चेहऱ्याकडे पहात एका गालात हसून म्हणाली, 'काय पण बोलतेस? त्याची किंमत वाटत हो? अग, सगळ्या पृथ्वीच्या दानाच उदक माझ्या हातावर सोडलस तरी मी त्याच दान तुला देणार नाहीं.'

प्रेमा मान हलवून म्हणाली, 'आहे, ते मला माहीत आहे. तुझा हटवादी स्वभाव मी जाणते.'

प्रेमाचे पुनीतवर प्रेम जडलेले होते हे ती एका अक्षरानेही कुणाकडे बोलली नव्हती; पण ज्या दिवशीं हेमाचे आणि पुनीतचे लग्न झाले, त्या दिवशीं अगदीं एकीकडच्या खोलीत बसून ती मनसोक्त रडली आणि त्याचवेळीं कर्मधर्मसंयोगाने हेमा तेथे आल्यामुळे तिला ते दिसले. प्रेमाचा तो लाल चेहेरा, डोळ्यातून वहाणारे अश्रु, थरथर कांपणारे ओठ आणि वारंवार येणारे हुंदके हे पाहून पुनीतवर तिचे प्रेम असले पाहिजे अशी तिची खात्री झाली आणि तेव्हापासून आपल्या वडील बहिणीचा आपण

महान् अपराध केला आहे असे ती मानू लागली, मात्र स्त्रियांच्या स्वार्थी स्वभावाला ती अपवाद नव्हती. 'लग्नानंतर हे समजलं हे एकपरी बरं झालं. पूर्वी याची परिस्फुटता झाली असती तर भलताच परिणाम ओढवला असता' असे ती मनात म्हणाली

वास्तविक जरी असा प्रकार होता, तरी प्रेमाच्या त्या रडण्यात मत्सर अगर द्वेष नसल्यामुळे ती कुढत राहिली नव्हती. अंतःकरणातील प्रेमांकुर उपटून न टाकता प्रेमळतेच्या उच्च भावनांनी तिने तो वाढू दिला. वैषयिक प्रेम म्हणजेच खरं प्रेम, देहाचे सुख म्हणजेच खरं सुख असे तिने मानले नाहीं. मानवतेच्या सर्वसाधारण भूमिकेतून श्रेष्ठ भूमिकेवर जाऊन तिने त्या दोघांकडे पाहिले, तेव्हा तिला दुःखापेक्षा आनंदच जास्त लाभला. पुनीत सुखी झालेला पाहून आणि हेमाची आनंदी वृत्ति निरीक्षण करून तिचे अंतःकरण आल्हादाने भरून गेले. स्वतःसंबंधाने विचार करावा, स्वतःच्या सुखदुःखात मग्न व्हावे, असा तिचा स्वभावच नव्हता. आत्यंतिक प्रेमळतेने सर्वांशीं वागावे आणि सर्वांना आनंदात असलेले पहावे एवढीच तिची उत्कट इच्छा असे. तरीपण मानवसुलभ अगर स्त्रीसुलभ भावनेला ती पारखी होती, असे नाही. मात्र तेच ध्येय घेऊन बसावे इतकी ती क्षुद्र मनाची नव्हती एवढी गोष्ट खरी. तिचे खरे ध्येय ज्ञानार्जन हे होते, आणि हेमाच्या लग्नानंतर याच आपल्या ध्येयाकडे पूर्ण लक्ष देण्याचे तिने ठरविले.

प्रेमाची ही मनःस्थिति हेमाला समजणे शक्य नव्हते. त्यामुळे ती नेहमी दुःखी असे. 'प्रेमासाठीं आपण काहींतरी केलं पाहिजे' असे तिला नेहमी वाटे. प्रेमाचा शिक्षणाकडे असलेला ओढा पाहून 'निराशेनंतरचे तिचे हे एक वेड आहे' असे ती मनात म्हणे. म्हणजे हेमा आणि प्रेमा यांच्या मनःस्थितीचा हा झगडा मानव आणि अतिमानव या कोटींतील होता, असे म्हणण्यास हरकत नाहीं. त्यामुळे प्रेमाच्या अंतःकरणाचा हेमाला केव्हाच ठाव घेता आला नाही प्रेमाच्या मनाला विरंगुळा वाटावा, म्हणून ती तिला नेहमी आपल्याकडे बोलवी आणि रहाण्याचा आग्रह करी, पण प्रेमा हंसून म्हणे, 'तुमच्या दोघात माझा अडथळा

कशाला आणखी ? तूं एक माझी बहीण आहेस म्हणून तुला राग येणार नाहीं, पण पुनीतना काय वाटेल ?'

प्रेमाच्या या म्हणण्यातही थोडासा अर्थ होता. प्रेमाला अतिमानवतेची भूमिका जरी शोभत होती, तरी प्रत्यक्ष पुनीतच्या सान्निध्यात आपल्या मनाला आवर घालणे तिला अशक्य होई. 'आपल्याबद्दल पुनीतचे मत चागले आहे, आपल्या शिक्षणाबद्दल तो नेहमी प्रशसोद्गार काढतो आणि व्यवहारज्ञानाचा अभाव असल्यामुळे सर्वांकडे आपलीच वाखाणणी करतो; त्यामुळे आज ना उद्या केव्हातरी हेमाच्या मनात आपल्याबद्दल गैरसमज उत्पन्न झाल्याशिवाय रहाणार नाही' असे तिला वाटे आणि तेही खरे होते, कारण प्रेमासबधीं हेमाजवळ पुनीत बोलू लागला म्हणजे काळ, वेळ, स्थळ आणि परिस्थिति याबद्दल त्याला कसलेच भान रहात नसे. इतकेच नव्हे तर जवळ प्रेमा उभी असली म्हणजे तिच्याशी तो तासन्तास बोलत राही. आपल्या प्रेमाच्या दोन शब्दाची अपेक्षा करीत आपली पत्नी जवळ बसून आहे, हेही तो विसरत असे. प्रेमाला हेमाकडे यायचे सकट वाटे ते यामुळेच.

पहिल्या पहिल्याने असा प्रकार झाल्यानतर प्रेमाने हेमाकडे येण्याचे बहुतेक सोडून दिले होते, पण हेमाला मुलगा झाल्यानतर तिच्याकडे ती वरचेवर येऊ लागली. मुलाचे कोडकौतुक करणे, त्याला अगाखाद्यावर खेळविणे, त्याचे मनसोक्त मुके घेणे आणि घटका घटका भरलेल्या डोळ्यानी त्याच्याकडे पहात रहाणे हा एक तिचा उद्योगच होऊन बसला. हेमा म्हणे, 'तू आता लहान नाहींस' तर प्रेमा म्हणे, 'लहानासाठीं लहान व्हावे लागते, तू आपली थोरासाठी थोर होऊन रहा. मला हा लहानच थोरासारखा वाटतो.' प्रेमाच्या भावनोत्कटतेचा हा शब्दगौरव हेमाला कळत नसे. या शब्दात कोणत्या सुप्त भावना व्यक्त केल्या जात आहेत हे कळण्याइतकी ती शहाणी नव्हती आणि तेच एका अर्थी बरे होते. जर त्याचा अर्थ तिला कळता तर प्रेमाला तिने आपले घर बद केले असते. इतकेच नव्हे तर प्रेमालाही ते शब्द बोलून गेल्यावर त्याच अर्थ कळला आणि ती कावरी बावरी झाली, पण 'वेडीच आहेस' असे

जेव्हा हेमा म्हणाली, तेव्हा तिला समाधान वाटले आणि 'देवा अज्ञान हेंच स्त्रियाचे सौभाग्य आहे,' असे ती मनात म्हणाली.

पण यानतर मात्र हेमाला प्रेमाच्या लग्नाची काळजी लागून राहिली. तिनें तसें आपल्या नवऱ्याकडे बोलूनही दाखविले. पुनीत तर काय, प्रेमाच्या कोणत्याही कामासाटीं आपल्या जिवाचे रान करावयास तयार होताच. त्याने ताबडतोब आपल्या आतेभावाला ही गोष्ट सागितली. त्याचा आतेभाऊ विनीत हा नुकताच विलायतेहून बॅरिस्टरीची परीक्षा देऊन आला होता. घरचाही चागला श्रीमत. अविवाहित राहण्याचा हेतु मनपसत वधू मिळावी हाच. अर्थात् पुनीतने आपल्या बी. एससी. झालेल्या या मेहुणीबद्दल गोष्ट काढताच, जरी त्या पदवीबद्दल त्यानें नापसती दर्शविली तरी रूपगुणाबद्दलची ख्याति ऐकून तो तिला पहाण्याला यायला तयार झाला. पुनीतने हेमाला तसे सागितले. हेमाला ती एक पर्वणीच वाटली आणि वधूपरिक्षेचा एक दिवस ठरवून प्रेमाला तिने आपल्याकडे बोलविले. पुनीतही विनीतला आणण्यासाठी त्याच्या घरीं गेला. प्रेमाला यातील काहीच माहीत नव्हते. अशा स्थितीत 'आज तुला आपला दीर पहायला येणार आहे' असे हेमा म्हणाली, त्यावेळीं तिला काय वाटलें असेल याची कल्पनाच केलेली बरी!

---

## : ४ :

# शिकलेली वधू

अवघड मनःस्थितीत प्रेमावर वधूपरीक्षची पाळी आली. मनात नसताही तिला लग्नाला तयार असल्याचा बहाणा करावा लागला. आणि तो केवळ हेमासाठीं. वास्तविक लग्नाचा विषयच तिने डोक्यातून काढून टाकला होता. सूर्यविकासी कमिलिनीप्रमाणे हेमा–पुनीतचा आनदमय ससार पहात, त्याच्या सुखसूर्यप्रकाशाचा आनद अनुभवीत दिवस कठावे, असे तिने ठरविले होते. आणि तशी तिच्या मनाची तयारीही झाली होती; पण लग्नाचे सुख अनुभवीत असलेल्या हेमाला ते कसे कळणार?

शेवटीं हेमाबरोबर प्रेमाला नाइलाजाने वधूपरीक्षेची भूमिका घेऊन बाहेर यावे लागले. प्रेमाचे सौदर्य, रेखीव अवयव, प्रशात चेहेरा आणि नेत्रातील तेजस्वी मार्दव पाहून विनीत तर वेडाच झाला. केवळ उपभोग, विलास आणि आनद या रसानुभूतीनेच तो तिच्याकडे पाहात होता. त्याच्या नजरेत विषयाची मादकता खेळत होती. प्रेमाने एकाच दृष्टिनिक्षेपात ते ताडले आणि ती स्तब्ध राहिली.

हेमाने परिचय करून दिला. पुनीतने प्रेमाच्या शिक्षणाची प्रशंसा केली. हेमाने आपल्या दिराच्या वैभवाचे, विलायतच्या सफरीचे आणि त्याच्या प्रख्यातीचे वर्णन केंले. प्रेमानें ते ऐकले. हेमाची दृष्टि कशात गुंतली आहे हे जाणले आणि ओठ घट्ट मिटून विनीतच्या बोलण्याची ती वाट पाहू लागली.

विनीतला तो प्रसग प्रथम अवघड वाटला; पण पाश्चात्य समाजात तो रुळलेला असल्यामुळे, त्या अनुभवलेल्या लीला नजरेसमोर आणून तो उसन्या धिटाईने प्रेमाला म्हणाला, ‘ तुम्ही आता आणखी एम्. एस्सी.ची परीक्षा देणार असं ऐकतों ! ’

‘ होय, तो माझा आवडता विषय आहे. ’ प्रेमानें निर्विकार चेहेऱ्यानें त्याच्याकडे पहात उत्तर दिले.

'पण लग्न झाल्यानंतर त्याचा काय उपयोग?' विनीतने दुसरा प्रश्न विचारला. प्रेमाने लग्नाबद्दलचा विचारच केला नसल्यामुळे या प्रश्नाचे उत्तर देणे म्हणजे एक प्रकारे लग्नाला मान्यताच देणे आहे असे वाटून ती स्तब्ध राहिली. विनीतने मुद्दामच वकिली डाव लढवून लग्नाची कबुली मिळविण्याचा हा पेचप्रसग निर्माण केला होता.

प्रेमाची ती मुग्धता पाहून उतावळ्या स्वभावाची हेमा म्हणाली, 'लग्नाआधीची आवड लग्नानतर कायम राहातेच अस नाहीं भाऊजी!'

प्रेमाला जसा विनीतचा तो प्रश्न अस्वाभाविक आणि उतावीळपणाचा वाटला तसाच पुनीतलाही वाटला. कारण तो स्वतः केमिस्ट्रीचा भोक्ता व विद्यार्थी असल्यामुळे त्या विषयाचे व्यर्थत्व प्रतिपादन करावे अगर कोणी त्याचा उपहास करावा हे त्याला पसत नव्हते. हेमाने आपल्या उत्तराने त्या विषयाला आणलेलं लघुत्वही त्याला आवडले नाही.

पण हेमाकडून आलेल्या उत्तराने विनीतचे समाधान न होऊन त्याने पुनः प्रेमाला स्पष्टच विचारले, 'लग्नाच्या बाबतींत तुमच काय मत आहे?'

'मत कसल? स्त्रियाना लग्न अवश्य आहे असच मी म्हणेन.'

प्रेमाचे हे उत्तर समाधानकारक नव्हते. त्यामुळे विनीत काहींसा खिन्न झाला. हेमालाही प्रेमाचे हे उत्तर आवडले नाहीं. लाजून, सकोचून, खालीं पाहून, किंचित् हसून, एका डोळ्याने विनीतकडे पहात 'इश्श. हा काय प्रश्न' असे प्रेमाने अस्पष्ट शब्दानी म्हणून हेमाकडे पाहिले पाहिजे होते, पण तसे काहींच झाले नाहीं. तेव्हा आपण होऊनच हेमा म्हणाली, 'भाऊजी, मी म्हणते, वधूपरिक्षेला आलेल्यानीं असले प्रश्न विचारण्यापेक्षा वधूच रूप, वय, गुण लक्षात घेऊन काय टरवावयाच असेल ते टरवाव.'

'खरं आहे ते वहिनी, पण भावी पत्नी या नात्यान एकमेकाच्या संवयी, आवडी निवडी, आणि सामाजिक किवा आता बोलायच म्हणजे राजकीय मतही जुळलीं पाहिजेत नाहीं का? शिवाय गृहिणी म्हणजे काहीं शाळासोबती अगर अभ्यासी मित्र नव्हे. स्पष्ट सागायच म्हणजे दमल्या

भागलेल्या जिवाला आपल्या कुशल सेवाचातुर्यांन आनंदित करील अशी गृहिणी मला पाहिजे.'

विनीतच्या या बोलण्याने प्रेमाला त्याचा तिटकारा आला. 'आनंदाचे एक साधन म्हणून एकाद्या जड वस्तूप्रमाणें हा पदवीधर श्रीमत बॅरिस्टर, आपल्या पत्नीची निवड करित आहे. तिला भावना, मन आणि विचार आहेत याची याला जाणीवच नाही.' प्रेमाची ही मनःस्थिति पुनीतने जाणून म्हटले, 'प्रौढ, शिकलेल्या आणि प्रागतिक विचाराशीं समरस झालेल्या वधूच्या दृष्टीन अशी एकतर्फी अपेक्षा करून भागत नाहीं विनीत! मोटार, बग्गी, बगला, पोपाख वगैरे वस्तूप्रमाणं पत्नी ही निर्जीव बाहुली आहे अस का तुला वाटत?'

पुनीतचें हे विधान हेमाला आवडले नाहीं. विनीतलाहि हा आपला अप्रत्यक्ष उपहास आहे असे वाटले. तो म्हणाला 'तरी पण अभ्यास, रासायनिक प्रयोग आणि प्रमेये सोडविण्यातील तन्मयता या दृष्टीन काहीं मी पत्नीची निवड करणार नाही.'

'तस का? अपत्यसगोपन आणि स्वयपाकशास्त्र या बाबतींत मला होणारी तिची मदत वाखाणण्यासारखी आहे. शिवाय हेमाचं इतर वाचनही भरपूर आहे.' सभापणात आलेली रुक्षता घालविण्याच्या हेतूनें हेमा म्हणाली. पण प्रेमाला मात्र हा अतिरेक वाटला. शौर्य, धैर्य, धीरोदात्त स्वभाव हे जसे पुरुषाचे स्वाभाविक गुण आहेत तसेच अपत्यसगोपन, स्वयपाक करता येणें, नीटनेटकेपणा असणे, समयसूचकतेनें वागणे आणि प्रसगोचित धैर्य दाखविणे हेही गुण स्त्रियात मूळचेच असतात. परिस्थिति व प्रसग यानींच त्या गुणाचा विकास होतो. वधूपरीक्षेच्या बाबतीत पुरुषानीं हे गृहीत धरूनच चालले पाहिजे. फक्त बौद्धिक विकास किती झाला आहे हे फार तर त्यानीं पहावे. प्रेमळता नसेल तर ती स्त्रीच नव्हे, असे प्रेमाचे मत होतें.

हेमाच्या त्या बोलण्याचा फायदा घेऊन तुटलेला दुवा सांधण्याच्या हेतूनें विनीतनें प्रेमाला विचारले, 'तुम्हीं कोणकोणतीं पुस्तकं वाचलीं आहेत?'

'काव्याची आवड असल्यामुळ कालिदास, भवभूति वाचला आहे.'

'सस्कृत ? अरे बाप रे !'

'शेली, बायरन, वर्ड्स्वर्थ हे कवीही मला अपरिचित नाहीत.'

अभ्यास, परीक्षा, पदवी आणि आता पैसा या चतुःसूत्रीत गुतलेल्या विनीतला इतके विस्तृत वाचन करण्याला वेळ कुठचा? कारण याखेरीज राहिलेल्या वेळात त्याने हौस, मौज आणि विलास याचीच लयलूट केली होती. त्याला आता लग्न करावयाचे होते ते यासाठीच. अर्थात् प्रेमाच्या बाबतींत तो काहीसा निराशच होत चालला. 'आज्ञाधारक परिचारिका' यापलीकडे तो पत्नीची व्याख्याच करीत नव्हता. 'फावल्या वेळची विलासिनी' हीच पत्नीबद्दलची त्याची उच्च कल्पना आणि त्या दृष्टीनेच तो आज वधूपरीक्षेला आला होता. प्रेमाचे निरुपम सौदर्य, तिच्या आवाजातील मार्दव, सतेज प्रेमळ नजर आणि विलोभनीय अगसौष्ठव या दृष्टीने ती त्याला पसत होती, नव्हे तिचा मोह त्याला आवरत नव्हता. फक्त थोडासा खेळाडूपणा, हास्ययुक्त प्रसन्नता, लाजवट हावभाव वगैरे स्त्रीसुलभ गोष्टीची त्याला अपेक्षा होती. शेवटीं काव्याची आवड आहे या एकाच मुद्यावर समेट होतो का पहावा या आतरिक हेतूने त्याने प्रेमाला विचारले, 'आनद आणि रसानुभूति हेच स्त्रियाचे खरे अलकार आहेत नाहीं का?'

'पण हे अलकार सापेक्ष आहेत. कालपरिस्थित्यनुरूप त्याचा उगम होत असतो. भलत्याच वेळीं आणि दुसऱ्याला खूप करण्यासाठीं म्हणून त्याना भरती यावी अशी अपेक्षा करण व्यर्थ आहे. आनदप्रवृत्ति ही सहजावस्था आहे. पाहिजे त्यावेळीं काढून घेता येईल असा तो काहीं बरणींत भरलेला मुरबा नव्हे, शिवाय तिन्ही त्रिकाळ वसतऋतूची अपेक्षा करणं योग्य ठरेल का ?'

प्रेमाच्या या प्रश्नाला काय उत्तर द्यावे हेच विनीतला कळेना. पाश्चात्य प्रणयलीलानीं हुरळून गेलेल्या त्याच्या नजरेला, पौर्वात्य सस्कृतीचा हा भारदस्तपणा रुचला नाहीं. तरी पण प्रेमाला नापसत करण्याचे साहस त्याच्याने करवेना. उलट असली सौदर्यलतिका आपल्या आगाखाद्यावर

खेळायला मिळाली तर ती एक अभिमानास्पदच गोष्ट ठरेल, असे वाटून त्याने बेभानपणाने विचारले, 'विवाहोत्तर जीवन म्हणजे वसंतऋतूच नाही का?'

'असेल. पण त्यालाही मर्यादा आहे. वसंतानंतर ग्रीष्म आणि त्या नंतर पावसाळा हे क्रमानें येणारच. तेव्हा वसंतऋतूच्या भावनेनं हुरळून जाण्यासारखं त्यांत कांहीं आहे, असं मला नाही वाटत!'

आपल्या दिराचा होणारा कोंडमारा अंशतः दूर करावा म्हणून हेमानें प्रेमाला विचारिलें, 'प्रेमा, रसायनशास्त्र शिकताना तत्त्वज्ञानाचा तूं इतका खोल अभ्यास केला असशील अशी नव्हती माझी कल्पना! मी आता स्पष्टच विचारते, तुला लग्न करायचं आहे की नाही?'

'आहे तर! नाहीं कसं?' इतकेंच म्हणून प्रेमा किंचित् हसली. आणि त्या दिव्य हास्याच्या जादूने विनीतही पराकाष्ठेचा मोहित झाला. त्याला तें हास्यच पाहिजे होतें. आपली भावी पत्नी या नात्यानें तो तिच्याकडे पहात होता. भावी पति या दृष्टीने ती आपल्याकडे पहात आहे की नाही, याचा त्याने विचारच केला नाहीं. प्रत्येक वधूपरीक्षेत वराकडून नेहेमी जी चूक होते तीच यावेळीही विनीतनें केली. सनातनी वृत्तीला आणि रूढीला आजकालच्या सुशिक्षितानीं कितीही नाकें मुरडलीं तरी वधूपरीक्षेची आणि अपेक्षेची ही रूढी मोडून टाकावी असें त्याना मुळींच वाटत नाहीं. 'वधूला वराकडे पहाण्याची दृष्टि असावी' हे विधानच कोणाला पटत नाहीं.

विनीतचेंही तसेंच झालें. तरी पण निकट सहवासावाचून हे फूल उमलणार नाही असे त्याला वाटलेंच. इतकेंच नव्हे तर त्या बाबतींत पाश्चात्य पद्धतीचे प्रयोग करायाचेही त्याने ठरविलें. प्रेमाच्या मनःस्थितीचा आणि परिस्थितीचा विचार करण्याची आवश्यकता आहे असें त्याला वाटलेंच नाहीं.

स्वार्थी माणसाची नेहमीं हीच चूक होत असते. विनीत बॅरिस्टर झाला खरा; पण अभिमानाच्या आंधळेपणामुळें अपणाखेरीज इतरानाही कांहीं भावना असतात, याचा त्याने विचार केला नाहीं. पैसा आणि पदवी या दोनच दृष्टींनीं तो शिक्षणाकडे पहात होता. त्यामुळें ज्ञानाच्या

बाबतींत त्याची प्रगति झालीच नाहीं. इतरानाही तो तसेच समजूं लागला आणि त्यामुळेंच प्रेमातही यापेक्षा ज्यास्त काहीं आहे याची त्याला जाणीव झाली नाहीं.

हेमा ही तर स्वत: विवाहित असल्यामुळे आपल्यासारखी प्रेमाला कधीं करीन याच अभिनिवेशात मग्न होती. अथात् प्रेमाची मन:स्थिति जाणून घेण्याची तिला आवश्यकताच वाटली नाहीं. आत्यंतिक आनदात मनुष्याला स्वत:चा तर विसर पडतोच पण दुसऱ्याबद्दलही तो अज्ञानी राहातो, त्याचे हे एक प्रत्यंतर आहे. प्रेमासारख्या जिवाभावाच्या व त्यागात सुख मानणाऱ्या मैत्रिणीच्या अन्त:करणाचा ठाव घेण्याचीही तिला आवश्यकता वाटली नाहीं, याचे कारण हेच. आपले लग्न आपल्या मनाप्रमाणें अनायासे झाले आणि यामुळे अत्यानदाच्या शिखरावर आपण आरूढ झालों, तेव्हा लग्न हेंच आनदाचे निवासस्थान आहे असे तिने ठरविले. तत्पूर्वीचें सगळे उद्योगपर्व ती विसरून गेली. त्यात प्रेमाला स्वत:चे मन आहे याचाही तिला विसर पडला. यालाच मनुष्यस्वभाव म्हणतात.

विनीतने नतर दुसराच विषय काढला. त्याच्या कोर्टकचेरींतील गप्पा सुरू झाल्या. प्रेमा त्या बाबतींत मुग्धच राहिली. कोणत्याही विषयाशीं एकदम समरस होण्याइतकी तिची मन:स्थिति नव्हती. शिवाय विनीतच्या बाबतींत तिचे तितकेसे चागले मत बनले नसल्यामुळे तिने या बोलण्यात भाग घेण्याचे जाणूनबुजूनच टाळले. हेमाला भाऊजींच्या गप्पा आवडत असत. एकाच विषयात रगून जाण्याइतकी ती दृढ आणि गंभीर स्वभावाची नव्हती. तसेच एकाच विषयाला दोन बाजू असतात इतकाही तिला पोंच नव्हता. पुनीत हा प्रवाहपतिताप्रमाणे वाहात जाणारा असल्यामुळें त्या गप्पात तो सहज सामील झाला.

अशा रीतीनें वधूपरीक्षेवरून कोर्टातील कज्जेकफावतीवर सर्व मंडळी वळली. मात्र विनीत हा केवळ स्वत:च्या सुखासाठीं पत्नीची निवड करणारा आहे. पत्नीशीं समरस होण्याला तिच्या भावना जाणून घेतल्या पाहिजेत, माणसकीनें वागले पाहिजे याचा त्याला गधही नाहीं, एवढें प्रेमानें जाणले आणि ती उदासीनच राहिली. कारण स्वत:च्या लग्नाचा विषयच

तिनें एक प्रकारे सोडून दिला होता. रासायनिक प्रयोगाच्या नव्या नव्या प्रमेयात व संशोधनात आपण जन्म घालवावयाचा असे तिने ठरविले होते.

बोलता बोलता विनीत एकदम म्हणाला, ' आज एका त्रिलंदर भामट्याला पोलिसांनीं पकडल आहे. आणि आश्चर्य म्हणजे तो म्हणे एक चागला शिकलेला कॉलेजिएट तरुण आहे. आज पोलिस कोर्टात केवढी दगल!'

विनीतच्या या बोलण्याने सर्वांचे लक्ष त्याच्याकडे वेधले. पुनीतनें आग्रहाने विचारले, ' त्याचे नाव तरी काय?'

' सुनीत. आज कित्येक दिवस पोलिसाना त्याने गुगारा दिला होता म्हणे. '

विनीतचे हे उत्तर ऐकताच सर्वांच्या तोडून ' अ! सुनीत? ' असे उद्गार निघाले. नतर पुनीतने विचारले, ' त्याला जामिनावर सोडता येईल का? मला त्याच्यासाठीं काही तरी केलं पाहिजे. '

' का? तो तुमच्या परिचयाचा आहे वाटत? खटपट केली तर सुटेलही. '

' तर मग चला. ' असे म्हणून पुनीत उठला. विनीतही काहींशा चकित मुद्रेने प्रेमाकडे व हेमाकडे पहात पुनीतबरोबर निघाला.

---

## : ५ : विवाहपूर्व सहवास

सुनीतच्या बाबतीत असे काहीं तरी विचित्र ऐकू येईल अशी तिघाचीहि अपेक्षा होती. कारण हेमाच्या बाबतीत पूर्ण निराश झाल्यावर तो अगदींच उच्छृखल बनला होता.

प्रेमालाही पुनीतच्या बाबतीत तसाच धक्का बसला, पण ती प्रथम पासूनच विचारी, प्रेमळ व उदात्त अन्तःकरणाची असल्यामुळे व पुनीतवरचे स्वतःचे उत्कट प्रेम तिने मनातच कोंडून ठेविले असल्यामुळे प्रेमनिराशेचा तिच्यावर काय परिणाम झाला हे दुसऱ्या कोणालाही कळले नाहीं.

पण सुनीतचे तसे नव्हते. हेमाच्या उत्तान प्रेमाभिनयामुळे तो वेडा बनला. तिच्याबरोबर त्याने भावी पत्नी या नात्याने मनमानेल तशा हौसा मौजा केल्या, तिनेही त्याला अडथळा न करता उत्तेजन दिलें, त्यामुळे पुनीतशी तिचा विवाह होताच सुनीत माणसातून उठला. त्याला कसलेच नियत्रण राहिले नाही. हातीं असलेला पैसा त्याने पाण्यासारखा उधळून व्यसनी मनुष्याप्रमाणे मनाला शाति मिळते कीं काय ते पाहिले, पण त्याला ती कुठून मिळणार? शेवटीं तो कगाल बनून अज्ञातवासात एखाद्या मवाल्यासारखे दिवस कठू लागला.

हेमाचे लग्न झाल्यावर तिच्या कानावर त्याच्यासबधी लोकवार्ता आली ती अशी होती. तिने त्याची विचारपूस करण्याचेही मनात आणले नाही. इतकेच नव्हे तर हुगून टाकलेल्या निष्प्रभ फुलाप्रमाणे ती त्याचा तिरस्कार करू लागली. तो जगातून नाहीसा होईल तर बरे असेही तिला वाटले. कारण तो दिसला अगर भेटला तर पूर्वीच्या आठवणी ताज्या होतील, विवाहपूर्व सहवासातील आपलीं कृत्ये चव्हाट्यावर येतील अशी तिला भीति वाटत असे.

पुनीत हा एकमार्गी साधासुधा अभ्यासी विद्यार्थी असल्यामुळें त्याला

या भानगडींची गंधवार्ताहि नव्हती. सुनीतला तर तो अजूनही आपला जिवाभावाचा मित्रच मानीत असे. हेमा त्याचा तिरस्कार करते तो केवळ त्याच्या वर्तनामुळें अशीच त्याची समजूत होती. ती त्याची समजूत प्रेमानेही कायमच राहू दिली. सुनीतच्या बाबतीत हेमाचे विवाहपूर्व रगडग काय काय झाले, याची प्रेमाला थोडीसुद्धा अटकळ नव्हती. प्रेमाची गुप्तगगा स्त्रियाच्या अन्तःकरणाबाहेर सैरावैरा धावत नाहीं अशीच तिची समजूत होती.

एकदरीत प्रेमा, पुनीत व सुनीत याच्या चागल्या स्वभावामुळे हेमाची विवाहपूर्व उच्छृखलता गुप्तच राहिली. सामान्य लोकही 'श्रीमताात आणि कॉलेजियन तरुणतरुणींत हे असे काहीं तरी प्रकार असणे शक्य आहे' असे म्हणून लोकवार्तेच्या सागरात नव्या लाटाची भर घालण्यात गढून गेले. कारण लोकवार्ता या तात्पुरत्या वावटळीतच विराम पावत असतात. शिवाय बड्या लोकाचे सामान्य लोकात बसणे उठणे फार कमी. त्यामुळें हेमा सुखी होती. पुनीतही प्रेमाचे तळमळणारे अन्तःकरण जाणत नसल्यामुळे हेमाच्या सान्निध्यात व फावल्यावेळीं रासायनिक प्रयोग करण्यात तो गढून गेला होता. प्रेमाहि त्या बाबतीत त्याची निष्ठावत शिष्यीण होती. अखड अविवाहित राहून मानसप्रियकराच्या सान्निध्यात रसायनशास्त्राचा अभ्यास करावा असे तिला वाटत होते. त्यातच ती सुखी होऊ पहात होती. प्रेमा ही खरोखरच प्रेमळ होती. दुसऱ्याच्या सुखाने सुखी होण्यातच खरा आनद आहे असे तिला वाटत होते आणि त्यामुळेच हेमाबद्दल तिला मुळींच वैषम्य वाटत नव्हते.

हेमा मात्र आपल्यावरून जगाची पारख करीत असल्यामुळे 'प्रेमाचें लग्न करून टाकावे, म्हणजे तिला खरे सुख मिळेल' अशी कल्पना करून बसली होती.

पण आता सगळेच गाडें उलटले. सुनीत अकस्मात् उगवला. पुनीत त्याच्या साहाय्याला धावला आणि विनीतलाही त्याने आपल्याबरोबर नेला. तेव्हा तेथे कोर्टात काय काय भानगडी होतात देवाला माहीत, असें वाटून हेमा अगदी घाबरून गेली. प्रेमाकडेही तिला काहीं बोलवेना. विवाहपूर्व

जीवनातील यौवनविलास सागण्याला कोणत्या स्त्रीला आनंद वाटेल ? हेमाचेही तसेंच झालें. त्यात सहवास एकाशीं आणि लग्न दुसऱ्याशीं असा प्रकार झालेला ! मग तर एक अक्षरही बोलणे अशक्य !

प्रेमा स्वस्थच होती. सुनीतला सकटातून सोडविण्यासाठीं मित्र या नात्याने पुनीत धावला. हे त्याच्या प्रेमळ स्वभावाला अनुसरून योग्यच झाले असे तिला वाटले. सुनीतची प्रेमनिराशा ती जाणून होती. पण सुनीत हा पुरुषासारखा पुरुष असून इतका कसा बहकला याचे तिला आश्चर्य वाटलें. ती त्याच विचारात मग्न होती.

तासा दीडतासातच पुनीत आला आणि त्यानें सुनीतला जामिनावर मोकळे केल्याचे त्या दोघींना सागितले. आणखी तो म्हणाला, ‘ मी त्याला इकडेच आणणार होतों; पण तो काहीं केल्या येईनाच. ’

‘ तो येईनाच ’ हे ऐकून हेमाला केवढे तरी समाधान वाटलें. कारण तो आपल्या घरीं यावा अशी तिची मुळींच इच्छा नव्हती. ती त्याला शक्य तों टाळण्याच्या खटपटींत होती. शक्य असते तर विनीतला सागून तिनें त्याला आजन्म कारावासाची शिक्षा देवविली असती.

प्रेमाला मात्र ते बरें वाटले नाहीं. किती झाले तरी तीं चौघें मित्र या नात्याने एकत्र वागलीं होतीं. तीन चार वर्षे निकट सहवासात त्याचे दिवस गेले होते. अर्थात् सुनीतला अशा अगतिक स्थितींत पुनीतने एकटें सोडले हें बरे झाले नाहीं असेंच तिच्या हळव्या मनाला वाटले. तिने त्या बाबतींत आपण होऊनच पुनीतला विचारलें, ‘ मग सुनीत कुठं गेले ?’

‘ त्यानं माझे आभार मानले आणि ठरलेल्या तारखेला हजर होईन असं सागून एकदम तो निघून गेला. ’

‘ नसता उपद्व्याप झाला हा. जामिनकीचे रुपये भरावे लागले नाहींत म्हणजे मिळविली ! मवाली तो. घ्या काय त्याचं ? ’ हेमा वैतागून म्हणाली.

आणि याच भाषणानें अगदीं प्रथम प्रेमाला हेमाबद्दल तिरस्कार वाटला. क्षणभरही सुनीतला न विसंबणारी हेमा त्याच्या बाबतींत इतकी कठोर कशी बनली, हे कोडें तिला उलगडेना. तरी पण या बाबतींत

हेमाला काहीं न बोलता तिने पुनीतला विचारले, ' त्यांनीं अपराध तरी कोणता केला होता ? '

' मगनलाल सराफाला फसवून त्याचा एक मोठ्या किंमतीचा दागिना सुनीतन चोरला आणि तो दुसरीकडे विकला असा त्याच्यावर आरोप आहे. मनगलाल म्हणतो, सुनीत हा आपल्या दुकानात बायकोसह आला होता. '

' बायकोसह ? ' हेमाने दचकून विचारलें. तरी पण आपल्या या प्रश्नाचे उत्तर पुनीतकडून मिळावे अशी तिची इच्छा दिसली नाहीं. गतकालच्या कसल्या तरी दुःखद स्मृतींत ती गढून गेल्यासारखी दिसत होती. मगनलालचे नाव ऐकताच तिचे अग शहारले, आणि त्याचवेळीं प्रेमानें तिच्याकडे पाहिले. हेमाला यातील काहीं तरी रहस्य माहीत असावे अशीहि तिची समजूत झाली. आणि तिच्या सचिंत मुद्रेवरून त्याबद्दल प्रेमाची खात्रीही पटली. सुनीतच्या या गतकालीन भानगडीशीं हेमाचा काहीं तरी सबध असलाच पाहिजे असे तिला वाटू लागले. कारण हेमाच्या पायींच सुनीतने आपला सगळा पैसा उधळला होता, हे प्रेमा जाणून होती. मात्र ती त्याची भावी पत्नी आहे या दृष्टीने तिने त्यावेळीं त्या गोष्टीकडे दुर्लक्ष केले होते. पुनीत काहींच जाणत नव्हता. विवाहपूर्व प्रेमाला तो पारखा होता. हेमानेच अरसिक म्हणून त्यावेळीं त्याची निंदा केली होती. प्रेमानेही पुनीतवरचे आपले प्रेम व्यक्त केले नव्हते, कारण तो आपलाच आहे हे ती जाणून होती, पण त्यानतरच्या वावटळीत सगळेच उलट-पालट होऊन गेले. आणि हेमा—सुनीतच्या सगळया भानगडी पडद्या-आड राहिल्या.

प्रेमाची स्थिति मात्र यावळीं अगदीं अवघडल्यासारखी झाली. तितक्यात अन्तःकरणाची टोंचणी असह्य होऊन हेमा तिथून उठून गली. अश्रूंनीं ओथंबलेले तिचे डोळे प्रेमाला स्पष्ट दिसले. पुनीतला वाटलें, सुनीतसाठीं आपण केलेली खटपट हिला आवडली नसावी, त्यामुळें ती रागावली असेल. अर्थात् यावेळीं तिची समजूत करण्याची खटपट न करिता नंतरच सर्व खुलासा करावा असे मनात आणून तो आपल्या संशो-

धन हॉलकडे वळला. हेमाचे अन्तःकरण जाणून घेण्याच्या दृष्टीने ते त्याचे जाणे प्रेमाला इष्टच वाटले आणि ती हेमाच्या मागोमाग आत गेली.

हेमा यावेळीं आपल्या खोलीतील बिछान्यावर पडून उशीत डोकें खुपसून रडत होती. प्रेमाने आत येऊन तिची समजूत करण्याच्या हेतूने पाठीवरून हात फिरवीत अन्तःकरणाच्या कळवळयाने विचारले, ' हा प्रकार काय आहे ते मला तू सांगशील का ? असं रडून काय होणार ?'

' काय सांगू आणि कसं सांगू माझ ताई ! मला ते सांगता येण्यासारखं नाही ग ! मला आता मरायलाच पाहिजे. तू माझ्या बाळाला सांभाळ. त्याची आई हो— ' बोलता बोलता हेमा हुंदके देऊन रडू लागली. मरण आणि मरणानंतरची सुखाची होणारी होळी या दोन्ही भावना तिला असह्य झाल्या. इतक्यातच मरून जावं असे तिला वाटत नव्हते. तारुण्यातील सुखमय जीवन तिला अजून भोगावयाचे होते, पण जगण्याची तिला भीति वाटत होती.

आपण यावेळी काय करावे आणि काय न करावे हेच प्रेमाला कळेना. हेमाला पोटाशीं धरून आईच्या कळवळयाने ती म्हणाली, ' हेमा, हेमा, हे काय ! तू शुद्धीवर आहेस ना ?'

' होय ग. मी शुद्धीवर आहे म्हणूनच मरून जावंस वाटत. जा. तुझ्या त्या लॅबोरेटरीतील एखाद जालिम वीष मला आणून दे.' हेमा प्राणांतिक वेदनांनी तळमळून बोलत होती.

' अग, असं तुला झालय तरी काय ? मी काय समजू ?'

' तू काही समजू नकोस. सुनीतची आता केस चालणार आणि त्यात सर्व काही माझं रहस्य बाहेर पडणार. तेव्हा समजण्यापेक्षा ऐकणच बरं. मात्र त्यापूर्वी मला जगातून नाहीस झालं पाहिजे. ' हेमा अगदी हताश होऊन हुंदके देत बोलत होती.

' हेमा, असं रडून आणि आततायीपणा करून काय होणार ? मला सांग. सुनीतच्या या केसशी तुझा संबंध कसा येतो ?' प्रेमाने तिला आपल्याजवळ ओढून घेऊन काहींशा गंभीरपणाने पण अत्यंत आपुलकीने प्रश्न केला.

हेमाच्या उतावीळपणाला तेवढाच विरगुळा वाटला आणि ती खालीं मान घालून अस्पष्ट स्वराने म्हणाली, ' त्या दागिन्याच्या घालमेलीत त्यावेळी मीच त्याच्याबरोबर दुकानात गेले होते.'

' खरं? तूं गेली होतीस? आणि आपली बायको म्हणून त्यानं तुझा परिचय करून दिला?'

' होय. आणि तसं म्हटलं तर आमचा वाङ्निश्चय झाला असल्यामुळं, आमचं दोघांचं लग्नाचं ठरलं असल्यामुळं मीही गप्प बसले.'

' तर मग आम्ही अभ्यासात मग्न असतां तुमचा जो एकांतातील विहार चालत असे, लग्नापूर्वीचे सहवाससुख अनुभविलं जात असे ते अशाच प्रकारचं होतं वाटतं?'

प्रेमाचा हा प्रश्न केवळ उपहासाचा नसून काळजीचा आणि कळकळीचा होता. त्यामुळे हेमाला रागावता येईना आणि बोलताही येईना. पुनीतशी लग्न होण्यापूर्वी सुनीतशी केलेल्या प्रेमलीला एकाद्या चित्रपटा-प्रमाणे तिच्या डोळ्यासमोरून जाऊं लागल्या आणि त्या पाहून तिचे अंग शहारलें. तिला उत्तर देण्याचेही भान राहिलें नाही, पण त्यामुळे प्रेमाला भलताच संशय आला आणि तिनें तिचें तोंड वर करून नजरेला नजर भिडवीत म्हटलें, ' त्यांत मनाला लागण्यासारखं विशेष कांहीं—'

' नाही. नाहीं. तसं काही नाही गं—' हेमा केविलवाणा चेहरा करून कळवळ्याने म्हणाली.

' तरी बरं. तुझा उतावीळ, हट्टवादी आणि अधिरा स्वभाव असल्या-मुळं बेभानपणानं—'

' किती बोलशील? मी आत्महत्या करूनच या जंजाळातून मोकळी होतें कशी!' हेमा निर्वाणीने म्हणाली.

' मी नसतें तर तू तेवढही केलं असतंस, पण मी तुला आतां कांहींच करू देणार नाहीं. आतां मला असं सांग, पत्नी म्हणून सुनीतने मगन-लालशीं तुझा परिचय करून दिला तेव्हां त्यानं तुला निरखून पाहिलं होतं का?'

' नाहीं. ओझरतं पाहिलं आणि तो दागिने काढून दाखवूं लागला.'

' बरं. त्या वेळी तूं पोषाख कसा काय केला होतास?'

' फारसा झोंकदार नव्हता. नेहमीचाच कॉलेजात जाण्याचा. पिरोजा रंगाच पातळ, फिक्कट गुलाबी ब्लाऊझ, कानात हिऱ्याच्या कुड्या—'

' समजल. माझ्या कुड्या मुद्दाम कानात घातल्यास तोच तो दिवस; पण त्या दिवशी घाईन म्हणून निघालीस आणि सुनीतला कुठ भेटलीस?'

' काय सांगू! तुम्हाला दोघानाही टाळून सुनीतबरोबर फिरायला जाण्याच ठरविल होत मी. आमच लग्नाच ठरल्यावर माझ कॉलेजकडच लक्ष–'

' कमी झाल आणि त्याबद्दल पुनीतनी तुझी थट्टाहि केली.' इतकेच म्हणून प्रेमाने एक दीर्घ सुस्कारा सोडला. कारण हेमा–सुनीतच लग्न ठरल्यावर आपणही पुनीतकडे आपले हृदय उघडे करावे असे तिला वाटले होते पण सकोचामुळे तिच्याने ते साहस करवले नाही. पुनीत तसल्या बोलण्यात पारगत नव्हता. अर्थातच मनातील गोष्ट उघड करण्याला सवडच मिळाली नाही तिला आणि त्यानतर हेमा–सुनीतचे लग्नाचे फिसकटून पुनीतशी तिचे लग्न झाले. हेमाला ती आठवण झाल्यामुळे चाललेल्या सभाषणाचा विषय ती विसरली आणि त्याच गतकालीन गोड स्मृतीत मग्न होऊन गेली. प्रेमाला तिच्या या मनःस्थितीची कल्पनाच झाली नाहीं. कारण ती स्वतःच्याच दुःखाचा विचार करीत होती.

प्रेमा काहींच बोलत नाही असे पाहून हेमाने अश्रूनी भरलेल्या डोळ्यानी तिच्याकडे पहात विचारले, ' मग काय, दुसरा काही उपायच नाही तर!'

हेमाच्या या प्रश्नाने प्रेमा भानावर आली आणि क्षणभर खिडकीतून दूरवर पाहून म्हणाली, ' तूं कसलीच काळजी करू नको.'

' आणि?'

' आणि नाही नि काहीं नाहीं. यापैकी काहीच कुणाजवळ बोलू नको. माझ्यावर विश्वासून राहा.'

' पण तू काय करशील?'

' ते आताच काय सांगू? आज या गोष्टीचा मी विचार करतें. सुनी-

तला मी ओळखत नाहीं अस नाहीं. तूं उगाच घाबरून जाऊन भलतच काहीं करूं नको. साग. माझं ऐकशील ना?'

'ऐन वेळीं भलताच प्रसग आला तर?'

'वेडी आहेस तूं. तसा प्रसग येत नाहीं हे तू जाणून राहा. तरी पण इतकी मनाच्या अधीन झाली नसतीस, तर—'

'बाई ग, उपदेशाची वेळ निघून गेली आहे. प्रत्यक्ष प्राणावरचा प्रसग आहे हा. तुला तशी काही खात्री वाटत असेल तरच—'

'घाई केल्यामुळच तुझ्यावर आज असा प्रसंग आला आहे ना, मग आता तरी निदान मी पुनः भेटेपर्यंत उतावीळपणानं काहीं करून बसू नको; तूं स्वतःचा जीव घालवून बसशील आणि अब्रूचही मातेर होईल. स्त्रियाना संयम आणि बधन अवश्य पाहिजे.'

'मग तू आता जाणार म्हणतेस?'

'होय. मी घरीं जाते. उद्या परवा येईन. मात्र काहींच झालं नाही अशा पद्धतीन तू वाग. नाही तर पुनीतच्या मनात नसता सशय उत्पन्न करून—'

'मला काय एवढही समजत नाही. उद्या तुझी वाट पहात राहाते.'

'मग आता ते डोळे पूस आणि मुलाला घे पाहू. पहा कसा मलूल चेहेरा करून तो तुझ्याकडे पहात राहिला आहे! लग्नापूर्वी आपली आई फुलपाखराप्रमाण बेछूट भराऱ्या मारण्यात किती तरबेज होती हे त्या बिचाऱ्या अर्भकाला कस कळणार?' प्रेमाने तिला हसविण्यासाठीं एक गालगुचा घेऊन गदगदा हालविले.

'आता आणखी किती बोलशील!' असे म्हणून हेमाने मुलाला उचलले आणि प्रेमा त्या दोघाकडे पहात खोलींतून बाहेर पडली.

हेमा जरी प्रेमाला तसे म्हणाली, तरी आपले लग्नपूर्व सहवासजीवन कोणालाहि निंद्य वाटण्यासारखे व भावी आयुष्यावर परिणाम करणारे होते असे आता तिचे तिलाच वाटूं लागले. वडलानीं दिलेल्या स्वातत्र्याचा व मिळविलेल्या शिक्षणाचा आपण दुरुपयोग केला असे आपल्या मनाशीं तिने कबूल केलें; इतकेंच नव्हे तर सुनीतने त्या आपल्या अतिरिक्त वर्तनाचा मन मानेल तसा फायदा घेतला असता तर आज आपल्याला जगात तोंड दाख-

वायला जागा राहिली नसती आणि या आजच्या गृहसौख्याला व अपत्य सुखालाही आपण मुकले असते हे मान्य करणे तिला भाग पडले. वय-मानाप्रमाणें निर्माण होणाऱ्या देहाच्या भुकेला मोकळेपणाच्या वातावरणांत उत्तेजित भावनांच्या स्वाधीन केल्यास, संयम आणि विचार यांचें साहाय्य न घेतल्यास तरुण कुमारिकांचे कधींही भरून न निघणारे नुकसान खात्रीने होऊं शकेल हा सिद्धात तिला आज पत्नीपदावर आरूढ झाल्यानंतर कळला. प्रेमाच्या धीर गभीर, सह-नशील आणि त्यागी स्वभावाचे तिला खरे कौतुक वाटले ते याच वेळीं. पुनीतवर तिचे उत्कट प्रेम, पण तिने त्याचा उच्चारही कधी केला नाहीं, पुनीतला तिने ते जाणवूंही दिले नाहीं. इतकेच काय, पण तशी वेळ येताच प्रेमळपणाने तिने हेमाला सुखी करण्यासाठीं स्वतःच्या सुखाचा बळी दिला ! हेमाला हे आठवताच तिला स्वतःची लाज वाटली आणि प्रेमा-बद्दलचा आदर दुणावला.

---

## : ६ : : नवा उद्योग

हेमाला अभिवचन देऊन प्रेमा आपल्या घरी आली खरी, पण तिच्या मनात विचार आला की, 'स्वाधीनच प्रेमाच माणूस तिच्या हवालीं करून दुःखात समाधान मानल, पण हे सकट तर त्याहूनही मोठ आहे. लग्नापूर्वी तिन जे मन मानवेल तसे चाळे केले ते मला कसे निभावता येणार? मला त्यासाठी काय करता येईल? सुनीतशी मी या बाबतींत कशी बोलू आणि कोर्टकचेरींत प्रकरण गेल्यावर तो तरी याला काय तोड काढणार? शिवाय प्रेमभग झालेला तो उच्छृखल तरुण! अनायासं चालून आलेली सूडाची सधि तो थोडीच वाया दवडणार?'

'—पण तो उच्छृखल आहे का?' या प्रश्नाचे योग्य उत्तर तिचें मन तिला देईना. कारण तो तसा नव्हता. कोणत्याही मनुष्याकडे कोणाही मनुष्याने एकाच नजरेने पाहू नये. हेमाने आपल्या मोहक हाल-चालीनें आणि नटव्या अभिनयाने जर त्याला उत्तेजित केले नसतें, नसत्या हौसामौजा करण्यात तिने त्याला ओढले नसते, तर तो पुनीतसार-खाच अभ्यासी विद्यार्थी आणि आदर्श तरुण राहिला असता.

अन्तःकरणातून या शब्दाचा निनाद तिच्या कानावर आदळताच ती खडबडून उठली आणि सुनीतच्या वर्तनाचे सिहावलोकन करण्याला तिने आरभ केला.

तो एकदा म्हणाला होता, 'प्रेमा, तू तरी हेमाला दोन शब्द साग. मींच म्हणून मनाला आवरून धरल आहे. दुसरा एकादा असता तर कालच्या पिकूनिक पार्टीत भलताच प्रसग ओढवला असता. तिची आई अगर वडील कोणीच तिला या बाबतींत बोलत नाहीत—'

'—आणि खरच. ती रात्रीची वेळ. निर्जन प्रदेश. भीति नाहीं आणि नियंत्रण नाहीं अशी परिस्थिति. पुनीतशीं सायन्सच्या एका समी-करणाच्या बाबतींत मी बोलण्यात गुतलेली पाहून सुनीतला तिनं आग्रह

करकरून जवळजवळ ओढीतच वडाच्या झाडाखालीं असलेल्या काळो-खात नेल. छे छे—'

—ती आठवण झाली कीं अजूनही अग शहारते, आणि तिला त्या बाबतींत विचारल तेव्हा रागान धुसपुसत ती म्हणाली, 'बाबानीं आमच्या लग्नाला सम्मति तरी दिली आहे आणि तू पुनीतशीं कसलं ग इतक रोजरोज हितगुज करतेस ? लॅबोरेटरींतील नवे शोध ओठी पोटीं खेळू लागल्यावर मग सागणार होय ! '

—त्या वेळच हे हेमाच उत्तर ऐकून मी तर थक्कच झाल्ये. वास्तविक पुनीतवर माझ प्रेम असताही मी एका शब्दानसुद्धा त्याच्याकडे तें व्यक्त केल नव्हत. कारण त्याच्या मनातच कधीं तो विचार आला नव्हता. तस मी बोलले असते तर हेमाचा त्याच्याशीं विवाह तरी झाला असता का ?

—एकमार्गी प्रेमाचीं गीतं गात तरुणतरुणीनीं हुरळून तरी कशाला जाव ? माझ पुनीतवर प्रेम होत, पण पुनीत माझ्यावर प्रेम करीत होते थोडेच ! आणि लग्न हेच प्रेमाचं व्यक्त स्वरूप आहे अस मानल तर हेमा-पुनीतचा विवाह कसा झाला असता ? हेमाहि त्याच आपल्या अनुभविक शहाणपणाच्या दिमाखान मला अपरिचित असलेल्या विनीतशीं माझं लग्न जुळवीत बसली आहे ना ? प्रेम म्हणजे बेजबाबदार वासनाचा पोरखेळ, असाच तिचा समज झालेला दिसतो. नाहीं तर पुनीतच्या बाबतींत माझ्यावर तिन असा कधीच आरोप केला नसता.

—आणि मी सायन्सवरील त्याच्या निरतिशय भक्तीमुळच त्याच्यावर प्रेम करू लागले ना ? स्त्रीपुरुषाच्या ससारविषयक भावना आम्ही थोड्याच जाणल्या होत्या ? भावी जबाबदारीचा थोडाच विचार केला होता ? अभ्यासातील एक मित्र म्हणून ते मला समजत होते, आणि मीहि तसच मानावयास पाहिजे होत, पण मी पडले स्त्री ! त्यात तरुण. स्नेहाचे, प्रेमाचे पर्यवसान म्हणजे लग्न आणि लग्न म्हणजे प्रेम. प्रेमावाचून लग्न व्यर्थ. ही माझी विचारसरणी. लग्न आणि अभ्यासातील एकतानता यात फरक आहे, हे मला कुठ माहीत होतं ! आणि त्यामुळच पुनीतच्या विचारसरणीकडे लक्ष देण्याची मला जरूरी वाटली नाहीं.

—तशीच सुनीतची गत झाली. तो आदर्श तरुण होता. मैत्रिणीला फसवून सोडावी, मग तिचं काहीं का होईना! या मताचा तो नव्हता. यामुळं त्यानं लग्नाच निश्चित केलं, आणि शेवटीं इतकं होऊन वेळ येतांच हेमानच त्याला फसविलं. विवाहपूर्व सहवास मनात न आणता ती पुनीतची पत्नी झाली. विवाहपूर्ण सहवास म्हणजे काय याची पुनीतला ओळख नव्हती. मी त्याना ती होऊ दिली नव्हती आणि त्यामुळंच ते या लग्नाला कबूल झाले. ठरलेलीं लग्न मोडतात आणि नवीं जुळतात हा सनातनी जगाचा व्यवहार त्यानीं ध्यानात घेतला. आजकालच्या तरुण स्त्रीपुरुषाच्या लग्नपूर्व सहवासातील रहस्य त्याच्या लक्षात आलं नाहीं. एकमार्गी अभ्यासी विद्यार्थ्याना ते कस कळणार? मी सहन केलं हेमाच्या प्रेमाखातर! शिवाय मी पडले स्त्री. तो पुरुष. प्रेमनिराशेमुळं तो उदासीन अगर वाह्यात बनला तर त्यात आश्चर्य कसचं? तरी पण त्याच्यासारख्या विद्वान तरुणाबद्दल केवळ लोकापवादामुळं आपलं मत वाईट करून घेण योग्य ठरेल का? हेमाला ते योग्य ठरेल; पण मी तसं का मानावं?

—पुनीतना विवाहपूर्व सहवासातील रहस्य कळल नाहीं हें एकपरी चागलच झाल. नाहीं तर हेमाची अवस्था अत्यत वाईट झाली असती. एकमेकावर पूर्ण विश्वास असण हेच लग्नातील खरं सौख्य! आणि यामुळच अज्ञान चागल, अतिज्ञान वाईट, अस वाटतं...'

आणि याच विचारसरणीमुळे प्रेमाला आज प्रथमच सुनीतबद्दल आदर वाटू लागला. 'प्रेमभगाच्या वैतागात त्याच्या हातून एखादी चूक घडली तरी ती त्याला क्षम्य आहे. मी रडत बसले. तो स्वैर बनला असेल. तो पुरुष आहे! माझ्या जागीं हेमा असती तर तिनं काय केलं असतं!' हेमाबद्दलचा हा विचार मनात येताच तिच्या अंगावर शहारे आले.

—हेमा त्याचा द्वेष करते, तो दूर जावा म्हणून झटते, फार काय त्याचं मरणही चिंतीत असते; याच कारण तो वाईट आहे म्हणून नव्हे, तर आपला विवाहपूर्व सहवास उघडकीला येऊं नये म्हणून! हेमाचं अन्तःकरण किती निष्ठुर!

—सुनीत किती चागला! पुनीतचा त्याचा इतका स्नेह, पण आज तोन वर्षांत हेमाबद्दल एक अक्षरही तो ुनीतकडे बोलला नाहीं. आणि आम्हींही कोणी त्याची चवकशी केली नाही. हेमान लोकवार्ता निर्माण केल्या आणि त्याची ज्याच्या त्याच्याजवळ उजळणी करीत आपल्याच नव्हे तर आमच्याही मनातून त्याला घालविण्याचा प्रयत्न चालविला; पण पुनीत मात्र त्याला विसरले नाहींत. ऐनवेळी तेच धावत गेले! यालाच म्हणतात खर निर्हेतुक प्रेम!!

—'हेमाचा सुनीतवर इतका राग का असावा,' याचा उलगडा अशा रीतीने झाल्यावर प्रेमाने एक प्रकारच्या सुटकेचा निःश्वास सोडला. सुनीतबद्दलचा पूर्वीचा आपलेपणा तिच्या अन्तःकरणात जागृत झाला आणि 'तो काहीं तसा वाईट नाहीं' असे नकळत्या मनाने ती चटकन् बोलूनही गेली

त्या उच्चाराने ती थोडीशी स्वतःशींच दचकली, पण विचाराना मिळालेली नवी दिशा काहीं तिला बदलता आली नाहीं. 'विनीत हा मध्येच धूमकेतूसारखा कशाला उगवला, त्याच्याशीं लग्न करण्याबद्दल हेमानं मला इतका आग्रह का करावा, मी अविवाहित राहिले तर हिच काय गेलं?' असल्या रुसव्याचा आविर्भाव तिच्यात निर्माण होत होता. 'मी एका बाबतींत हिचं ऐकल आणि मनाच माळरान करून घेतल, म्हणून आता याही तिच्या विनवणीला मान्यता द्यावी अस थोडच आहे? विनीतचा यात काय सबध! तो तर पक्का स्वार्थी आणि दुसऱ्याची पर्वा न करणारा दिसतो. आणि लग्नच करायचं तर मग सुनीत काय वाईट? वास्तविक आम्हा चौघात आम्हीं दोघच काय तीं प्रेमभगान तडफडत आहोत. माझ्या आणि सुनीतच्या एकलेपणाला हेमा आणि पुनीत हींच कारण झालेलीं. हेमान जाणून बुजून सुनीतच्या मनःस्थितीचा विचार केला नाहीं आणि पुनीतनीं माझं अन्तःकरणच जाणून घेतलं नाहीं. मग अशा स्थितींत आम्हीं दोघं–सुनीत आणि मी-एक झालों—'

मनुष्य विचार करू लागला म्हणजे त्याचे विचार कोणच्या थराला जातील याचा नेम नाहीं म्हणतात. तसेंच प्रेमाच्या विचारशृंखलेचें झालें.

साखळी विणता विणता ' सुनीतबद्दलच्या ऐक्यत्वाचा दुवा ' हाती येताच तिची तिलाच लाज वाटली आणि मग ती बसल्या जागेवरून उठून घरात आईजवळ गेली.

घरात जेवण तयारच होते. जेवताना आईबरोबर सुनीतसंबधींच तिच्या गोष्टी चालल्या होत्या. सुनीतवर आलेले सकट ऐकून प्रेमाच्या आईला फार दुःख झाले. कारण कॉलेज सुटताच प्रेमा–हेमाबरोबर तो नेहमी तिच्याकडे येत असे. त्याला आईबाप बहिणभाऊ वगैरे कोणीच नसल्यामुळे तिला त्याच्याबद्दल विलक्षण जिव्हाळा वाटे. मात्र हेमाचा त्याच्याशी होत असलेला अतिप्रसग तिला मुळीच आवडत नसे. त्याबद्दल ती सुनीतला वेळी अवेळीं पुष्कळ बोले, पण आता मात्र ती हेमालाच दोष देऊ लागली. ' हेमाने त्याच्याशी लग्न केल असत तर गोष्टी या थराला आल्या नसत्या. ' हे तिचे म्हणणे प्रेमाला मनापासून आवडले. तरी पण सुनीतच्या बाबतीत निर्माण झालेला हेमाच्या नाजूक प्रकरणाचा पेचप्रसग कसा सोडवावा याचा धागा तिला सापडेना. मात्र सुनीत समजस आहे, चागला आहे, तेव्हा त्यालाच भेटून त्याचा खुलासा विचारावा असे तिने ठरविले. सुनीत सध्या कुठे राहात असावा हे तिला माहीत नव्हते. विनीतला ते माहीत असणे शक्य होते. अर्थात् त्यालाच हाताशीं धरून हा सुगाव्याचा कायभाग उरकला पाहिजे असे तिने मनात योजिले

नतर विनीतसबधी बोलणे निघाले. प्रेमाच्या आईला विनीतची बरीच माहिती होती मध्ये एकदा त्याच्या लग्नाचीहि बातमी आपल्या कानावर आल्याचे तिला आठवले, पण तो बापाबरोबर लाहोरकडे राहात असल्यामुळे व तिकडेच तो शिकत असल्यामुळे त्याच्यासबधाची अलीकडची माहिती तिला नव्हती. तो आता बॅरिस्टर होऊन आल्याचे व येथेच कोर्टात काम करीत असल्याचे ऐकून तिला बरे वाटले. ' त्यान लग्न केल्याची बातमी खरी काय ? ' असे आईने विचारले, तेव्हा प्रेमा काहींशीं चकित होऊन ' नाहीं ' म्हणाली. आईनेही मग ' माझ्या ऐकण्यात चूक झाली असेल ' असे म्हणून तो विषय तितकाच ठेविला. प्रेमाला लग्नाच्या

बाबतींत काहीं विचारावयाचे नाहीं अगर सांगावयाचें नाहीं असे तिच्या आईनें ठरविल्यासारखेच असल्यामुळे विनीतसंबंधाने मनात असूनहि ती काहीं बोलली नाहीं. तरी पण ' विनीतला केव्हा तरी चहाला बोलीव ' असें म्हटल्यावाचून त्या म्हातारीच्याने काहीं राहवले नाहीं.

आणि याच धाग्याला धरून ' विनीतला येथे बोलवावें म्हणजे सुनीतचा पत्ता काढण्याला ठीक होईल. पुनीतला काहींच कळणार नाहीं.' अशी प्रेमाने नवी मांडणी केली.

---

## : ७ : : 'मी पूर्वींचीच प्रेमा आहे !'

सकाळीं बंगल्यासभोंवारच्या बागेंत जाऊन फुलझाडे आणि फळझाडें निरीक्षण करण्याचा प्रेमाचा परिपाठ असे. कारण त्या. झाडावर निरनिराळे प्रयोग करून त्याचे अवस्थातर करणे, त्यातील व्हिटॅमिन्सचे प्रमाण शोधून काढणे व मनुष्याच्या प्रकृतीवर त्याचा उपयोग करून पाहणें हा तिच्या रसायनशास्त्रातील एक आवडता विषय होता. आणि त्यात तिची बरीच प्रगतीहि झाली होती. त्यामुळें शहरात कोठेहि सहसा न आढळणारीं फुलें, फळें व वनस्पती तिच्या बागेत आढळत आणि त्यासाठीं काहीं युरोपीअन लोकसुद्धा तिच्या नर्सरी विद्येचे कौतुक करण्यासाठीं तेथे येत. त्या दृष्टीने पुष्कळाना तिचा उपयोग होई.

आज तिच्या नव्या डालियाला गर्द पिंवळीं व फारच मोठीं फुलें आलीं होतीं. तिने त्यातील दोन फुले तोडलीं आणि कौतुकाने त्याच्याकडे पहात ती स्वतःशीच हसत हसत म्हणाली, 'या फुलावर खरी सत्ता सुनीतची आहे. कारण त्यानीच तीन वर्षांपूर्वी याची प्रक्रिया मला सागितली. फुलाचे रंग बदलण्यात पुनीतपेक्षा त्याचेच कौशल्य विलक्षण आहे. औषधी प्रयोगात पुनीतची हुषारी विलक्षण पण या बागेच्या बाबतींत सुनीत अत्यंत चतुर—'

याच वेळी मोटारचा हॉर्न वाजल्यामुळें सहज तिने रस्त्याकडे पाहिले, तों विनीतची ऑस्टिन फाटकाशी थाबत असल्याचे तिला दिसलें. अर्थात् त्या फुलासह तिला पुढे होणे भाग पडले. विनीत एखाद्या आधाशाप्रमाणें यावेळीं तिच्याकडे पहात होता. डालियाच्या सान्निध्यामुळे तिचे उषादेवीला लाजविणारे स्निग्ध पण मादक सौंदर्य, स्मितहास्य आणि उभें राहाण्याची ढब त्याला अत्यत आकर्षक–विलोभनीय–वाटली.

त्याच्या त्या पहाण्यात कोणता हेतू आहे हें जाणत असताही प्रेमानें हंसतमुखाने त्याचे स्वागत केले आणि 'या ना आत' असें म्हटलें.

त्याला तेवढेच आमत्रण पुरे झाले. त्यानें मोटार आत घेतली आणि ती बद करून खालीं उतरत म्हटले, ‘ मी सकाळचा नेहेमींच फिरायला जातों. आत पाहिले तो हीं डॅलियाचीं फुले मला इतकीं नवीन वाटलीं कीं, त्याच्याकडे पाहिल्यावाचून मला पुढे जाववेनाच. इग्लडातही असलीं फुले क्वचितच आढळतात. ’

‘ मग चला तर घरात. चहापान इथच होऊ द्या. ’ असे म्हणून प्रेमा बगल्यात आली. कारण तशा स्थितींत तेथे ज्यास्त वेळ उभे राहाणे तिला प्रशस्त वाटेना. दृष्टीत उतू येत असलेली वासना शब्दात व्यक्त होण्याला वेळ लागणार नाही, आणि शब्दाने शब्द वाढत जाईल अशी तिला भीति वाटली. विनीतला इतकी सवलत द्यायला ती तयार नव्हती. अर्थात् आईची आणि विनीतची गाठ घालून देणे हेच तिला या वेळीं श्रेयस्कर वाटले.

प्रेमाच्या आईला विनीतच्या भेटीने आनद झाला. मागच्या अनेक गोष्टी निघाल्या. त्यात ‘ मी तुझ्या लग्नाची बातमी ऐकली होती.’ असे प्रेमाची आई म्हणाली तेव्हा विनीत दचकला आणि त्याने प्रेमाकडे पाहिले; पण ती दुसऱ्याच कसल्या तरी विचारात गढून गेली असल्याचे त्याला आढळल्यामुळे त्याने निश्चितपणाचा सुस्कारा सोडून ‘ त्या बाबतीत काहीं अर्थ नाहीं. तशी बोलणी चाललीं होतीं नुसतीं.’ असे म्हटले आणि दुसरा विषय काढला. प्रेमाच्या तीक्ष्ण नजरेला हा त्याचा लपंडाव थोडा विचित्र वाटला, पण ‘ आपण त्या गावचीच नव्हे ’ अशा रीतीने त्याच्या या सूक्ष्म हालचालींकडे दुर्लक्ष असल्याचे तिने दाखविले. विनीतला तिचा हा चाणाक्षपणा कळणे शक्यच नव्हते. विशेषतः **रूपलालसा आणि स्वार्थ यांत गुतलेलीं माणसे आपल्याच अहंकारांत मग्न असल्यामुळें इतरांच्या भावना आणि सूक्ष्म हालचाली यांच्याकडे त्यांचे लक्ष नसतें. आत्मप्रसाधन, आत्मप्रौढी आणि स्वतःचें सुख यांतच तीं मग्न झालेलीं असतात.**

चहापान आटोपल्यावर मधून मधून येण्याचे वचन देऊन विनीत जायला निघाला, तेव्हा प्रेमा त्याला पोंचविण्याच्या हेतूनें बाहेर येऊन

सहजच्या स्वराने म्हणाली, 'सुनीतची केस केव्हा चालणार ?'

'आठ दिवसात केस सुरू होईल, असे वकील म्हणाले. का बरें ?' विनीतने साशंकतेनें प्रेमाकडे पहात प्रश्न केला.

'तोंपर्यंत सुनीत एके जागीं राहील कशावरून ?'

'मग काय तो पळून जाईल म्हणता ? पुनीतला फसवील ?'

'का नाहीं पळून जाणार ? त्याच स्वतःचं अस घर तरी कुठं आहे !'

'घर नाही, पण दुकान आहे.'

'त्याच दुकान आहे ?' प्रेमाने कुतूहलाने प्रश्न केला.

'त्याच नाहीं. तो ते दुकान चालवितो म्हणतात. विशेष कोठे न मिळणाऱ्या सिमेंट कॉंक्रीटच्या विटा, कौले, वगैरे माल त्या दुकानात असतो.'

'तुम्हाला माहीत आहे ते दुकान ?'

'हो. पुनीतबरोबर मीच तेथे गेलो होतों.'

'पण मला नाहीं वाटत आता तो तिथ असेलस !'

'तुम्हीं येता माझ्या मोटारींतून ! प्रत्यक्षच पाहू. कारण पुनीतसाठीं मलाही तितकी खबरदारी घेतली पाहिजे.' तिला बरोबर घेऊन जाण्याचा सुवर्णयोग साधावा या आपस्वार्थी हेतूने तो म्हणाला.

'तर मग चला. मी आईला सागते ड्रायव्हर आल्यावर मोटार पाठवून द्यायला. तुम्हीं तसेच पुढ जा. मी येईन माझ्या मोटारींतून परत. बर पण पत्ता काय सागू आईला ?' प्रेमाने आत जाता जाता मागे वळून पहात विनीतला प्रश्न केला.

'गाधीचौक. पेट्रोल पपाजवळ.' मोटारचा दरवाजा उघडीत विनीतने उत्तर दिले.

'आपल्या मोटारींतून प्रेमा येणार' या जाणिवेने विनीत अगदीं हुरळून गेला होता. प्रेमा घाईघाईनें आत जात आहे असे पाहून तो आणखी म्हणाला, 'या ह मी मोटार स्टार्ट करतो.' आणि बोलता बोलत त्याने व्हराड्याच्या पायऱ्यापर्यंत मोटार आणलीसुद्धा.

आईला काय सागावयाचें ते सागून प्रेमा बाहेर आली आणि विनी-

तच्या टूसीटरमध्ये बसली. विनीतचा आनंद गगनात मावेना. त्या आनदाच्या भरात मोटारला त्याने अशी काहीं विलक्षण गति दिली कीं, नेहमीं मोटारींतून फिरणारी प्रेमाहि चकित झाल्यावाचून राहिली नाहीं. मधून मधून तो बोलत होता आणि तीहि त्याला उत्तरे देत होती. मात्र प्रेमाजवळ बसून मोटार चालविण्याचे कौशल्य आपणाला दाखविता आले या आनदात आपण किती आणि काय बोललो हे त्याचे त्यालाच कळले नाहीं.

पण जेव्हा ते ठराविक दुकान समोर दिसू लागले तेव्हा मात्र प्रेमाच्या निकट सहवासाला आपण अतरणार असे वाटून त्याला स्थलकालाचा बोध झाला. तो काहींशा खिन्नतेने म्हणाला, ‘ ते समोरचे दुकान. कॉंक्रिटच्या विटा, कौले रचून ठेविलीं आहेत, त्याच्या पलीकडे एका बाकावर सुनीत बसलेला दिसतो. तेव्हा तो काहीं कुठे गेला नाहीं हे ठरलेच. मग असेच मागे फिरायला काय हरकत आहे ? ’

विनीतचा मनोभाव प्रेमाने जाणला , पण तिला आता त्याचा सहवास नको होता. सहवासाचे कारण सपले होतें. विस्तवाशीं खेळ खेळल्याने चटका बसण्याचा सभव फार. अर्थात् योग्य उत्तर देऊन विनीतच्या सगतींतून मोकळे व्हावे हे बरे असे ठरवून ती म्हणाली, ‘ आता आलेच एथपर्यंत तेव्हा सहज त्याच्याशीं दोन शब्द बोलून जाईन. तोंपर्यंत माझी ‘ ओपेल’ही येईल. तुमचा बराच वेळ मी घेतला याबद्दल मला क्षमा करा.—’

बोलता बोलता ती मोटारींतून खालीं उतरली आणि चालूही लागली. अशा स्थितींत जास्त लगट करणे योग्य नाही असे ठरवून काहींशा रुसव्याने तिच्याकडे पहात आणि आपणहून सुनीतकडे चालून जाणाऱ्या भाग्याचा हेवा करीत ~~सुनीतने~~ आपली मोटार बाजूच्या रस्याला वळविली.

प्रेमा आपल्याशीं विश्वासाने वागते, जवळ बसून मनापासून बोलते, हितगुज करते, एकत्र प्रवास करायला तिला सकोच वाटत नाहीं, स्टीअरिंग फिरविताना सहज हाताला हात लागला—तो किती मृदु आणि मोहक स्पर्श–पण दचकली नाहीं, मधून मधून आपल्याकडे पहातांना

तिच्या डोळ्यात निराळेच तेज खेळत होतें वगैरे विचार विनीतच्या अन्तः-करणात एका मागून एक येत असल्यामुळे तिच्या सहवासाची संधि पुनः-पुन्हा कशी साधावी याची योजना त्याने चालविली होती; आणि मोटा-रच्या वेगाने त्याच्या त्या कल्पनातरंगाना मन मानेल तसा वाव मिळत होता.

—पण सुनीतकडे हिचे एवढे कसले काम, त्याच्यासारख्या बदमाष मनुष्याबरोबर बोलण्याची हिला इतकी कसली हौस! हे प्रश्न मनात येताच त्याच्या अन्तःकरणाला मत्सराचा तीव्र धक्का बसला. इतकेच नव्हे तर प्रेमाकडे ' आपली भावी वधू ' या दृष्टीने तो पहात असल्या-मुळे लग्न झाल्यावर तिला याबद्दल चांगलीच समज द्यावयाची असेहि मनातल्या मनात ठरविण्याला त्याने कमी केले नाहीं.

प्रेमाच्याहि मनात असेच, पण निराळ्या प्रकारचे विचार येत होते. ' मी आज अगदी जवळ जवळ बसून विनीतबरोबर येथवर आले, रस्त्यात किती तरी लोकांनी हे पाहिले, त्या पहाणाऱ्या लोकांनीं काय कल्पना केली असेल ? विनीतला सगळे लोक ओळखतात, त्याचं लग्न झालेलं नाही हेहि सर्वांना माहीत आहे. हे तर सर्वच जाणतात. मग मला आज अशा स्थितीत पाहून ते काय म्हणत असतील बरे ? आणि आता सुनीत तरी काय समजेल ?—'

पण या विचारातच ती त्या टाईल्सच्या दुकानात येऊन पोहोंचली. सुनीतने तिच्याकडे पाहिले; सुनीतलाहि तिने पाहिले.

आज तीन वर्षांनीं त्या दोघांची ही पहिली भेट होत होती. मोटारींतून उतरताना त्याने तिला पाहिले होतें. विनीतला तो ओळखीत होता. अर्थात्—

' अर्थात् हेमाच्या लग्नानंतर हिचेहि लग्न झाले नसेल ना ? आणि झाले असले तर हाच तिचा नवराहि असू शकेल. तर मग—'

तो तिच्याकडे पहात होता.

ती त्याच्याकडे पहात होती.

सुनीत दिसण्यात बाणेदार, छाती भरदार, डोळे पाणीदार, ढब

डौलदार, उंची मध्यम, आणि मुद्रा आकर्षक असा होता. प्रथमदर्श-नींच कोणावरहि तो आपली छाप बसवीत असे. त्याच्या डोळयात तेज होते आणि त्याचा त्याने अद्याप दुरुपयोग केला नव्हता. त्याचे गाल फुगीर असून नाक उच टोकदार व ओंठ बारीकच पण लालसर होते. रेखींव काळया मिशाना ते फारच शोभून दिसत.

प्रेमाने सुनीतकडे निरखून पाहिले. पूर्वीपेक्षा या वेळीं तो किती तरी चागला दिसत होता. तो बदमाप अगर गुन्हेगार किंवा उडाणटप्पू गुंड असावा असे तिला वाटेना. तिने किंचित् हसून त्याला नमस्कार केला आणि विचारले, ‘ का, ओळख आहे ना ? ’

सुनीतनेहि नमस्कार करीत हसून उत्तर दिले, ‘ आहे तर! पण आता प्रेमाबाई म्हणायच कीं पूर्वीप्रमाण —’

‘ इश्श ! बाई काय म्हणून !! मी पूर्वीचीच प्रेमा आहे. ’

का ते नकळे, पण या तिच्या उत्तराने सुनीतचे बरेच समाधान झालेलें तिला दिसले. त्याने जवळचीच एक खुर्ची पुढे सारून म्हटले, ‘ ह. मग बैस तर. प्रेमा, मी कुणालाहि विसरलो नाहीं, आणि विसरणहि शक्य नाहीं. त्या मोटारीतून—विशेषतः बॅरिस्टरसाहेबाजवळून तुला उतरताना पाहिल आणि—’

सुनीतने त्यापुढचे वाक्य उच्चारू नये असे प्रेमाला वाटत असल्या-मुळें ती चटकन् म्हणाली, समजल. बायकाप्रमाण पुरुषानाही नसती नातीं जोडण्याच व्यसन असत म्हणायच!’

‘ जाऊ द्या. तू का आलीस साग. काय पाहिजे तुला? माझा हा नवीन व्यवसाय तुला कळला असेलच.’

‘ व्यवसायाबद्दल मी आणखी केव्हा तरी विचारीन, पण त्यापेक्षा तुमच्या नवीन केसबद्दलच मला विचारायच आहे. ’ प्रेमा खुर्चीवर न बसताच इकडे तिकडे पहात म्हणाली.

‘ अस्स. चल तर आत बसून बोल. ’ असे म्हणून सुनीत आंतील दालनात गेला. प्रेमाहि त्याच्या मागोमाग निघाली—

पण याचवेळीं तिची मोटार बाहेर आल्यामुळें तिला मागें वळावें

लागले. तिनें शोफरला मोटार बंद करण्याला सांगितले आणि ती पुनः सुनीतकडे जाण्यासाठी वळली. तोंच आतून पंजाबी पोषाख केलेली तिच्याच वयाची एक तरुणी बाहेर आली. आणि खालीं पहात निघून गेली. ती दिसेनाशी होईपर्यंत प्रेमाची नजर तिच्यावर खिळून राहिली होती. मात्र ' मी असं का पहात आहें ! ' याचें उत्तर तिचें तिलाच देता येत नव्हतें. सुनीत दरवाजांत उभा राहून प्रेमाच्या त्या कुतूहलपूर्ण संशयित चेहेऱ्याकडे पहात होता. त्याची मुद्रा फारशी उत्साहपूर्ण नव्हती.

आणि हे जेव्हा प्रेमानें पाहिले तेव्हा काहीशी संकोचित होऊन ती त्याच्याकडे वळली. मात्र ' ती तरुणी कोण, आणि तिचा सुनीतशी काय संबंध ? मग लोकवार्तेप्रमाणे सुनीत हा तसा तर नसेल ? ' हा प्रश्न तिच्या कोमल आणि भावनाप्रधान अन्तःकरणाला अणकुचीदार काट्याप्रमाणे उगाच टोंचत होता.

जगांत घडणाऱ्या कोणत्याही कार्याला कांहीं ना कांही कारण असतें हे तत्त्व प्रेमाला माहीत नव्हतें असें नाही. पण प्रत्येक वेळीं कारणाचा उलगडा होणें अशक्य असल्यामुळे कार्याकडेच मनुष्याची नजर लागून राहिलेली असते आणि त्यावरूनच तो आपली अनुमानें ठरवीत असतो. मानवी जीवनांत जर कांहीं रहस्यमय असेल तर तें हेंच होय.

प्रेमा मोकळ्या अन्तःकरणानें केवळ बहिणीच्या–मैत्रिणीच्या कल्याणाच्या हेतूनें तेथें आली होती, पण सुनीतची तिची दृष्टिभेट होताच तिच्या अन्तःकरणांत नवीनच भावनाचा उदय झाला. त्याचें जीवन समजावून घेण्याची उगाचच तिला उत्सुकता वाटू लागली आणि त्याच भारावलेल्या मनानें तिनें पुढें पाऊल टाकलें.

## : ८ : : सहारा काव्य !

प्रेमा जरी धीटपणाने आत आली तरी एकदम तो प्रश्न करण्याचें साहस तिच्याने करवेना. ती काहीं वेळ इकडे तिकडे पहात राहिली. सभों वारच्या एकंदर सामानावरून सुनीतची राहाण्याची हीच जागा असावी, तो आपले एकाकी जीवन याच रुक्ष जागेत कंठीत असावा अशी तिची खात्री झाली आणि कींवही आली, पण नुकतीच बाहेर पडून गेलेली पंजाबी पोषाखातील तरुण स्त्री इथें का आली हा प्रश्न नजरेसमोर येताच तिला वैषम्य वाटले आणि त्या वैषम्याच्या क्षणिक ऊर्मींच्या जोरात तिनें त्याला विचारले, 'तुम्ही सध्या जामिनावर खुले आहा?'

'होय. विनीतबरोबर तू आलीस तेव्हाच मी या प्रश्नाचा अंदाज केला.'

सुनीतच्या या उत्तरात एक प्रकारची तीक्ष्णता आणि औदासिन्य अस-ल्याचें तिला जाणवले, पण तें लक्षात न घेता ती म्हणाली, 'कालच हेमाच्या घरी ही गोष्ट मला कळली. केस कोणत्या प्रकारची आहे हे तुम्ही जाणताच.'

'त्याचाच मी विचार करीत आहे.'

'मगनलालच्या दुकानात गेला तेव्हा हेमा तुमच्याबरोबर होती. तिला आपली पत्नी भासविण्यात आपण चूक केली असं नाहीं तुम्हाला वाटत?'

या प्रश्नाचे उत्तर देण्यापूर्वी सुनीतने एक दीर्घ सुस्कारा सोडला. नंतर तो प्रेमाकडे टक लावून पहात म्हणाला, 'प्रेमा, प्रत्येक मनुष्य एका अचिन्त्य अशा नियतिचक्राने बांधलेला आहे. तो जे करतो ते चुकीचे असतें कीं बरोबर असतें हे परिणामावरून ठरवावें लागतें. मीच तुला विचारतों, पुनीतबरोबर त्यावेळीं तू जे वर्तन केलेस ते एक अविवाहित कुमारिका या दृष्टीने योग्य होतें का?'

सुनीतच्या तीक्ष्ण आणि भेदक नजरेला नजर भिडविणें प्रेमाला अशक्य

झाले. ती खालीं पाहून म्हणाली, ' पण ती माझी मला निस्तारतां न येण्याइतकी सीमेबाहेर गेलेली गोष्ट नव्हती ! '

त्याबद्दल तूं पुनीतला मोठेपणा दे. तो तसा नसता तर तू आपण होऊन सीमा उल्लघन केली असतीस. माझ्या म्हणण्याचा अर्थ इतकाच कीं, माझ्याइतकीच हेमाही चुकीला पात्र आहे. तिने तितका अतिरेक केला नसता तर आज मला हे मृतासारखे जीवन कंठण्याची वेळ आली नसती. ती किती उतावीळ आणि भावनाविवश होणारी आहे हे तूं जाणतेस ! '

प्रेमाला यावर चटकन् असे काहीं उत्तर देता येईना. कारण हेमा किती उच्छृंखलतेने वागत होती, मिळालेल्या स्वातंत्र्याचा कसा अवास्तव फायदा घेत होती व सुनीतला तिने आपले खेळणे कसे बनविले होते याचा तिला विसर पडला नव्हता. अर्थात् दोषारोपाचा हा वाद व्यर्थ आहे असे ठरवून ती म्हणाली, ' आलेल्या प्रसगातून कसे पार पडायचे हे तरी ठरविले पाहिजे ना ? '

' हे म्हणणे मी मान्य करतो. मी मनुष्य आहे. सध्या जरी मी वाळवटातून चाललों असलो तरी पुरुष आहे. हेमा स्त्री आहे. एका उदात्त आणि प्रेमळ पुरुषाची ती सौभाग्यवती आहे. अपत्यवत्सल माता आहे. हिरवळ दिसली, तहानेने व्याकूळ होऊन मी तेथे गेलो पण त्या हिरवळीने विमुख होऊन मृगजळाचा मार्ग मला दाखविला. मनात नव्हते तरी भडकलेल्या अन्तःकरणाने मी मृगजळामागे धावत सुटलो आणि आज आज प्रेमा मला तडफडून मरण्याचा प्रसग आला ! मृगजळ ते मृगजळच. ज्या हिरवळीच्या आशेने मी थाबलो, जो मला माझा विसावा वाटला, ज्या स्फटिकवत् जलाशयाचा मी हव्यास केला त्या जलाशयाजवळून मला विन्मुख करणारा तो प्रवासी दोघडीच्या मुक्कामाचा कारवान ठरून पुढें चालला. ती हिरवळ एकटीच उन्हाचे वाफारे सहन करीत राहिली आणि मी––पण आता कशाला तो इतिहास ! प्रेमा तू आपल्या मैत्रिणीच्या कळवळ्यानें येथे आलीस ' अजूनही तुला ती मैत्रिणच वाटते !! तूं नावाप्रमाणे प्रेमळ आहेस !! मी तुला वचन देतों. हेमाबद्दल मी एक

शब्दही बोलणार नाहीं ' बोलता बोलता सुनीत स्तब्ध झाला. त्याने आपले ओंठ घट्ट मिटले.

प्रेमाला त्याचा तो अभिनिवेश जितका आकर्षक आणि लोभनीय वाटला तितकाच त्याच्या भाषणातील गूढार्थ रहस्यमय असल्याचा भास झाला. सुनीतच्या अन्तःकरणातील एक झाकलेले दालन अगदी सहजासहजी उघडले गेले असे वाटून ती पुलकित झाली; पण किती, क्षणभरच. हेमाच्या एकाच काळजीने आज तिचे अन्तःकरण व्याप्त झाले असल्यामुळे सुनीतचे ते सहाराकाव्य जाणण्याकडे तिचे लक्षच लागेना. तिने बऱ्याच वेळाने त्याच्याकडे पाहून म्हटले, ' मग. तुम्हीं हा प्रसग कसा निभावणार ते नाहीं मला सांगितलं !'

' तो प्रश्न वकीलाचा आहे. अपराध मान्य करून होईल ती शिक्षा भोगावी असे मी ठरविले आहे. ' पूर्ण विरक्तपणाने सुनीत म्हणाला.

' वकील काय म्हणतात ? '

' वकील म्हणतात पुरावा केला तरच मगनलाल यात यशस्वी होईल. '

' पण तो दागिना तर आहे ना ? '

' मीच तो घेतला असे सिद्ध करण्याची जबाबदारी त्याच्यावर आहे. '

' आणि ते सिद्ध करण्याला तो तुमच्या त्या—' प्रेमाला पुढे बोलवेना. कारण हेमाला त्याची म्हणण्याचा अनवस्थाप्रसग या वेळीं तिच्यावर आला होता. आणि हेमा तर पुनीतची पत्नी होती. सुनीतने ते जाणले आणि तो म्हणाला, ' समजलो. हेमाचा कसा बचाव होईल एवढेच तुला पाहायचे आहे. मग सुनीतचे काहीं होवो. मी जाणतों, ती आता एका कुलस्त्रीच्या बालेकिल्ल्यात जाऊन बसली आहे. पुनीत एक सत्पुरुष आहे; पण ही महामाया मात्र त्याला कलकरूप होऊन त्याचा अधःपात करणार! प्रेमा तूं वेडी आहेस. प्रेमळतेचा हा अतिरेक तुलाही त्रासदायक झाल्यावाचून राहाणार नाहीं. केवळ विलास, चैन आणि स्वार्थ यांतच हेमाला आनंद वाटतो तर तूं निःस्वार्थी प्रेमात आनंद मानतेस. तुझा भलताच फायदा घ्यावा असें हेमाला वाटतें. आणि या तुमच्या देवासुरयुद्धात माझा बळी देऊन तूं निश्चिंत होण्याचा प्रयत्न करीत

आहेस. ठीक आहे. तुला याचा पस्तावा होईल. मी पुनीतकडे पाहूनच तुला वचन देतो कीं तूं निश्चित राहा. हेमाबद्दल मला तिळभरसुद्धा आदर वाटत नाहीं. कारण उच्छृंखल वासनाच्या आहारी जाऊन माझ्या बेदिल मनोवृत्तींचा तिने भलताच फायदा घेतला. तो इतिहास फार मोठा आहे. पुनीतच्या अन्तःकरणाला धक्का बसू नये आणि तुलाही वाईट वाटूं नये म्हणून मी शिक्षा भोगीन. तू काळजी करू नको. पुराव्याचा प्रसग येऊ देणार नाही.'

प्रेमाला यापेक्षा जास्त खुलासा नकोच होता. मात्र सुनीतच्या भाषणातील सकेतस्थळे, त्रुटित भावना, आणि अव्यक्त हेतु याचा तिच्या मनावर बराच परिणाम झाला. प्रथमपासूनच आपली काहीं तरी चूक होत गेली असावी असा तिला आज प्रथमच सशय आला. तरी पण त्या सशयाचे परीक्षण करण्याचे हे स्थळ नव्हे आणि वेळही नव्हे असे मनात आणून ती उठली, तेव्हा सुनीत तिच्याबरोबरच उठून बाहेर येत म्हणाला, 'तू काहींच बोलली नाहीस, प्रेमा!'

'काय बोलू? मी आज एका नव्याच राज्यात पाऊल टाकले आहे असें मला वाटते. तरी पण हा प्रसग निभावून गेल्यानतर तुमच्या बोलण्यातील संदिग्धपणाचा मी विचार करीन.' एकेक पाऊल टाकीत प्रेमा बोलत होती.

'मला एवढेच आश्वासन पाहिजे. तूं एकदा स्वतःचे अन्तःकरण पहा. कारण ते आरशासारखे स्वच्छ असल्याबद्दल माझी खात्री आहे. तो त्रिकालदर्शी आरसा तुला सर्व काहीं सागेल. तू अजून आरशाकडे पाहिलेच नाहींस.'

'केव्हा पहाणार! एकेक प्रसगच तसे येत गेले. त्यात आताचा हा—'

'अः जाऊ दे. या बाबतींत माझ्यावर विश्वास ठेव. हेमाने उठविलेल्या लोकापवादाच्या आहारी जाऊ नको. कारण भूतकालावर पडदा पडावा म्हणून मला नाहींसा करण्याची तिची खटपट चालू आहे. आणि दुसरी एक सूचना करावीशी वाटते ती हीच कीं, विनीतच्या बाबतींत तूं सावध राहा. तुझ्या दयाळू आणि भावनाविवश अन्तःकरणाचा हेमाला भलताच फायदा घेऊं देऊ नकोस. अजून तूं स्वतंत्र आहेस.'

'तुमच सगळंच बोलणं मला गूढ वाटतं. यापेक्षा स्पष्ट असें कांहीं सांगाल का ?'

'नाहीं. ती वेळ अद्याप आली नाहीं आणि येईल असेही सागवत नाहीं. तरी पण तुझ्या कल्याणाच्या दृष्टीनें पण प्रेमा, मी नाहींच बोललों तर! जास्त बोलून आज त्याचा उपयोगच नाहीं. चालू केससबधानें तू काळजी करू नको. मगनलाल हेमाला स्पष्ट ओळखीत नसला तरी पुराव्यासाठीं मी आग्रह धरला नाहीं म्हणजे तो नसत्या शोधाशोधीन आपला वेळ गुतवणार नाहीं. त्या दागिन्याचे रहस्य, ज्याच्याकडे तो विकला गेला त्यालाच माहीत आहे. पण त्याने तर माझे नाव सागून त्या रहस्याला काळोखात ठेविले. आणि तुझ्या मनाला सुख व्हावे म्हणून मी ते पुढे आणणार नाहीं. सपला कारभार !'

सुनीतच्या या बोलण्याने प्रेमाचे मन अनेक शकाकुशकानीं व्याप्त झाले. सुनीत, हेमा आणि पुनीत या तीन व्यक्तीच्या बाबतीत मी काहीं चुकीच्या समजुती तर करून घेतल्या नाहीत ? असाहि तिच्या मनात प्रश्न उत्पन्न झाला, पण या ठिकाणीं फार वेळ थाबणे योग्य नाहीं असे जाणून ती आपल्या मोटारीकडे वळली. जाताना नुसत्या नजरेनेच तिने सुनीतचा निरोप घेतला. सुनीतनेही दूर कुठेतरी पहात मानेनेच तिला निरोप दिला. प्रेमाशी अनेक दिवसानीं नव्हे अनेक वर्षांनी बोलण्याचा प्रसग आला आणि तो आपण सदिग्ध असे बरेचसे काहीं बोलून व्यर्थ घालविला असेच त्याचे मन त्याला सागत होतें. आकाक्षित व्यक्तीची आकस्मिक भेट झाली म्हणजे विचारी माणसाचीही अशी अवस्था होते. मग सुनीत तर यावेळी एका बिकट प्रसगात सापडला असून त्याला त्यातून बाहेर निसटण्याचा मार्ग दिसत नव्हता. त्यात प्रेमाच्या या आगमनाने तर जास्तच भर पडली. मग तो काय बोलणार आणि काय करणार ? तरी पण प्रेमाला सावधगिरीची सूचना देता आली, एवढ्याच एका जाणिवेनें त्याने निश्चितपणाचा सुस्कारा सोडला आणि तिच्या जाणाऱ्या मोटारीकडे टक लावून तो पहात राहिला.

---

## : ९ : : गळलेलें फूल

पण सुनीतला जास्त वेळ त्या दिशेकडे पाहता आले नाहीं. बाहेर निघून गेलेली बुरखेवाली पंजाबी तरुणी पुन. तेथे आली आणि म्हणाली, ‘ क्या देखते है भाई ? येही बहुनाई है न ?’

‘ चलो. पगली काहा की ! अभी मै जजालमे फसा हू !’ सुनीतनें मागें वळून उत्तर दिले. त्याच्या चेहेऱ्यावर या वेळीं विषादपूर्ण हास्य चमकत होते. तरुणीला त्याची कींव आली. तिचाहि चेहेरा काहीं तितकासा प्रफुल्लित नव्हता.

थोडा वेळ थाबून ती म्हणाली, ‘ विनीत का मतलब तो और मालूम होता है ! वो बिचारी फसगई तो बडी मुष्कील हो गी !’

‘ विनीतको तुम पहछानती तो ?’

‘ हा. अच्छा तरहसे. उसने ही हमारा घर डुबाया. उस दिन अच्छा नहि देखाता इसवास्ते नहि बोल दिया. हमारे को फसानेवाला येही है !

‘ मीना, ये सच्ची बात है ?’

‘ भैया, मै झूठ बोलूगी ? हमारी कर्मकहाणी तो तुम्हारे को मालूम है. बापाजी बोल दिये थे न !’

आता मीनेची–त्या करुणीची–कर्मकहाणी सुनीतला आठवली. मात्र त्यातील नायक विनीत असेल अशी त्याची खात्री नव्हती. जामिनकीच्या दिवशीं मीनेच्या बापाने पुनीतबरोबर विनीतला पहाताच त्याला अस्पष्ट ओळखून गतायुष्यातील आपली कर्मकथा त्याला सागितली होती; पण सुनीतला विनीतबद्दल तितकी खात्री वाटली नव्हती. आज मीनेने आठवण करून देताच, ‘ प्रेमाबरोबर तो असता कामा नये ’ या नव्या अभिनिवेशात त्याला ती पटली, आणि त्या दृष्टीने विनीतच्या चरित्राकडे तो पाहूं लागला.

विनीत हा बॅरिस्टर म्हणून आला. बगल्यात राहाणारा एक बड

मनुष्य या एकाच दृष्टीने लोक त्याच्याकडे पाहू लागले. कामेही येऊं लागली. प्रसिद्धि आणि पैसा मिळू लागला. क्लबातील मंडळींत त्याची वाहवा होऊ लागली. अशा वेळीं त्याच्या गृहजीवनाकडे कोणीच लक्ष दिले नाहीं. शिक्षणात सगळा काळ गेल्यामुळे ‘ लग्नकार्याकडे लक्ष देता आले नाहीं. आता योग्य वधू पाहून लग्न करावयाचे.’ इतकीच त्याची भाषा असे. अर्थात् मोठमोठ्याच्या मुली परिचित होऊ लागल्या आणि आधुनिक चालीप्रमाणे प्रौढ वधूचा स्वतंत्र सहवासही त्याला लाभू लागला. लोक म्हणत ‘ काल बदलला आहे, हे असे चालायचेच.’

हा झाला पूर्वपरिचय. आता मीनेच्या वडिलानीं सांगितलेली हकीकत अशी. सुनीतला ती आठवावीच लागली. कारण प्रेमाशीं विनीतचा संबंध आला. प्रत्यक्ष त्याच्या मोटारीत त्याने तिला पाहिले आणि तो विनीत हा असा—

मीनेच्या वडिलानीं त्याला सांगितले होते, ‘ माझी मीना एकुलती एक मुलगी. लहानपणींच तिची आई वारली. घरची गरिबी. तरी पण जे काहीं करावयाचे ते तिच्या कल्याणासाठीच असे ठरवून मी नोकरी पत्करली. विनीतचे वडील हे माझे वरिष्ठ अधिकारी. स्वभावाने फारच चागले. नोकरीचे स्वास्थ्य लाभल्यावर मीनेच्या शिक्षणाकडे मी लक्ष दिले. विनीतची आणि हिची त्याच वेळीं ओळख झाली. सहशिक्षणामुळें तिचा त्याचा परिचय वाढत गेला. विनीतच्या घरीं तीहि जाऊ लागली. अशी काहीं वर्षे गेलीं आणि त्या परिचयाचे रूपातर प्रेमात होऊन विवाहाचें बोलणे निघालें. विनीतच्या वडिलाना केवळ माझ्या गरिबीमुळे हा विवाह मान्य नव्हता; पण विनीत हट्टाला पेटला. मीनाही अल्लडच. शाळेतील ओळख आणि साहचर्य. प्रेम म्हणजे काय, विवाहाचे बंधन केवढें दृढ असते, रीतरिवाज, स्वभावधर्म याचें रंग कसे पालटतात, पुरुषी मनोवृत्तीला स्थैर्यता कशाने व केव्हा येते, वगैरे गोष्टी तिला कळत नव्हत्या. सहवास आणि सलगीचे बोलणें याचाच तिच्या मनावर जास्त पगडा बसला. परिस्थितीची विषमता तिला पारखता आली नाहीं. वयसुलभ विकारानीं विचाराना बधिरता आणली. समजावणीचे बोल फोल

ठरले. वयसुलभ विकारामुळे विनीतची आकर्षक भाषा तिला रुचूं लागली. माझे पोक्त आणि दूरदर्शित्वाचे विचार तिला पसत पडेनात. अशा स्थितींत हा विवाह झाला.

—' पण विवाहानतर थोड्याच दिवसात मीना दुःखी दिसू लागली. विनीत कॉलेजात जाऊ लागला. विनीतचे वडील मीनेला चागली वागवीनात. साहचर्य सुटत चालले. विकारानतर विचाराचे प्राबल्य वाढलें. मीनेऐवजीं मिनार नावाच्या एका कॉलेजातील मैत्रिणीबरोबर विनीतचें सघटन वाढू लागले. मिनारचा बाप श्रीमत होता. दोघेही मोटारींतून फिरू लागलीं. विनीतच्या वडिलाना मुलाचा राग आला, पण बोलता येईना. मीनेलाच ते बोलू लागले. मीनेचा कोंडमारा होऊ लागला. अशीं तीन वर्षे गेली. मीनेने विनीतला या बाबतीत बारवार विचारलें पण विनीतचे एकच उत्तर कीं, ' माझ्या कोणत्याही बाबतीत तूं बोलता कामा नये. तू स्त्री आहेस. मी पुरुष आहे. मला ज्यात आनद वाटेल ते मी करीन. ' पुढे पुढे ही धुसफूस जास्तच वाढत गेली. मला काहीं बोलता येईना. मीनाहि माझ्याकडे बोलण्याला सकोचू लागली.

—पुढे विनीतने विलायतेला जाण्याचे ठरले वडलानीं त्याची सर्व व्यवस्था केली, या कारणाने तरी मुलाचे हे ढग सुटतील असे ते बोलले. मीना रडू लागली. आता आपले काय होणार असा तिला प्रश्न पडला. मला काहीच करता येण्यासारखे नव्हते. विनीतला भेटून मी बोलण्याचा प्रयत्न केला; पण तो माझ्याशीं मुळींच बोलेना शेवटीं एके दिवशीं मिनारला घेऊन तो विलायतेला गेला. मिनार वयात आलेली असल्यामुळें तिच्या वडिलानाही काहीं बोलता येईना. मात्र त्याचा परिणाम विनीतच्या वडिलावर फार झाला आणि त्यातच ते वारले. विलायतच्या खर्चासाठीं सगळा पैसा द्यावा लागल्यामुळे त्याच्या हातीं काहींच राहिले नव्हते. शेवटीं मीना माझ्याकडे आली. आता या गोष्टीला पाच सहा वर्षे होऊन गेली. मीनेचें दुःख मला पहावेना. त्यामुळे मी तिच्यासह घर सोडले. मिनारनें विलायतेत बरेच गुण उधळले. विनीतला तिने सोडून दिले. तरी पण तो हुषार असल्यामुळें बॅरिस्टर झाला; पण ' तुमचा माझा काहीं संबंध

नाहीं. मीनेला तिच्या वाईट वर्तनामुळे मी टाकली आहे' असें त्यानें मला कळविलें. मिनारच्या बापाने श्रीमतीच्या जोरावर विनीतला गोत्यात आणण्याचा बराच प्रयत्न केला. त्यामुळे त्याने उत्तर हिंदुस्थानातून गाशा गुंडाळला आणि दक्षिणेत पाऊल टाकले. त्याचे राहते गाव हेच आहे हें मला येथें आल्यावर कळले.—'

सुनीतला या सर्व कर्मकहाणीचे स्मरण झाले. विनीतबद्दल त्याला पराकाष्ठेचा तिरस्कार वाटला. प्रेमाला ही हकीगत कळली तर ती वेळींच सावध होईल, नाहीं तर परिणामीं पस्तावेल अशी त्याची खात्री झाली; पण स्वतःची सध्याची बिकट परिस्थिति ध्यानी येताच तो सचित झाला.

आपल्याला आश्रय दिलेल्या मानीव बंधूचा तो कोंडमारा मीनेच्याने पाहवेना. आपल्या वडिलाना ऐनवेळी पाच हजार रुपये देऊन विटाचा कारखाना सुरू केला म्हणूनच आज सुनीत सकटात पडले. त्याच्या आयुष्याचे वैराणवाळवट होण्याचा प्रसग आला आणि तो आणण्याला कारण आपलाच नवरा विनीत! काय ही घटना!! मीनेच्या मनात हा विचार येताच तिला रडू कोसळले. तिचे अन्तःकरण अनेक आघातानीं अगदी हळुवार झाले होते. मार्ग सुचत नव्हता. सुनीतही काही बोलेना. शेवटीं ती शातता असह्य होऊन ती म्हणाली, ' भैय्या, वो छोकरी का ठिकाना मालूम है?'

सुनीतने चमकून तिच्याकडे पाहिले तिचा अश्रुभाराक्रात चेहरा पाहून त्याला वाईट वाटले. तो स्वतःच्या काळजींत नव्हताच मुळीं. प्रेमाचें कसे होईल हीच त्याची चिंता. आणि त्यात मीनेचा हा प्रश्न. तेव्हा हिलाहि तिचीच काळजी वाटत असावी असे मनात आणून त्याने उत्तर दिले, ' अभी तो कुछ हुवाभी नही. वो छोकरी बडी हुषार है. देखेगे क्या होता है.'

सुनीतचा हा उदात्त स्वभाव पाहून मीनेला त्या दुःखाच्या प्रसगींही हसू आले. स्वतः पराकाष्ठेच्या संकटांत असतांहि दुसऱ्यासाठीं काळजी वाहणें हाच एक विचार नेहमीं ज्याच्या अन्तःकरणांत असतो त्याचे अकल्याण कधींच होत नाहीं' असें ती मनात

ह्णाली आणि एक दीर्घ सुस्कारा सोडून तिने त्याला सुचविले, ' उसकी ात मै नहीं सोचता भैय्या. तुम्हारीही सोचता हू. पाच हजार रुपये के ारे में तुम्हारे उपर जो आफत आयी है, जो मामला चल रहा है वो ैसा मिटेगा येही चिंता है. तुम तो उसकीही बात करते हो! क्या ुम्हारा उसका कुछ नाता है ? '

मीनेच्या या प्रश्नाने सुनीतचा चेहेऱ्यावर एक क्षणभरच स्मित हास्य चमकले. आणि पुनः तो विषादपूर्ण झाला, पण तेवढ्यात मीना काय समजावयाचे ते समजली आणि म्हणाली, ' ओ: ऐसा है ! अच्छा. तो उसका ठिकाणा अवश्यही हमारे को जानना चाहिये. उसके गहनेके ारेमे वोहि छोकरी तुम्हारे साथ थी ? '

' नही. नही. वो बात अलग है. ' असें म्हणून सुनीत उठला. त्याला आता हे बोलणे पुढे वाढावे असे वाटत नव्हते, पण त्या त्याच्या टाळा-ाळीमुळे मीनेची ती समजूत दृढ झाली, आणि या बाबतींत त्या तरुणी-च्याच अन्तःकरणाचा ठाव पाहिला पाहिजे असे ठरवून तिने विचारलें, ' उसका नाम तो बोलो. '

' प्रेमा. ' सुनीतने इतकेच उत्तर दिले आणि तो बाहेर येऊन गिऱ्हा-ईकाची वाट पहात बसला.

मीनेला मात्र ते त्याचे उत्तर उन्हपावसासारखे गमतीचे वाटले, आणि ती त्या धोरणाने प्रेमाच्या झालेल्या हालचाली आठवू लागली.



## : १० : : प्रेमाची तळमळ

आणि त्याच वेळीं तिकडे प्रेमाच्या मनाची तळमळ सुरू झाली. विनीत, पुनीत, हेमा या तिघाचीहि आठवण विसरून प्रेमाच्या अन्तः-श्चक्षूंसमोर सुनीतची विषादपूर्ण मूर्ति दिसूं लागली.

—'तुझ्या सुखासाठी' 'तुला सुख व्हावे म्हणून' 'तुला वाईट वाटूं नये म्हणून' हे सुनीतचे शब्द पुनः पुनः तिला ऐकू येऊ लागले. विनीतबरोबर लग्नाचे आलेले विचार, त्या सबधाची हेमाची खटपट, त्यात निर्माण झालेला सुनीतचा पेचप्रसग आणि त्यानतरची त्याची भेट हे चित्रपट डोळयासमोर येताच यात परमेश्वराचा काहीं तरी 'आन्तरः कोऽपि हेतु' असला पाहिजे अशी तिची मनोदेवता तिला ग्वाही देऊं लागली.

—पण ती बुरखेवाली तरुणी कोण, तिचा आणि सुनीतचा संबंध काय, ती अगदीं परिचितासारखी त्याच्याशीं का वागली, हे आड येणारे प्रश्न तिला सुटण्यासारखे नव्हते. मात्र गिऱ्हाईक या नात्याने काहीं ती आलेली नव्हे एवढे खास असे तिने ठरविले.

—मग ती कोण ?

—प्रेमाला या प्रश्नाचे उत्तर मिळेना, पण हेमा–सुनीतच्या पेचप्रसंगात हा विचारच कशाला? हेमाला त्यातून सोडविण्यापुरताच जर सुनीतचा विचार करावयाचा तर ती तरुणी कोण का असेना! शिवाय पुनीत-साठीं का होईना पण हेमाचे नाव न घेण्याचे सुनीतने मान्य केले आहे ना? झालं तर. आपल्या महत्त्वाच्या अडचणीचा तर निकाल लागला.

—पण यामुळे सुनीत कारावासात जाणार. दुःखी, विषण्ण आणि एकाकी सुनीत. सोज्वल, सुदर, सामर्थ्यवान आणि दुसऱ्याच्या सुखा-साठीं स्वतःच्या जिवाचें रान करणारा सुनीत अपमानाच्या खाईत पिचत कारावास पत्करणार!

—आणि त्याला कारण मी आणि पुनीत!

—हेमाबद्दल त्याचें मन केव्हाहि चांगले नव्हते आणि नाहीं. तिच्यावरचा त्याचा लोभ म्हणजे केवळ माझ्यावर असलेल्या त्याच्या प्रेमाच्या उपेक्षेचा अभिनिवेश!

—माझा आवडता पुनीत त्यालाहि प्रिय आहेच.

—पुनीतसाठीं मी माझ्या प्रेमाचा त्याग केला. आज त्याच्यासाठीं आणि माझ्यासाठीं सुनीत आपल्या सर्वस्वाचा त्याग करीत आहे. मग माझ्यापेक्षा सुनीत किती श्रेष्ठ! वास्तविक हेमा ही सुनीतची प्रेयसी. तिच्याशीं पुनीतने विवाह केला. कळून सवरून या गोष्टी झाल्या. वास्तविक पुनीतवर त्याचा राग असावयाचा, पण पुनीतबद्दल त्याचे अंतःकरण तळमळतें. मग हेमावर त्याचे प्रेम नव्हतेच तर! तो केवळ माझ्या उपेक्षेने आलेला कैफ होता. कैफ चढलेला मनुष्य विकारी असतो. विचारी नसतो. खरे पाहिले असता सुनीत माझ्यावरच प्रेम—

हा विचार मनात येताच प्रेमाचे अंग शहारलें. तिच्या सर्वांगावर रोमांच उभे राहिले. डोळे पाण्याने भरले. छाती भरून आली. सर्वांगातून कसली तरी एक विलक्षण चमक निघून गेल्याचा तिला भास झाला. क्षणभर ती बेभान झाली.

आणि याच वेळीं–‘माझा बळी देऊन तू निश्चित होण्याचा प्रयत्न करीत आहेस; पण याचा तुला पस्तावा होईल...मी पुनीतकडे पाहून तुला वचन देतो—’ हे सुनीतचे शब्द तिला आठवले. ‘पुनीतच्या प्रेमाखातर मी माझ्या प्रेमाचा होम केला, आता हेमाच्या प्रेमाखातर मी सुनीतला बळी देत आहे; पण हेमा इतक्या योग्यतेची आहे काय?’ हा विचार तिच्या मनात आला. हेमाचे पूर्वायुष्य–विवाहपूर्व स्वैरजीवन–तिच्या डोळ्यासमोर नाचूं लागले आणि—

—तिनें तो बेत बदलला. आपल्यासाठीं किती माणसे जिवत होरपळलीं जात आहेत याची हेमाला कल्पनाहि नसेल. ती स्वतःचें सुख तेवढें पहाते. आणि पुनीत? पुनीत म्हणजे केवळ बौद्धिक प्रेमाचा

पुतळा. देवमाणूस. लॅब्रोरेटरी आणि केमिस्ट्री यात रंगलेला! व्यवहारी जीवनात तो पंगूच ठरणार! माझे प्रेम त्याला पारखता आलें नाहीं. ते त्यानें पारखलें असते तर हेमाशीं विवाह करण्याला तो चटकन् कबूल झाला नसता. आत्यंतिक बौद्धिक सहकार्य हीच माझ्याबद्दलची त्याची कल्पना. आणि त्या त्याच्या उत्कट कल्पनेला मी विकारी प्रेमाचे स्वरूप देऊन सुनीतच्या सोज्वळ, प्रेमळ आणि उदात्त अन्तःकरणाला धक्का दिला. पुनीत पर्जन्य आहे तर सुनीत शेतकरी आहे. तृषार्त हेमा ओंजळभर पाणी पिऊन तृप्त झाली. मी वसुंधरेच्या डोळ्यानीं तो चमत्कार होऊ दिला. शेतकरी शेत तुडविल्याबद्दल विषण्ण झाला; पण शेतकरी, पर्जन्य आणि आणि वसुधरा याचाच कायमचा संबंध असतो. ओंजळभर पाणी पिऊन क्षणिक तृप्तीने चैन करणारीं स्वार्थी आणि सुखलोलुप माणसे वेगळीं! भाडवलशाहींतूनच तीं निर्माण होतात—

छे. तसे मी आता होऊ देणार नाहीं. सुनीतला वाचविला पाहिजे आणि पुनीतसाठीं हेमालाही निष्कलक ठेवणे भाग आहे.

आणि ती बुरखेवाली तरुणी?

असेल कोणी तरी! सुनीतबद्दल सशयाने साशंक होण्याचे मला कारणच काय? चैनी आणि स्वार्थी लोकाच्या सकुचित नजरेने त्याच्यासारख्या दिलदार तरुणाकडे मी का पहावे! मग पुनीतशीं माझ्या असलेल्या साहचर्याचा त्याने भलताच अर्थ केला तर?

पण आज त्याने तसा अणुमात्र संशय प्रकट केला नाहीं. उलट आम्हा दोघासाठीं आत्मसर्वस्व पणाला लावण्याला तो तयार झाला! केवढे त्याचे थोर अन्तःकरण! हेमावर प्रेम असतें तर पुनीतसाठीं त्यानें केव्हाच एवढा त्याग केला नसता.

—अर्थात् सुनीतचे प्रेम माझ्या एकट्यावरच—

आणि हाच निश्चित विचार तिला सुखकारक, आल्हाददायक वाटला. ती त्या धोरणानेच आलेला पेंचप्रसंग सोडविण्याच्या विचाराला लागली.

—कांही माणसें प्रेम अनुभविण्यापेक्षां प्रेमाची सुखानुभूति

जाणण्यांत व एकमेकांना अप्रत्यक्ष रीतीनें सुखविण्यांतच आनंद मानणारीं असतात. इतकेंच नव्हे तर या उत्कट विचारांतच त्यांना खरें सुख मिळतें. प्रेमाच्या साङ्गतेंत व परिणामांत विकाराचा अंश असल्यामुळें उत्कटतेंत थोडेसें तरी वैगुण्य येतेंच.

प्रेमाला याच विचारानीं नवा हुरूप आला, सशयाचे किल्मिष दूर झाले आणि अडचणीतून मुक्त होण्यासाठीं एका नव्याच साहसाला ती प्रवृत्त झाली. भावना उदात्त असल्यामुळे तिला त्यात वैगुण्य असे मुळींच वाटले नाहीं आणि मनात नसता विकल्पहि आला नाहीं.

सध्याकाळीं तिने मगनलाल सराफाला बोलवून आणले. त्यावेळचा पोषाख हेमाने सागितल्याप्रमाणे होता. सुनीतबरोबर हेमा ज्या पोषाखाने मगनलालच्या दुकानात गली होती तो पोषाख करण्यात तसे पातळ नसण्यात व तसलाच ब्लाऊझ घालण्यात तिने वैशिष्ट्य राखले होते. तसे करण्यात तिचा हेतु होता.

मगनलाल येताच तिने त्याला आपल्या खासगी बैठकीच्या खोलींत बोलविले. मगनलालला त्याचे आश्चर्य वाटले नाहीं. कारण मनपसंत दागिने पारखताना मोठमोठ्या लोकाच्या अन्तःपुरात जाण्याचा त्याला प्रसग येत असे. अर्थात् त्या प्रकारचेच हे काहीं तरी काम असेल असें त्याला वाटले.

तो त्या खोलींत आला तेव्हा प्रेमा डोकीवरून पदर घऊन अधोमुखानें खुर्चीवर बसली होती.

तो आत येताच तिने त्याला खुर्ची दिली. तोहि बसला आणि उत्सुकतेने व कुतूहलाने सभोंवार पाहू लागला. प्रेमाकडे त्याने ओझरतेच पाहिले पण तेवढ्या दृष्टिक्षेपाने कसली तरी मागची आठवण त्याला झाली. हा हा म्हणता सुनीतचे आपल्या दुकानातील आगमन त्याला दिसूं लागलें. तो प्रसंग, ती वेळ, देवघेवीचे बोलणे, निरनिराळ्या मोठमोठ्या किंमतीच्या कुड्या, चद्रहार, हिऱ्याच्या आगठ्या याचीं सुनीतने चालविलेली पारख आणि त्याच्या पत्नीचीं—बरोबरच्या स्त्रीची—त्या परीक्षला

मिळत असलेलीं अनुकूल–प्रतिकूल मते त्याला आठवूं लागलीं. त्यानें पुनः एकदा हळूच प्रेमाकडे पाहिले.

प्रेमाची नजर त्याच्या हालचालीकडे होतीच. तिने त्याची अपेक्षित अनुकूल वृत्ति जाणली, परिणाम पारखला आणि मदस्वरानें विचारले, ‘ शेटजी, सध्या आपण एका केसींत गुतला आहा, नाहीं का ? ’

‘ होय. सुनीतने माझ्या दुकानातील— ’

‘ ह. त्याबद्दलच मी बोलणार आहे. मला आपण ओळखत असाल.’

‘ नावाने ओळखत नाही, पण सुनीतबरोबर— ’ इतके म्हणून शेटजी थाबले. त्याना जे बोलावयाचे होते ते एकदम बोलवेना. कारण सुनीत-सारख्या एका लफंग्या मनुष्याच्या पत्नीचे नाते या थोर स्त्रीशीं कसें जोडावे याचा त्याला विचार पडला.

पण त्याच्या त्या उत्कट मनोवृत्तीचा वेळींच फायदा घ्यावयाचा असे ठरवून सहजच्या स्वराने प्रेमा म्हणाली, ‘ तुमची दृष्टि बरीच तीक्ष्ण आहे शेटजी. तुम्हीं ओळख विसरत नाहीं. दुर्दैवाने त्याच्या हातून त्यावेळीं ती गोष्ट होऊन गेली. आता घराण्याची अब्रू राखणे तुमच्या हातीं आहे शेटजी. ’

‘ तर मग त्या तुम्हीच त्याच्या पत्नी ! ’

‘ होय. ’ प्रेमाचा स्वर यावेळी किंचित् सकप असा झाला. ती पुढे म्हणाली. ‘ येऊ नये ती वेळ आली. पुरुषाची गोष्ट निराळी असते, पण स्त्रियाच तसे नसत. त्याना जपूनच पाऊल टाकावं लागत. शेटजी आप णहि घरदाज आहा. आपणालाही बायकामुल आहेत. कुलस्त्रिया किती अगतिक असतात हे तुम्हीं जाणता. यासाठीं ही केस या ठिकाणीच थाबेल आणि माझ्या अब्रूचे होणारे खेळ वाचतील अशी मला आशा आहे. मी आपलं नुकसान होऊ देणार नाही. ’

शेटजींच्या मनावर प्रेमाच्या या बोलण्याचा बराच परिणाम झाला. ते काहीं वेळ स्तब्ध राहिले. पण न्यायाधिशासमोर गेलेल्या केसीबद्दल आतां काय करावें हें त्याना कळेना. कारण केस उलटली तर उलट फौजदारी

होण्याची भीति! धर्म करता कर्म उभे राहायचे!! शेवटीं बराच वेळ स्तब्ध-तेत घालवून अधोमुख असलेल्या प्रेमाकडे पाहून ते म्हणाले, 'बाई, तुम्ही म्हणता ती गोष्ट खरी आहे, पण आता हे प्रकरण फारच पुढे गेले आहे. वकीलाला विचारल्यावाचून माझ्याच्याने काहींच सांगवत नाहीं.'

प्रेमाने एक दीर्घ सुस्कारा सोडला. कारण आपल्या या साहसात यश येणार याबद्दल तिला खात्री वाटली नतर ती म्हणाली, 'शेटजी, आपली एक बहीण अगर मुलगी या नात्यान तुम्ही माझ्याकडे पहात असाल तर या बाबतीत वकिलापेक्षा तुम्हींच स्वतःला योग्य सल्ला देऊं शकाल. कारण वकील हे शक्य तों कज्जा मिटवीत नसतात तर वाढवीत असतात अशी माझी समजूत आहे. तुमची जी नुकसानी झाली त्या-बद्दल मी आताच तुम्हाला पाच हजार रुपये देते आणि खर्चाबद्दल एक हजार जास्त इतक झाल्यावर मग आणखी काय राहिल? शिवाय यात खासगी द्वेषाचा वगैरे काही सबध नाहींच.'

हा बिनतोड युक्तिवाद ऐकून मगनलाल तटस्थच झाले. या तिच्या युक्तिवादावर काय बोलावे तेच त्याना सुचेना. आपल्याला अगदीं अल्पावकाशात इतकी नुकसान भरपाई मिळेल अशी त्याची कल्पनाच नव्हती वकीलामार्फत ही तोड झाली असती तर वकीलाने काही टक्के घेतलेच असते. मग असे करण्यात आपले काय नुकसान? पण केस कशी काढून घ्यावी? शेटजींना अडचण वाटली ती हीच. तरी पण या-वेळीं उत्तर देणे भाग आहे असे ठरवून ते म्हणाले, 'तुम्हीं सुचविलेला मार्ग मला पसत आहे; पण केस काढून घ्यावी कशी?'

'पुरावा अपुरा आणि सशयित केला म्हणजे झाल. आमच्या वकिलाला तेवढाच मुद्दा पुरेसा होईल.' सुनीतच्या बोलण्यात निघा-लेल्या मुद्याला अनुसरून प्रेमाने चटकन् उत्तर दिले.

आणि मगनलाल शेटजीनाहीं तिच्या या उत्तराचे कौतुक वाटले. ते म्हणाले, 'उलट अब्रूनुकसानीची—'

'नाहीं. त्याबद्दल मी खात्री देते. तुम्हाला त्याची परीक्षा नाहीं.

नाहीं तर तुम्हीं हा संशय घेतलाच नसता.' प्रेमाने विजयाच्या उत्साहाने चटकन् उत्तर दिलें.

शेवटीं शेटजींना ही तडजोड मान्य करावी लागली. प्रेमा तर त्या तयारीनेच बसली होती. लागलींच तिने नोटा पुढे केल्या.

शेटजी काहीं तरी लिहिण्यासाठीं म्हणून खिशातून फाऊंटनपेन काढूं लागले तेव्हा प्रेमा म्हणाली, 'लेखी काहीं नको. शेटजी तुमचा उदात्त स्वभाव आणि वचन हाच खरा लेख आहे. तुम्ही हे रुपये घ्या आणि केस सपवा ; म्हणजे झालें.'

प्रेमाचे हे शब्द ऐकून व्यवहारात तरबेज असलेल्या शेटजींनाही गहिंवर आला !

---

## : ११ : : 'संसार मे हमारा कोइ नही.'

जीविताची अखेर आली, मान-सन्मानाची आशा संपली, आणि सुखमय जीवनाची इतीश्री झाली म्हणजे मनुष्याला गत-कालाची आठवण होते. स्वैराचाराचा पस्तावा होतो. 'तसें केले नसतें तर आज हा प्रसंग आला नसता.' असे वाटूं लागतें. सुनीतचेहि तसेच झाले.

त्याला गतकाल आठवला. घरची श्रीमती होती. आपण एका भल्या मोठ्या वाडीचे मालक होतो. वडिलानीं आपल्या हातीं भरपूर पैसा दिलेला होता. शिक्षणात आपण हुषार होतो. प्रेमा, हेमा आणि पुनीत याच्या सगतींत आपले दिवस फारच मौजेत जात होते. प्रेमाचे भावना-प्रधान हळवे मन आणि तिची अभ्यासातील हुषारी पाहून आपल्या अन्तःकरणात तिच्याबद्दल पराकाष्ठेचे आकर्षण निर्माण झाले, पण पुनी-तची केमिस्ट्री तिला आवडल्यामुळे ती त्याच्याबरोबर नेहमी रगून जाऊं लागली. हेमा शिक्षणात यथातथाच; पण हौसमौज करण्यात तिची नेहमीं तयारी. प्रेमा आणि पुनीत केमिस्ट्रीसारख्या रुक्ष विषयात गुगून गेल्याचे पाहून त्या अभिनिवेशात हेमाची सगत आपल्याला गोड वाटली. हातात मुबलक पैसा आणि चैनीत आनद मानणाऱ्या हेमाची सगत! वडिलानीं तिला दिलेले स्वातत्र्य! या सगळ्या गोष्टी आमचे दोघाचेही अभ्यासाकडे दुर्लक्ष्य होण्याला कारण झाल्या.

—त्यातच लॅबोरेटरींत सतत गुगून जाणाऱ्या प्रेमाने माझा तिरस्कार करून पुनीतशीं जोडलेली मैत्री. अर्थात् माझा तोल सुटला. हेमा मला आधाराला मिळाली. तिच्यात मी रगून गेलों. कोणाच्या निदा–स्तुतीची पर्वा केली नाहीं. पुनीत म्हणजे पक्का केमिस्ट. प्रेमाचे त्याला सहकार्य. दोघेंही त्यात गढून गेलेलीं.

—प्रेमाला मी सूचना दिली. 'भावी आयुष्य केमिस्ट्रींत घालविणें

योग्य नाहीं. गृहजीवन रुक्ष होईल. सशोधकाना ससार नसतो. हिंदुस्थानात केमिस्ट्रीच्या संशोधकाना मान नाही. त्याच्या शोधाची कदर कोणी करीत नाही. पुनीत पुरुष आहे. तो त्यात मुबलक पैसा घालू शकेल. हौस म्हणून आयुष्य घालवील. बौद्धिक सहकार्य हे गृहजीवनाला निरुपयोगी आहे. कौटुम्बिक जीवन आणि प्रेम याचा सशोधकाना गधही नको असतो. भावी जीवनात तुझी फसगत होईल—'

पण प्रेमाने ते ऐकले नाहीं. आकस्मिक आलेल्या एका सकटातून मी तिला जीवदान दिले असताही उलट माझा अपमान केला. पुनीतला सर्वस्व मानून ती राहिली. पुनीत तसा चागला; परोपकारी, पण व्यवहारात अगदीच विसरभोळा. प्रेमाचा हेतु त्याने जाणला नाहीं. फक्त तिचें बौद्धिक सहकार्य त्याला आवडले आणि त्याची आवड प्रणयपूर्ण आहे असे प्रेमाने मानले. आपला हेतु बोलून दाखविला नाहीं.

—हेमा तर त्या दोघाचा उपहासच करीत असे. प्रेमभंगामुळे मला तिचे ते वर्तन पसत पडले. विकारानी विचाराची माती केली आणि त्या धुंदींत हेमाचा गुलाम बनून ती नाचवील तसा मी नाचलो. पाण्यासारखा पैसा उधळून तिच्या मन मानेल त्या हौसा भागविल्या. प्रेमाने हेमाला या बाबतींत सावधगिरीचा इषारा दिला. पण उलट हेमाने तिचीच थट्टा केली. प्रेमाच्या सागण्यावरून पुनीतने माझी कानउघाडणी केली, पण प्रेमाच्या बाबतींत झालेल्या प्रेमभगामुळे मला पुनीतचे ते बोलणे आवडले नाहीं. नतर आम्हीं दोघेही त्या दोघाना टाळू लागलो. कॉलेजात महिना महिना पाऊल ठविले नाहीं.

—तरी पण प्रेमळ प्रेमाने हेमासाठीं नव्हे तर पुनीतसाठीं कमालीचा आत्मत्याग करून हेमाला आपली जागा दिली. हेमा सुखी झाली. मी कफल्लक बनलेला पाहून हेमाने हा योग साधला प्रेमाच्या हळव्या आणि प्रेमळ मनाचा तिने फायदा घेतला. पुनीतलाहि त्यात काहीं वाटले नाहीं. कारण प्रेमाचे प्रेम आपल्यावर आहे याची त्याला जाणीवच नव्हती.

—अशा रीतीने प्रेमा आणि मी अगदीं नकळत सहारा वाळवंटात येऊन पडलो. प्रेमा सहनशील. पुनीतचें सुख तेंच आपलें सुख मान-

णारी. त्यामुळे प्रेमभंगाच्या असह्य अन्तर्वेदना तिने सहन केल्या. हेमाला तिच्या दुःखाची कल्पनाहि करता आली नाहीं. **स्वतःचे सुख शोधणाऱ्यांना दुसऱ्यांच्या सुखदुःखाची मुळींच पर्वा नसते. त्यांना इतरांचीं अन्तःकरणे पारखण्याची संवयच नसते. दुसऱ्यांना काय वाटेल हें त्यांच्या गांवींहि नसते.** नाहीं तर 'तेवढ्या किमतीचा चन्द्रहार घेण्याची मला आज ऐपत नाहीं.' एवढे म्हणताच हेमानें एकदम माझा त्याग केला नसता. तेवढ्या एका गोष्टीने ती माझ्याबरोबर केलेले सगळे विलास आणि रगढगती विसरून गेली. पुनीतशीं विवाह करण्याचा वडिलाकडे तिने हट्ट धरला आणि विवाहाच्या व प्रेमाच्या बाबतींत अनभिज्ञ असलेल्या पुनीतने केवळ तिची केविलवाणी नजर पाहून विवाहाला मान्यता दिली. प्रेमाबद्दल त्याने विचारहि केला नाही.

—हेमा मला विसरली आणि पुनीत प्रेमाला विसरला. लॅबोरेटरीच्या सहकार्यात प्रेमाची प्रणयास्पदता आहे हे पुनीतच्या लक्षातहि आले नाहीं. त्यामुळे आपल्या विवाहाने दोन माणसाना आपण दुःखी केले हे त्याला आजपर्यंत कळलेले नाहीं.

सुनीतला आपल्या आठवणींतील हे सगळे प्रसंग स्मरले. त्यानंतरची स्वतःची अनुकपनीय स्थिति, घर-वाडी विक्रीमुळे आलेली निराधारता, लाला रामशरण—मीनेचा बाप—याला कॉंक्रिट टाइल्सच्या कारखान्यासाठी दिलेल्या पाच हजार भाडवलामुळे आलेला कारावासाचा प्रसंग, प्रेमानें केलेल्या विनतीवरून चालू केसमध्ये हेमाचे नाव न घेण्याबद्दल केलेला निश्चय आणि या सर्व अडचणीमुळे स्वतःची सर्वत्र होणारी नाचक्की निमूटपणे सहन करण्याची प्रवृत्ति, वगैरे गोष्टी एकामागून एक त्याला आठवू लागल्या. **श्रीमंतीच्या धुंदींत विकारांचे प्राबल्य वाढल्यामुळें बेभान होऊन मनुष्य कोणकोणतीं अनन्वित कृत्यें करतो, त्याला तशाच प्रकारच्या संगतीसोबतीचे साहचर्य कसे मिळतें आणि शेवटीं एकट्यालाच सर्व आपत्तीला तोंड देण्याचा प्रसंग कसा येतो** हें त्याला दिसू लागलें. इतकेच नव्हे तर एके काळीं असलेले मित्रहि

उपहास करण्यात कसा पुढाकार घेतात याचेही त्याला प्रत्यत्तर आलें.

—जिच्यामुळे आपण आपल्या सर्व वैभवाला पारखा झालों त्या हेमानें आजच्या या पडत्या कालात आपले शत्रुत्व करावे, उडाणटप्पू म्हणून उपहास करावा आणि तिच्याच अब्रूच्या सरक्षणासाठीं स्वत:वर कारावासाची पाळी यावी यापेक्षा दैवाचे विडबन आणखी कसले व्हायचे !

वास्तविक सुनीतची मनधरणी हेमानेच करायला पाहिजे होती. तिने तो दागिना उचलला. पैसे भरण्यासाठीं घर गहाण टाकून सुनीत मोकळा झाला. तेवढ्यात दुसऱ्या एका स्नेह्याचे तोड बद करण्यासाठीं हेमानेच तो दागिना सुनीतच्या नकळत विकला. आणि पुनीतशी विवाह करून ती कुलस्त्री बनली.

याच वेळीं लाला रामशरण याने आपली विपन्नावस्था सुनीतला सागितली व कॉक्रीटच्या निरनिराळ्या वस्तू बनविण्याबद्दलचे आपले कौशल्य वर्णन केले. सुनीतला हेमाच्या विवाहाचा धक्का बसलाच होता, त्यामुळे या दागिन्याच्या भानगडींत तिला चागलीच अद्दल घडवावी म्हणून त्याने हातीं असलेले पाच सहा हजार रुपये सराफाला न देता लालाला देऊन टाकले. आणि तो परागदा झाला. स्वत:च्या जीविताचाच त्याला कंटाळा येऊन गेला होता; आततायी बनून आत्महत्त्या करताना त्याच्या डोळ्यासमोर प्रेमाच्या भावी आयुष्याचा बिकट प्रश्न उभा राहिला; तिच्यावर त्याचें निरतिशय प्रेम होते. शिवाय पुनीतबद्दलहि त्याच्या मनात अढी नव्हती. तेव्हा पुनीतच्या साहाय्याने सर्व प्रसगातून निभावून योग्य प्रसंगीं प्रेमाची सहानुभूति मिळवावी म्हणून तो परत आला. या सगळ्या परिवर्तनात त्याचीं दोनतीन वर्षे सहज निघून गेली. तोंपर्यतच्या इकडच्या काहींच घडामोडी त्याला कळल्या नाहींत. हेमाने उठविलेले काहूरहि त्याला तेथे आल्यानतरच कळले. प्रसग आणिबाणीचा जाणून लालाकडे तो नोकर म्हणून राहूं लागला आणि तेथेच मगन लालने फसवेगिरीच्या आरोपाखालीं त्याला पोलिसाकडून पकडला. त्याच्या सगळ्या आशा आकाक्षा धुळीला मिळाल्या; पण त्याचवेळीं खऱ्या मित्राप्रमाणें पुनीत पुढें सरला आणि लाला रामशरणनें वकील वगैरे

देऊन खटपट केली. आजचा सुनीतचा मोकळेपणा हें त्याच खटपटीचें फळ होय.

पण प्रेमाच्या आकस्मिक आगमनानें आणि पुनीतच्या जामिनकीनें हेमाच्या बाबतींत सुनीतला मुग्ध बनण्याचा प्रसंग आला. अर्थात् कारावास आणि बेअब्रू याशिवाय गत्यतरच नाहीं अशी त्याची खात्री झाली.

—प्रेमा आणि पुनीत याच्या अवघड बालेकिल्ल्यात जाऊन बसल्या-मुळे हेमा सुसरक्षित झाली, याचे त्याला वैषम्य वाटले. पुनीतच्या पुण्याईमुळेच हेमा बचावली; नाहीं तर या वेळीं तिला आत्महत्याच केली पाहिजे होती. विवाहपूर्ण सहवासाचे कटु फल तिला मिळालें नाहीं. आजकालच्या समाजांत विशेषतः पैसा आणि पुनीतसारखे साधेभोळे पुण्यपुरुष ज्यांना लाभतात अशा कांहीं सुशिक्षित आणि पूर्वसहवासपुनीत स्त्रियांच्या सत्यकथा अंधारांतच अदृश्य झालेल्या कोठे कोठे आढळून येण्याचा सभव आहे.

—सत्यकथा असत्य ठराव्या असत्यकथाना वास्तवतेची प्रसिद्धि मिळावी असा आजकालचा दडकच आहे. अस्सल सुवर्णापेक्षा नकली आणि गिलिटाच्या सोन्यालाच आजच्या काळात मान आहे. अस्सल सोन्याचे दागिने आजच्या फ्याशनला चालतच नाहींत. दिखाऊ देखा-व्याना भुलणारेच फार. अस्सलपेक्षा नकलेचीच किंमत जास्त......प्रेमा-सारखा सोज्वळ कुमारिकाचा अन्तर्दाह जाणणारे फारच थोडे...

दुर्भाग्याच्या भाराखालीं भारावलेल्या सुनीतचे हे मनोगत विचार आणखी किती तरी लाबले असते; पण याच वेळीं तेथे खुद्द लाला रामशरण हे आल्यामुळें त्याला तेवढ्यावरच ते आवरते घ्यावे लागले.

‘ बखत बडा बाका है. ’

“ तो क्या ऐसा सोचनेसे सीधा हो जाये गे? चिराग तो लगा दे. ’

‘ हा लगाता हू. बैठो ’ असे म्हणून सुनीतनें डीझचा दिवा लावला आणि लालाजींना नमस्कार केला.

‘ सुखी हो बेटा. मीना विनीत के बारे मे अभी बोलती थी. उस दिन

बकालातूखाने मे हमभी उसकू देखा था. उसके बारे मे हम कुछ करने चाहते है. ”

‘ अभी देर है लालाजी. मैं कारागारमे जानेवाला हू— ”

‘ क्यौ ?’ लाला रामशरणाने आश्चर्याने विचारले.

‘ हमारी इच्छा ! ’

सुनीतच्या या उत्तरावर लाला रामशरणाला काय बोलावे तेच सुचेना. कारण ते त्याच्यामुळेच एका कारखान्याचे मालक बनले होते. विपन्नावस्थेत त्यानेच त्याना आधार दिला होता. चालू केसमध्ये सुनीत सर्वस्वी निरपराधी असावा अशी त्याची कल्पना होती. त्याचे पूर्वचरित्र त्याना माहीत नव्हते.

लालाजी स्तब्ध राहिलेले पाहून सुनीतला आपले उत्तर तुटकपणाचे वाटलें. तो काहींसा भानावर येऊन म्हणाला. ‘ लालाजी, ससारमे हमारा कोई नहीं. मै अकेला हू. सब आशा आकाक्षा खतम हो गयी है. तो काराबासमे क्या और कारखाने मे क्या ! किधर भी रहू गा. ’

‘ तो फिर बाहरही क्यौ नही रहते ? ’

‘ उसका कुछ कारन है. ’

‘ हा. कारनसेही कार्य होता है. जो चिराग अभी तुमने सिलगाया, वोही चिराग दिलमे रखकर बोलो, तुम निरिच्छ हो गये है ? ’

लालाजीच्या या प्रश्नाला काय उत्तर द्यावे हे सुनीतला एकदम सुचेना. कारण शक्य तर मानमरातबाने आयुष्य घालवून प्रेमाचे प्रेमसंपादन करावें अशी त्याची इच्छा होती, पण हेमासाठीं प्रेमानेच त्याला कारावासाचा मार्ग दाखविल्यावर तो तरी काय करणार ? आणि हे कारण लालाजींना कसे सागणार ?

तो काहींच बोलत नाहीं असे पाहून लालाजी म्हणाले, ‘ तुम जजालमे फसगये हो. यह आखिरका वखत है. जीवन बरबात करनेका अख्त्यार तुम्हारा नहीं है. परमात्मा यह मुसीबतसे तुम्हारेको बचायेंगे. निश्चित रहो बेटा. कारखानेकी सब हालात अच्छी है. विनीतके बारेमे मीनाके वास्ते हम कुछ कारवाई करना चाहते हैं. मिनारका

वालीद इधर आनेवाला है. कारखाने के बारेमे उसकी सहायता अवश्यही मिलेगे. फिर मिनाका भी कल्याण हो जायेगा. इतनाही नही. लेकिन तुम्हारी घरवाडीभी वापिस लेनेकी कोशिस करे गे. पुनीत अच्छा अदमी है. निराश होना मर्दका काम नही. तुम्हारा तक्दीर अच्छा है. सोच समझकर आगे बढो. रोना धोना छोड दो. तुम्हारा दिल क्या बोलता है, यह मीना हमारेको कह चुकी है.'

लालाजी काय बोलत आहेत तेच सुनीतला कळेना. निराशेच्या खोल-गिरिगव्हरात आपण लोटले जात असताना एकाद्या देवदूताप्रमाणे कोणी तरी येऊन ' भिऊ नको ' असे म्हणावे याचा अर्थ काय, याचाच त्याला विचार पडला.

तो काहींच बोलत नाही असे पाहून लालाजींनीं त्याचा हात धरला आणि म्हटले, ' चलो कारखानेमे जाये गे. अकेला रहनेसे तुम्हारा दिल टूट जायेगा.'

नतर सुनीत काही न बोलता लालाजीमागून चालू लागला.



## : १२ : : विनीतचें विचित्र विधान !

गेले दोन तीन दिवस पुनीत–विनीतची भेट झाली नव्हती. हेमाहि एक प्रकारच्या काळजींतच मग्न झालेली होती. पुनीत आपल्या लॅब्रोरेटरींत गढून गेला होता, पण आज जेव्हा विनीत आला तेव्हा दोघाहि पति-पत्नींनीं त्याचे गोड भाषेने स्वागत केले. विनीतचाही विषण्ण चेहेरा कांहींसा प्रफुल्लित झाला.

निरनिराळ्या गोष्टींवरून विनीतचे बोलणे प्रेमाकडे वळले. तो म्हणाला, 'तुम्हीं कांहीं म्हणा; पण प्रेमा कांहीं तितकीशी व्यवहारचतुर नाहीं. तिच्या शिक्षणाबद्दल तुम्ही उगाच प्रशंसा करता. मी तर तिला सर्व-सामान्य स्त्रियाप्रमाणेच मानतों.'

विनीतचें हें विधान ऐकून पुनीत आणि हेमा दोघेही हसूं लागलीं. विनीतच्या अल्पज्ञानाची त्याना कींव आली. हेमाने विचारले, 'भाऊजी, हे तुम्हीं कशावरून बोलता?'

'स्वानुभवावरून.' विनीतने एकदम उत्तर दिले आणि या आपल्या विधानाच्या समर्थनार्थ तो म्हणाला, 'सगळया जगाच्या निंदेला पात्र झालेला आणि गुन्हेगार ठरलेला सुनीत तुम्हीं जाणताच. त्या सुनीतवर ही प्रेम करते.'

पुनीत जोराजोराने हसून म्हणाला, 'बॅरिस्टर साहेब, तुम्हीं साफ चुकला. तुमची सगळी विद्वत्ता आणि हुशारी व्यर्थ गेली. सुनीतवर ती कधींच प्रेम करणार नाहीं.'

'आणि मीहि तसेच म्हणते. सुनीतचा तिने अनेकदा अपमान केला आहे, तीक्ष्ण उपदेश केला आहे आणि त्याचें कोणतेही बोलणे ऐकून घेण्याचें तिनें अनेकदा टाळले आहे. तुमचे हें विधान तुम्हीं परत घ्या.' हेमानें दुजोरा दिला.

पण विनीतचें समाधान झाले नाहीं. तो आवेशाने म्हणाला, 'त्याच्या

भेटीला ती गेल्याचे मी पाहिलें आहे आणि तो तिला भेटण्याला आला असता मला अप्रत्यक्ष रीतीने निघून जाण्याची सूचना तिने केली आहे. ते दोन प्रसग माझ्या डोळयासमोरचे आहेत. सुनीतच्या बाबतींत प्रेमाचे हें वागणे प्रेमनिदर्शक नाहीं असे कोण म्हणेल?'

तुमचा काहीं तरी गैरसमज झालेला दिसतो. सुनीतकडे तिचे काहीं महत्त्वाचे काम असले तर! अथवा त्याच्या दुकानातील नवीन टाइल्स-बद्दल तिला काहीं विचारावयाचे असले तर?'

'शिवाय ती काहीं आता लहान नाहीं. तुम्हीं तरी तिच्या बाबतींत असा आक्षेप का घ्यावा?' हेमाने विचारले.

'का घ्यावा? तिला पसंत करण्याबद्दल—'

'अस्स, तुमची भावी पत्नी म्हणून तिने कोणाशींही बोलूं नये होय?' हेमा हंसून मध्येच म्हणाली.

'शिवाय आमची निवड आम्हीं तिला सागितली. तिचे मन कुठें अजमावले आहे?' पुनीतने शका काढली.

'तुम्हाला नाहीं कळायचे ते. या बाबतींत तुम्हीं अनभिज्ञ आहा.'

विनीतच्या या बोलण्यावर पुनीत हसला आणि हेमाला म्हणाला, 'तर मग मी माझ्या लॅबोरेटरींल महत्त्वाचे काम संपवून येतों, तोपर्यंत तुमचे बोलणे चालू द्या.'

पुनीत हंसत हसत निघून गेलेला पाहून विनीत म्हणाला. 'हा रागावला तर नाहीं!'

'नाहीं. राग म्हणजे काय हे त्याना माहीतच नाहीं. पण भाऊजी प्रेमाबद्दल तुम्हीं अगदींच अनभिज्ञ दिसता! प्रेमाचे स्थान अन्तःकरण आहे हें तुम्हीं जाणता ना? शिवाय तुमची आणि प्रेमाची नुकतीच कुठें ओळख झालेली. तितक्यात तुम्हीं प्रेमावर अधिकारहि गाजवूं लागला! स्त्रियासंबंधानें तुमची समज तरी काय आहे?'

'माझी समज काहीं असूं दे; पण हा असा प्रकार चालल्यास शेवटीं तुम्हा दोघानाही पस्तावण्याची पाळी येईल.'

हेमा हंसून म्हणाली, 'ते आमचें आम्ही पाहून घेऊं. कारण प्रेमाला

मी पूर्णपणे जाणते. पण मी म्हणते, प्रेमा सुनीतवर प्रेम करू लागली तर त्याला आम्हीं काय करणार? तिचा तो अधिकार आहे!!'

'मी कबूल करतो. या बाबतीत ती स्वतंत्र आहे, पण स्वातंत्र्याचा दुरुपयोग करून ती जर स्वतःच्या गळ्यावर सुरी फिरवू लागली, तर तुम्हीं तिला अडवू नये काय?'

'प्रेम करणे आणि गळ्यावर सुरी फिरविणे या गोष्टी भिन्न आहेत'

'पण एका दुराचारी आणि फसव्या मनुष्यावर प्रेम करणे म्हणजे स्वतःच्या गळ्यावर सुरी फिरविणेच नाही तर काय? तिच्या आयुष्याची माती झालेली तुमच्याने पहावेल? तिला नाही कळले तर समजून सागायला नको? फार काय, मी म्हणतो, तिच्या कल्याणासाठी तुम्ही जोराचा प्रतिकारच केला पाहिजे.'

'ती आज बावीस तेवीस वर्षाची पदवीधर विदुषी आहे. शिवाय तिच्या बुद्धिमत्तेपुढे मी कःपदार्थ आहे. तसेच तिचे ज्याच्यावर प्रेम असेल त्याच्यासाठीं ती स्वतःचा सगळा जन्म दुःखात घालवायलाहि तयार असते. मला त्याचा चागला अनुभव आहे. तुम्हाला नाहीं कळायच ते.'

'दुसऱ्यासाठी स्वतःचा जन्म दुःखात घालविण्यात कसला मोठेपणा! मी नाही असल्या गोष्टीची प्रशसा करणार. स्त्रियाच्या हळव्या स्वभावाचा तो एक न्यूनगंड आहे.'

'छान. भाऊजी, याच विचारपद्धतीने तुम्हीं प्रेमाची पारख करणार वाटते? ज्याच्यावर अथवा जिच्यावर प्रेम आहे त्याच्यासाठीं अथवा तिच्यासाठीं जर सर्वस्वाचा त्याग करण्याची तयारी नसेल तर तें प्रेम कसलं? प्रेमाच्या नांवाखालीं असणारी ती एक लालसा ठरेल.' हेमा हे चटकन बोलून गेली; पण याचवेळी तिला आपल्या विवाहपूर्व सहवासी जीवनाची आठवण झाल्यावाचून राहिली नाहीं. त्या आठवणीने ती चागलीच दचकली आणि तिने सभोंवार पाहिले.

पण विनीत आपला मुद्दा सिद्ध करण्याच्या अभिनिवेशात असल्यामुळें हेमाच्या या क्षणिक हालचालीकडे त्याचे लक्ष गेले नाहीं उलट तिचा तो मुद्दा खोडून काढण्यासाठीं तो आवेशाने म्हणाला. 'सुखाची लालसा

म्हणून ज्या वास्तवतेकडे तुम्ही इतक्या तुच्छतेनें पहातां ती वास्तवताच मानवी समाजांत सुखाची आकांक्षा आणि आत्मप्रतिष्ठा मिळवून देत असते. आत्मप्रतिष्ठा कायम ठेवण्यासाठीं पाहिजे तें करावें या मताचा मी आहें. त्यागानें कांहींच मिळणार नाहीं.'

विनीतचें हे विधान हेमाला स्वतःच्या बाबतींत पूर्णपणें पटलें; पण भाषणाचा मुद्दा वेगळा असल्यामुळें आणि प्रेमाच्या त्यागमय जीवनानेंच ती पराकाष्ठेची सुखी झाली असल्यामुळें केवळ प्रेमासाठीं तिला विनीतशीं सहमत होतां येईना. ती म्हणाली, "भाऊजी, समजा. प्रेमावर तुमचें प्रेम जडलें आहे आणि प्रेमा सुनीतवर प्रेम करीत आहे. मग तिच्या-वरच्या प्रेमाखातर तुम्हीं बाजूला होऊन तिचें आनंदमय जीवन पहाणार, कीं जबरदस्तीनें तिच्याशीं विवाह करून तिच्या दुःखाची पर्वा न करतां स्वतः सुखी होणार? प्रेमांतील हा स्वार्थी व्यवहारच तुम्हांला पसंत आहे का?'

'होय. मी स्पष्ट सांगतों. माझ्या सुखाकडेच मी पहाणार. त्यागाच्या भुलभुलावणीनें स्वतःचें आयुष्य दुःखांत लोटण्यापेक्षां भोगाच्या वास्तवतेनें तृप्त होण्यांतच मी आनंद मानीन. मग मला तुम्हीं स्वार्थी म्हणा अगर कांहीं म्हणा.'

'याच ठिकाणीं तुमच्यांत आणि प्रेमांत विरोध आहे. प्रेमास्पदासाठीं अत्युच्च त्यागानें ती स्वतःचा बळी द्यायला तयार असते. ज्याच्यावर तिचें प्रेम असेल त्याला सुखी करण्यांतच ती कृतकृत्यता मानते. तसा मला अनुभव आहे.'

'हें कांहीं शूरत्व नव्हे. हा भित्रेपणा आहे. प्रेम करणाऱ्याला प्रेमाची तृप्ति भोगण्याचा अधिकार आहे. कोणीहि मनुष्य स्वतःच्या सुखासाठीं असेंच करील. वेडे, भित्रे, नेभळ्या अन्तः-करणाचे आणि हळव्या मनाचे स्त्रीपुरुष त्यागांतच प्रेमाची थोरवी मानतात; पण ती त्यांची चूक आहे.'

'ती चूक नाहीं. तोच अत्युच्च आदर्श आहे. लोकनिंदेच्या भीतीनें अथवा प्रशंसेच्या विलोभनानें जे तसें करीत असतील त्यांची मी प्रशंसा करणार नाहीं; पण निंदा अगर प्रशंसा या गोष्टी गौण मानून प्रेमा

स्पदासाठीं जे सर्वस्वाचा त्याग करतात ते फारच थोर होत. त्यांना देवमाणसांचीच उपमा दिली पाहिजे.'

विनीतचें शेवटचें बोलणें ऐकून आंत येणाऱ्या पुनीतनें हें उत्तर दिलें. तेव्हां विनीत म्हणाला, 'तुमचा दोघांचाहि हा भ्रम आहे. वास्तवतेंत याचा कांहीं उपयोग नाहीं. स्वतःला जें पाहिजे तें मिळविण्यासाठीं प्रत्येक मनुष्य भल्याबुऱ्या मार्गाचा अवलंब करण्याला केव्हांहि माघार घेणार नाहीं. प्रेमाची जितकी उत्कटता जास्त तितकी त्याच्या तृप्तीची धडपड अधिक हा नियमच आहे.'

'तें प्रेम वासनामय–विकारमय असतें. वासना आणि विकार यांच्या तृप्तीनंतर तें ओसरतें. त्यागांत चिरकालता आहे; भोगांत चिरकालता नाहीं. तृप्तीनंतर अतृप्ति ठेवलेलीच. अखेरपर्यंत याच घालमेलींत त्याचें आयुष्य जावयाचें.'

पुनीतच्या विधानानें विनीत दचकला. आणि हेमाहि खालीं मान घालून बसली. विनीतला स्वतःचें उत्तरहिंदुस्थानांतील गतायुष्य आठवलें तर हेमाला सुनीतशीं केलेला स्वैराचार डोळयांसमोर दिसूं लागला. प्रेमाच्या बाबतींत चाललेल्या या वादविवादानें हेमाच्या अंतःकरणाला चांगलाच चटका बसला होता. ती आतां एका मुलाची आई झाली होती. तिला पोक्तपणा आला होता. तारुण्यांतील स्वैरतेचा भर ओसरला होता. अनिर्बंधतेच्या वागणुकींत तृप्तीमागून अतृप्ति आणि अतृप्तीनंतर तृप्तीची धडपड, हा खेळ खेळणारी हेमा खऱ्या तृप्तीनें विचारी बनली होती. विनीतचीं विचित्र विधानें आज तिला दूषणास्पद वाटत होती; पण एक काळ असा होता, कीं याच विधानांत ती गुंगून गेली होती. सुनीतवर प्रेम नसतांना केवळ विकाराच्या धुंदीला प्रेमाचें गोड नांव देऊन तिनें स्वातंत्र्याचा दुरुपयोग केला होता. प्रेमानें स्वतःच्या आयुष्याची कुरवंडी करून तिचें कल्याण केलें म्हणूनच आजच्या सुखसौभाग्याचे दिवस तिला अनुभवतां आले. या दृष्टीनें पाहिल्यास प्रेमाला दोन शब्द सांगण्याचा तिला अधिकारच नव्हता.

पण सुनीतचें अस्तित्व तिला नको होतें. केव्हां ना केव्हां तरी तें

गाडलेलें पिशाच्च वर यावयाचेंच आणि तसें झालें म्हणजे आपलें जीवन बेचिराख व्हायला मुळींच विलंब लागावयाचा नाहीं. तेव्हां सुनीत नाहींसा झालाच पाहिजे आणि त्याला ही संधि योग्य आहे. प्रेमाचे मोहरें पुढें टाकून ही कामगिरी साधावयाची आणि त्याची जगांत एकदां बेअब्रू झाली, तो गुन्हेगार ठरला—कारावासांत गेला कीं स्वतः निश्चित व्हायचें असा हेमाचा हेतु होता. हें काम पार पडण्याला तिला विनीतची अनायासें मदत होणार होती. आणि त्या कार्याचा मोबदला म्हणून प्रेमाचें त्याला दान करावयाचा हेतु तिनें मनांत धरला होता. प्रेमाला किंवा पुनीतला तिचा हा हेतु मुळींच कळला नव्हता. कारण तीं दोघेंहि निर्मळ अन्तःकरणाचीं माणसें होतीं.

बादविवादाचा वारा आपल्या दिशेनें वाहूं लागलेला पाहून हेमा म्हणाली, ' तें कांहीं असो, पण प्रेमा कांहीं सुनीतवर प्रेम करणार नाहीं. त्याबद्दल भाऊजी तुम्हीं निश्चित असा. '

' निश्चितपणाचा प्रश्नच कुठें आला. प्रेमा अविवाहित आहे, शिकलेली आहे, समंजस आहे, तिला योग्य वाटेल त्याच्यावर ती प्रेम करील. त्याच्याशीं लग्न लावील. मला त्याबद्दल चिंता करण्याचें कारण काय ?' विनीत अगदीं नामानिराळे होण्याचा प्रयत्न करीत म्हणाला.

यावर पुनीतनें हंसून उत्तर दिलें, ' असा संन्यास कां घेतोस बाबा !! तुझ्या मघांच्या तत्त्वाप्रमाणें प्रेमांत उत्कटता असेल तर प्रयत्न कर ना ! उगाच वादविवाद आणि नसते संशय पाहिजेतच कशाला ?'

' Tut ! I don't care a rap ' असें बाह्यतः म्हणून विनीत उठला. कारण गतायुष्याच्या आठवणीनें तो बराचसा बेदिल झाला होता. अस्वस्थ मनःस्थितींत कोणताहि वाद चांगलासा रंगत नाहीं हें तो जाणून होता. शिवाय हेमाची मुद्राहि बरीच अस्वस्थ दिसत होती. त्यामुळें यावेळीं उठून जाणेंच बरें असें वाटून तो निघाला. हेमानेंहि त्याला विरोध केला नाहीं. पुनीतला दोघांच्याहि मनःस्थितीची कांहींच कल्पना नसल्यामुळें या शिळोप्याच्या गप्पा जितक्या लवकर आटोपतील तितक्या बऱ्या, तितकाच जास्त वेळ आपण लॅबोरेटरींत घालवूं असें वाटलें.

सुनीतच्या केसच्या बाबतींत प्रेमानें काय केलें हें समजल्यावांचून हेमाला निश्चितपणा येणें शक्य नव्हतें. त्यांत विनीतच्या विचित्र विधानांचा तिच्या मनावर झालेला परिणाम! उदात्त विचार बोलण्यांतच फार येतात; पण वर्तनांत विरुद्ध विचारांचाच प्रत्यय येतो. याला अपवाद एक प्रेमाच. तिच्या प्रेमाला आणि त्यागाला तोडच नाहीं. स्वार्थी विचारांच्या विनीतचें तिच्याशीं जुळावें कसें? आणि विनीतचें पूर्वचरित्र तरी आपणाला कुठें माहित आहे? स्वतःच्या सुखासाठीं अनेक स्त्रियांना त्यानें फसविलें नसेल कशावरून? त्याच्या बोलण्यावरून तर तसाच भास होतो. मग अशा स्थितींत प्रेमाशीं त्याचा विवाह झाला तर तिचा घातच नाहीं का होणार? पण तो म्हणतो त्याप्रमाणें सुनीतच्या बाबतींत प्रेमाचें मन पालटलें असलें तर?—

हा विचार हेमाच्या मनांत येतांच तिला प्रेमाचें आणि सुनीतचें पूर्वचरित्र आठवलें. सुनीतनें एका प्राणांतिक अपघातांतून प्रेमाचा बचाव केला होता. त्या दोघांचा ओढा एकमेकांकडे होता; पण केमिस्ट्रीच्या नादीपणामुळें तिनें पुनीतचा दुवा जोडला; सुनीतच्या कलाप्रियतेला तिनें दूर सारलें. आणि त्या आघाताचा फायदा घेऊन सुनीतच्या रंगेलपणाचा आपण फायदा घेतला; त्यामुळें प्रेमाला त्याचा जास्तच तिटकारा आला; त्या भरांत तिनें त्याचा अपमानही केला. आणि तिचें त्याच्यावर प्रेम नाहीं असें मी ठरविलें. आतां तो काळ पालटला आहे. कदाचित् प्रेमाचें प्रेमळ अन्तःकरण पुनीतकडून पराङ्मुख झाल्यामुळें—

—छे. असें होतां कामा नये. तसें झालें तर सुनीतकडून पूर्वीच्या बऱ्याच गोष्टी तिला कळतील. ती माझा तिरस्कार करील आणि कदाचित् माझ्या सुखाच्या संसारावरहि त्याचा परिणाम होईल.

—सुनीत नाहींसा झालाच पाहिजे.

—मग विनीत म्हणतो त्याप्रमाणें स्वतःच्या सुखासाठींच पराकाष्ठेची धडपड करणें हें कर्तव्य ठरतें. उदात्त विचार आणि त्याग हे परिणामी सुखदायक असतील; पण चालून आलेल्या सुखांत व्यत्यय आणतातच.

—तर मग माझें प्रेम माझ्यावरच आहे. इतर कोणावरही नाहीं.

माझ्या सुखासाठींच माझी सगळी धडपड हेंच खरें ! !

—मग प्रेमा अशी कां वागते ? तिला सुखाची अपेक्षा नाहींच काय ? माझ्यासाठीं तिनें पुनीतच्या प्रेमाचा त्याग केला, हें आज मी अनुभवीत असलेलें सत्य खोटें कसें म्हणूं ? तिला त्यांत सुख वाटत असेल काय ? कीं तिच्या हळव्या मनाचा हा एक अभिनिवेश असेल ?

— आणि अभिनिवेश असेल तर ती सुनीतवरहि प्रेम करूं शकेल. ' स्त्री कितीहि शिकली, तिला शिक्षणाचा कितीहि हव्यास असला तरी ती कुमारिका राहूंच शकत नाहीं. पत्नी होऊन मातेचें सौख्य अनुभवण्याची तिला आकांक्षा असतेच. ती तृप्ति कांहीं वेगळीच आहे. तारुण्याच्या आणि शिक्षणाच्या धुंदींत या गोष्टीकडे तिचें दुर्लक्ष होतें. पण नंतर तिला तें जाणवतें. ' हें एका अनुभवी विदुषीचें मत मला आज सत्य वाटत आहे.

—मग प्रेमाच याला अपवाद कशी ठरेल ?

—केमिस्ट्रीच्या नादामुळें भावी जीवनाचा तिला विसर पडला असेल; पण आतां तिकडचें लक्ष कमी झाल्यामुळें तिच्या मोकळ्या अन्तःकरणांत या अतृप्त आकांक्षेची तीव्रता जास्त जाणवेल. तिला अनुताप होईल आणि मग साहजिकच पूर्वविस्मृत सुनीतकडे तिचा प्रेमप्रवाह ओढ घेऊं लागेल.

—पण तसें होतां कामा नये. त्यासाठीं मला विनीतची प्रशंसा केलीच पाहिजे. त्याच्याशीं तिचा विवाह होणेंच इष्ट आहे. निदान मला तरी सुखावह आहे.

—तरी पण सुनीतच्या केसच्या बाबतींत तिची खटपट शेवटाला गेल्यामुळें माझी त्यांतून मुक्तता झाल्यावांचून मला कांहींच बोलतां येत नाहीं. जर तसें कांहीं झालें नाहीं आणि सुनीतनें न्यायाधिशासमोर माझें नांव उच्चारलें—'

तिला पुढें विचारच करवेना. तिनें भीतीनें डोळे मिटले आणि ती कोचावर आडवी झाली.

———

## : १३ :      : अनुतापाची झळ !

एक प्रकारच्या क्षोभजनक मनस्थितींतच विनीत घरीं आला. हेमाशीं बोलतांना स्वतःच्या सुखैकबुद्धीला पटणारे विचार तो बोलून गेला; पण प्रतिपक्षानें त्याचें एकांगी व केवळ स्वार्थाचेंच समर्थन करणारें बोलणें उदात्त विचारांनीं खोडून टाकतांच त्याच्या बौद्धिक विचारांचा [illegible] सहजच अन्तःकरणांत येऊन पोंचला. जोंपर्यंत आघात नाहीं, तोंपयत अन्तःकरण नाहीं, असा नियमच आहे. बुद्धिवादी माणसें विवाद-पटु असतात. वाच्यार्थांत गुंतून अहंमन्यतेनें स्वतः निर्माण केलेल्या तत्त्वांचेंच प्रतिपादन करण्यांत ते बेभान होतात; पण आघात बस-तांच, विश्वव्यापी उदात्त तत्त्वांचा धक्का बसतांच ते गोंधळून जातात. जनांत नाहीं तरी मनांत ते दचकतातच आणि मग एकांत मिळतांच अन्तःकरणाच्या ओलाव्यानें रसानुकूल बनून 'माझें चुकत तर नाहीं ना!' असा स्वतःलाच प्रश्न करतात. न कळत्या मनाचे बोल ऐकण्यांत गुंग होतात आणि अन्तःकरणाच्या अन्तःकरणांत स्वतःची चूक कबूल करण्याला ते उतावीळ होतात. सुख-सौभाग्याच्या शिखरावर आरूढ झालेला मनुष्य 'कर्ताहमिति मन्यते' असें मानून नास्तिकतेचे फवारे सोडण्यांत गुंगून जातो; पण कालान्तरानें दुःखाचा आघात बसतांच एकान्तात जाऊन पस्ताव्याचे अश्रु ढाळण्यांत समाधान मानण्याचा प्रयत्न करतो आणि 'तर मग त्यावेळीं मी चुक-लोंच म्हणायचा!' असें कबूल करतो. अन्तर्बाह्य जगाचे हे संग्राम अह-र्निश चालू असतात.

विनीतशीं बोलतांना मोठ्या प्रौढीन म्हणून हेमा जें बोलली त्या बोल-ण्याचा ती विचार करूं लागतांच तिला स्वतःच्या वर्तनाचा अनुताप झाला. त्याप्रमाणें यावेळीं विनीतही अनुतापाच्या तीव्र किरणांनीं होरपळं लागला.

कारण त्यागाचें तत्त्व त्रिकालाबाधित असल्यामुळें जगांत अनेकांना त्याच तत्त्वानें समाधान लाभलें आहे. जर तें तत्त्व खोटें मानलें आणि भोगांतच खरी इतिकर्तव्यता आहे असें ठरविलें तर आजवर स्वतःच्या सुखासमाधानासाठीं म्हणून जे जे मी प्रयत्न केले त्यांनीं मला कां सुखी होतां आलें नाहीं? माझ्या सुखाच्या कल्पना पुनः पुनः अतृप्तीच्या तुफानानें कां उसळून येतात?

विनीतनें या प्रश्नांचीं उत्तरें देण्याचा प्रयत्न करतांच आजवरचा स्वतःचा सगळा इतिहास त्याच्या डोळयांसमोरून जाऊं लागला, आणि दिङ्मूढ बनून तो पाहूं लागला. या बेभान स्थितींत घरीं येतांना आणि घरीं आल्यावर त्याच्या हातून किती तरी चुका झाल्या. नोकरचाकर तर समजले कीं 'आज धनीसाहेबांनीं जास्तच झोकली असावी!' शेवटीं तो एकदांचा आपल्या खोलींत येऊन बसला आणि 'आज असें आपणाला काय होत आहे' याचा विचार करूं लागला. अन्तःकरणाच्या नाजुक स्पंदनावर प्रगल्भ बुद्धि नाचूं लागली. तंबोऱ्याच्या खुंट्या पिरगळण्याचा कर्कश आवाज बंद होऊन सुरेल तारांचा मंजुळ निनाद ऐकूं येऊं लागला आणि विनीतची वृत्ति त्यांत गुंग झाली.

—'प्रेमानें माझ्याच तालावर नाचावें, तिनें माझ्याशींच बोलावें, माझ्यावांचून दुसऱ्या कोणाकडेही पाहूं नये असा मी तिचा कोण?'

या प्रश्नाचें त्याला उत्तर देतां न आल्यामुळें 'मी कोण' हाच आवाज एकसारखा त्याच्या कानावर आदळूं लागला आणि स्वतःला नकळत त्यानें कबुली जबाब देण्याला आरंभ केला——

——लहानपण वडिलांनीं केलेले निरनिराळे प्रकारचे लाड अनुभविण्यांत गेल्यामुळें माझ्यासाठींच सर्व कांहीं आहे; मी कोणासाठीं नाहीं, ही माझी भावना बळावत गेली. त्यागांत सुख नसून भोगांतच सुख आहे या माझ्या विचारसरणीचा हाच पाया असावा. पुढें शिक्षणामुळें विचारांत बदल व्हायचा; पण परीक्षा पास होणें हेंच शिक्षणाचें ध्येय आहे असें अनेक प्रकारें मला वाटत गेल्यामुळें परीक्षेसाठीं अभ्यास करावयाचा हें

तत्त्व मी अंगिकारलें. वाचनांत येणाऱ्या पुस्तकांचा ज्ञानवर्धनाकडे उपयोग झालाच नाहीं. अर्थात् माझ्या सुखाच्या कल्पना दृढतर होण्याला कोणताच अडथळा आला नाहीं. शिवाय वाचनीय पुस्तकें मिळालीं तींहि निरनिराळ्या प्रकारचे सुखविलास वाढविणारींच. आधींच मनाची तशी स्थिति त्यांत त्या स्थितीला पोषक असें वाचन.

—स्वतःचें जीवन सुखमय करण्यासाठीं इतरांच्या सुखदुःखांची पर्वा करावयाची नाहीं, कलाविलासाचा आनंद लुटावयाचा, विकासाकडे लक्ष द्यावयाचें नाहीं, स्वतःच्या आकांक्षा तृप्त करून घेण्यासाठीं झटावयाचें, मग त्यासाठीं इतरांचें जीवन कंटकमय झालें तरी 'कुछफिकीर नही' या विचारांनीं मला वेडें केलें. वासनाशमन हीच प्रेमाची वास्तवता, स्वार्थसाधन हीच इतिकर्तव्यता आणि मनमुराद विलास हेंच जीवन अशी विचारसरणी बनत गेल्यामुळें मीना, मिनार आणखी अशीं किती तरी टवटवीत व तजेलेदार फुलें मी बेदरकारपणें हुंगून टाकलीं. दैवयोगानें मला त्यांत यश येत गेलें त्यामुळें मानवी जीवन हें भोगाकरतांच आहे. त्यागाचे उदात्त विचार हे पुस्तकांत शोभणारे शब्द आहेत. वास्तवतेंत त्याचा कांहीं उपयोग नाहीं आणि त्यापासून कोणाचा लाभहि होणार नाहीं अशी माझी दृढ समजूत झाली. विलायतेंत मी याचा अनुभव घेतला; पण त्याच ठिकाणीं मिनारनें मला चांगला धक्का देऊन स्वतःच्या सुखासाठीं माझा त्याग केला. तिनें एका थिल्लर आणि शौकीन युरोपियनाची मैत्री पत्करली. मी त्यावेळीं तिला आचारविचाराची भरपूर व्याख्यानें दिलीं; पण माझ्या वर्तनाकडे विशेषतः मीनेच्या दुःखी जीवनाकडे बोट दाखवून तिनें मला निरुत्तर केलें.

—आणि आज हेमानें माझ्या डोळ्यांत झणझणीत अंजन घालण्याचा प्रयत्न केला. प्रेमाच्या बाबतींत मी असा उतावीळपणा करायला नको होता. तिचें बर्तन दोषास्पद ठरविणारा मी कोण ? आणि तिच्या वर्तनांत असा दोष तरी कोणता ? सुनीतशीं ती सलगीनें वागली असेल; पण तसें पाहिलें तर माझ्यापेक्षां तोच तिच्या जास्त परिचयाचा. माझी तिची नुक-

तीच ओळख झालेली. असें असतांही माझ्याबरोबर एकट्यानें ती फिरायाला आली; तिला त्या बाबतींत संकोच वाटला नाहीं; मग तिच्या बाबतींत मी नसता संशय कां घ्यावा ? शिवाय, तिनें मला तसें स्पष्ट वचन तरी कुठें दिलें आहे. सगळी हेमाची धांदल आणि—

विनीतच्या विचारांना अशी उलटी गति मिळतांच 'आज आपण हेमाकडे जें बोललों, प्रेमासंबंधानें जे उद्गार काढले ते तसे काढावयास नको होते.' असें त्याला वाटलें आणि त्या विचाराच्या भरांत त्यानें चटकन् एक नोटपेपर ओढून पत्र लिहिण्याला आरंभ केला.

'प्रेमा,

त्या दिवशीं माझ्याकडून ती चूकच झाली. तुमच्या त्या तशा वर्तणुकीचा मी विपर्यास केला. त्यावेळीं मी थोडासा विचार केला असता तर बरें झालें असतें. मी नेहमीं एकच बाजू लक्षांत घेत असतों. दुसऱ्या बाजूचा विचारच करीत नाहीं. तेव्हां मला तुम्ही क्षमा कराल अशी आशा आहे. माझ्यासंबंधानें गैरसमज करून घेऊं नये हीच विनंति.

अनुतापी—**विनीत.**'

हें पत्र लिहून बंद केल्यावर विनीतच्या मनांत विचार आला कीं, अशी क्षमा मागणें हें एक प्रकारें अपमानकारक व लज्जास्पद आहे. माझ्या वर्तनाचा तिला राग आला, असें तरी मी कां मानावें ? ती रागावली असेल हीसुद्धां माझी कल्पनाच आहे. किंबहुना तिनें माझ्यावर रागावणें हें सुद्धां माझ्यावरील प्रेमाचेंच लक्षण ठरतें. कारण प्रेमावांचून उगाच कोणावर कोणी रागवत नसतें. शिवाय मी असा अपराध तरी काय केला आहे ? तीही माझीच कल्पना ! छे. अशा अस्वस्थ मनस्थितींत तिला पत्र पाठविणेंच योग्य नाहीं. त्यापेक्षां तिची भेट घेऊन खुल्या दिलानें दोन गोष्टी बोलतांच हें काल्पनिक वादळ तेव्हांच नाहींसें होईल.

प्रेमाच्या भेटीची कल्पना मनांत येतांच ती सुंदर मूर्ति, तिचें चातुर्य-

पूर्ण बोलणें, तिनें केलेलें विलोभनीय हावभाव आणि तिचा आनंदकारक सहवास या सर्व गोष्टींची त्याला आठवण झाली. त्याचें सर्वांग रोमांचित झालें आणि तो उठलाही; पण बाहेर पहातो तों रात्र झालेली त्याला दिसली. अर्थात् ही वेळ तेथें जाण्याला योग्य नव्हे असें ठरवून तो जागच्या जागींच पुनः बसला.

सगळी रात्र त्याच विचारांत आणि काल्पनिक चित्रें रंगविण्यांत गेली. स्वप्नांत प्रेमाचें सान्निध्य त्यानें अनुभविलें आणि ती रात्र त्यानें तिच्या चिंतनांत घालविली.

सकाळीं उठतांच उत्तम पोषाख करून तो आपल्या टूसीटरमध्यें बसला आणि प्रेमाच्या बंगल्याकडे निघाला; पण बंगल्यांत जातांच त्याला कळलें कीं 'ती हेमाकडे गेली आहे.' त्याची मोटी निराशा झाली. सगळा उत्साह ओसरून गेला आणि मन दुश्चितेनें व्यापून गेलें. कारण हेमाकडे जातांच प्रेमाला आपलें कालचें सगळें बोलणें हेमा सांगणार आणि ती आपला तिरस्कार करणार!

तो त्या अस्वस्थ मनःस्थितींत पुनः घरीं आला. स्नान भोजनाची त्याला स्मृतीच राहिली नाहीं. घरांतील नोकर चाकरांना तर मालकाच्या या वर्तनाचा अर्थच कळेना. पुढें सरून कांहीं विचारण्याचीहि कोणाला छाती होईना.

विनीतचें कोणाकडेहि लक्ष नव्हतें. घरीं येतांच बऱ्याचशा सिगारेट फुंकून झाल्यावर त्यानें पोषाख बदलला आणि तो तसाच कोर्टाकडे गेला. कोर्टांत त्यानें काय केलें, पक्षकाराला काय सांगितलें आणि कोर्टाच्या प्रश्नाला काय उत्तरें दिलीं हें त्याचें त्यालाच कळलें नाहीं. कारकून समजला कीं 'आज स्वारीनें बरेंच जाग्रण केलें असावें व तें जाग्रण नेहेमींप्रमाणें कुठच्या तरी नामांकित गायिकेच्या मजलशीचें असावें.'

विनीतच्या मनांत आलें 'पुनः एकदां हेमाकडे जावें' पण आदल्या दिवसाचें भाषण त्याच्या कानांत गणगुणत असल्यामुळें तें साहसही त्याच्यानें

करवलें नाहीं. शेवटीं घरीं येतांच त्यानें सर्व विचार बाजूला सारून प्रेमाला पूर्वीसारखेंच पण 'हेमानें कांहीं सांगितल्यास माझ्या विकृत मनोवृत्तीचा तो एक तरंग आहे. मला त्याबद्दल आतां पश्चात्ताप वाटत आहे...' अशीं दोन चार वाक्यें जास्त घालून पत्र लिहिलें आणि स्वतः नेऊन पोस्टांत टाकलें.

इतकें झाल्यावर त्याला थोडेंसें समाधान वाटलें आणि त्या रात्रीं तो पोटभर जेवला. काल्पनिक गैरसमज आणि एकांगी विचार याचा परिणाम केवढा भयंकर होतो याची त्याला आज प्रथमच थोडीशी कल्पना आली आणि तो खजील झाला. तरी पण हेमाच्या भेटीचा प्रेमाच्या मनावर काय परिणाम होतो, इकडे त्याचें लक्ष लागून राहिलें असल्यामुळें तो निश्चिंत झाला नाहीं.

---

## : १४ : : मैत्रिणींचें हितगुज !

सुनीतच्या केसच्या बाबतींत हेमाची काळजी अद्याप दूर झाली नव्हती. पण त्यासंबंधानें पुनीतकडे एक शब्दही तिला बोलतां येत नव्हता. शिवाय या केसमध्यें सुनीत चांगलाच गुंतला जावा, त्याचा सर्वत्र अपमान व्हावा, त्याला शिक्षा व्हावी अशी तिची आंतरिक इच्छा असल्यामुळें विनीतच्या मार्फत तिनें प्रयत्न चालविला होता. फक्त आपलें नांव त्यांत घेतलें जाऊं नये इतकी तिला काळजी घ्यावयाची होती.

पण त्या दिवशीं सकाळींच प्रेमा जेव्हां तिला भेटण्यासाठीं आली तेव्हां तो महत्त्वाचा प्रश्न तिच्यानें काढवेना. प्रथम विनीतबद्दलचीच वाटाघाट सुरू झाली. तो कसा रागावून आला, त्यानें काय सांगितलें, त्याच्या बोलण्यावर आपण वादविवाद कसा केला वगैरे गोष्टी तिनें प्रेमाला सांगितल्या. प्रेमानें सर्व ऐकून घेतलें. विनीत इतका क्षुद्र बुद्धीचा असेल, आपल्या सरळ वागणुकीचा त्यानें असा भलताच अर्थ केला असेल अशी तिची अद्याप कल्पनाहि नव्हती. तिला त्याचा राग आला. सुनीतबद्दल त्यानें काढलेले उद्गार तिला आवडले नाहींत. कारण सुनीतच्या वर्तणुकीचा तिला निराळाच अनुभव आला होता. शिवाय विनीतच्या या विकृत पार्श्वभूमिकेमुळें सुनीतचा सोज्वळ प्रकाश तिला जास्तच आकर्षक वाटला.

शेवटीं केसबद्दलची मुख्य गोष्ट निघाली. हेमानें ती सहज म्हणून काढली. प्रेमाला आतां या बाबतींत बोलणेंच भाग पडलें. 'ती सर्व व्यवस्था मी केली आहे. सुनीतनें तुझ्याबद्दल एक अक्षरही न बोलण्याचें अभिवचन दिलें आहे.' एवढें सक्षेपानें सांगून प्रेमा त्यांतून मोकळी होऊं पहात होती; पण हटवादी हेमा तेवढ्यानें थोडीच स्वस्थ बसणार ? अर्थात् सुनीतचें व आपलें झालेलें बोलणें, त्याचा बदलून गेलेला स्वभाव. त्याची ती एकाकी राहाणी, वगैरे सगळा प्रकार तिला सांगावा लागला

आणि तो ऐकून संकुचित मनाच्या हेमाला प्रेमाबद्दल निराळाच संशय आला. ‘ सुनीतवर हिचें प्रेम तर जडलें नसेल?’ असें तिला वाटलें आणि ती म्हणाली, ‘ तूं त्याची इतकी प्रशंसा करतेस हें कांहीं ठीक नाहीं. तो आपल्या वचनाला जागेल असें तूं कशावरून म्हणतेस? तुझ्यावर त्यानें बरीच छाप ठेवून दिलेली दिसते.’

आणि हें वाक्य उच्चारतांच तिच्या डोळ्यांसमोर मागील एकेक प्रसंग दिसूं लागले. स्वतःला नकळत आपलें अन्तःकरण त्याच्याकडे कसें आकर्षिलें गेलें, त्याचें पहाणें, बोलणें, हंसणें वगैरे हालचालींत आपणाला मोहकपणा कसा भासला. त्याच्या अधीन होण्यांत आपली कशी बेभान-वृत्ति झाली, अष्टौप्रहर आपल्याला त्याचीच मूर्ति कशी दिसूं लागली, वारंवारच्या भेटीनंतर स्पर्शसुखाची उत्कंठा आणि कुतूहल कसें निर्माण झालें, स्पर्शसुखाचें समाधान कसें अनुभविलें, परिणामाची कल्पना येतांच बाह्य विलासांचा अतिरेक कसा वाढत गेला, सुनीतनें आपणासाठीं काय काय केलें आणि—आणि...

हीं गतायुष्यांतील चित्रें पहाण्याचा प्रसंग येतांच हेमाच्या अंगावर शहारे आले. आपण एक कुलीन स्त्री, माता आणि पत्नी आहों हें लक्षांत येतांच ती जास्तच घाबरली आणि हें सर्व सुनीतमुळें झालें असें आपल्या क्षुद्र व स्वार्थी मानवी स्वभावानें ठरवून ती जोरानें म्हणाली, ‘ प्रेमा, प्रेमा, तूं फसत आहेस. सुनीतच्या बाबतींत अजून तरी तूं सावध-गिरी घे. तो अगदीं घातकी माणूस आहे. मनुष्यत्वाचा तो कलंक आहे, बदमाष आहे.—’

हेमाचा तो आकस्मिक आविर्भाव आणि जोराचें बोलणें ऐकून प्रेमा चांगलीच दचकली. विवाहपूर्व जीवनांतील वासनांनीं मळलेल्या अन्तःकर-णाचे हे कठोर आघात आहेत हें तिनें जाणलें. आपण केलेल्या अपरा-धांचें गाठोडें सुनीतवर लादून स्वतः मोकळें होण्याची तिची धडपड तिनें ओळखली आणि मध्येंच तिच्या तोंडावर हात ठेवून तिनें म्हटलें, ‘ताई, हे तूं काय बोलतेस? त्यांच्यासंबंधानें असे उद्गार काढणें तुला शोभत नाहीं. जे हे सगळे आरोप तूं त्यांच्यावर करीत आहेस ते तुला कसे

कळले हा प्रश्न येथें उभा राहातो. तुझा अनुभव त्यावरून व्यक्त होतो आणि--'

या बोलण्यानें हेमा घाबरली. तिनें प्रेमाचा हात धरून म्हटलें, 'बोलूं नको. अगदीं बोलूं नको. माझी ती चूक झाली.'

बोलतां बोलतां 'पुनीत तर आसपास नाहीं ना?' असा तिला संशय आला आणि घाईघाईनें उठून तिनें पाहिलेंसुद्धां!

तिच्या हालचालीकडे प्रेमाचें लक्ष होतेंच, तिची ती तारांबळ पाहून प्रेमाला हंसूं आलें; पण तो हंसण्याचा प्रसंग नव्हता. तिनें तिला आपल्या जवळ बसवून घेतलें आणि पाठीवरून हात फिरवीत म्हटलें, 'ताई, तूं तें सगळें विसरून जा. तुझ्यासाठीं किती तरी गोष्टी त्यांनीं केल्या आहेत हें ध्यानांत घे, आणि दुसऱ्याला दोष देण्याची संवय सोडून दे.'

'तें खरें आहे; पण त्याच्या शब्दावर विसंबून राहून चालेल का?'

'अग त्याहीपुढें मी गेलें आहे. पण ती लाजिरवाणी हकीगत तुला सांगूंच का?'

या संदिग्ध बोलण्यानें प्रेमाबद्दल हेमाला निराळाच संशय आला. ती म्हणाली, 'म्हणजे? सांग तरी काय काय प्रकार झाले ते!'

आतां प्रेमाला मगनलालशेटबद्दलची सगळी हकीगत हेमाला सांगणें भाग पडलें आणि त्यांत सुनीतशीं जोडलेलें आपलें काल्पनिक पत्नित्वहि तिनें सांगून म्हटलें, "तुझ्यासाठीं केलेलें हें दिव्य मी बोलून तरी कसें दाखवूं? कोण काय म्हणेल?"

प्रेमाच्या या बोलण्याचा मात्र हेमावर चांगलाच परिणाम झाला. प्रेमा आपल्यासाठीं निरनिराळ्या प्रकारांनीं किती त्याग करूं शकते याची तिला आतां कल्पना आली आणि त्या अभिनिवेशांत तिनें प्रेमाला घट्ट मिठी मारून म्हटलें, 'प्रेमा, माझ्यासाठीं तूं इतकंहि केलंस ना? तुझे हे उपकार मी कसे ग फेडूं? माझ्या लग्नांत तूं स्वतःच्या प्रेमावर निखारे पसरलेस आणि आतां माझ्या अब्रूसाठीं तूं एका तिऱ्हाईत मनुष्यासमोर नको असलेल्या मनुष्याचें पत्नीत्वही मान्य केलंस! खरोखर, प्रेमा तूं प्रेमाच आहेस, नाहींतर मला हे दिवस कुठले दिसायला!'--

बोलतां बोलतां हेमाला गहिंवर आला. तिच्यानें एक अक्षरहि पुढें बोलवेना; पण तिला त्या स्थितींत ठेवणें प्रेमालाच योग्य वाटेना. ती म्हणाली " अग हेंचसें काय, तुझ्यासाठीं याहीपेक्षां जास्त कांहीं करावें लागलें तरी मी करीन. "

" करशील बाई ! तशी तूं धीट आहेसच. 'लग्नाच्या वेळीं सुनीत अडथळा करूं लागला तर मी त्याच्याशीं लग्न करून त्याच्यासह निघून जाईन' असं त्या ऐनवेळीं तूं म्हटल्याचं मला आजही आठवतं. देवाच्या दयेनं तशी वेळ आली नाहीं हें टीक झालं, नाहींतर तुझा घातच व्हायचा !"

" वेडी नाहींतर ! अग घात कसला ? तुझ्या इच्छेप्रमाणं संसारी बनून मी आज जुनी पुराणीहि होऊन गेल्यें असतें. "

" कांहीं तरीच ! तो तुला मुळींच योग्य नाहीं. त्याच्यासारखा छांदिष्ट नवरा मिळाला असता तर गळफांस लावून घेऊन मरण पत्करावं लागलं असतं तुला !

" सुनीतबद्दल तुझी भलतीच कांहीं तरी समजूत झालेली दिसते ! अग आजकालच्या तरुणांत त्यांच्यासारखा माणूस शोधूं गेल्यास मिळायचा नाहीं. गोड बोलणं, साधा सरळ स्वभाव, दुसऱ्याबद्दल कमालीची अनुकंपा, कामसू वृत्ति आणि श्रम करण्याचं भरपूर सामर्थ्य, हे काय तुला अवगुण वाटतात ?—"

" वा. वा. तूं तर त्यांचें गुणकीर्तनच सुरू केलंस ! संघटण वाढत चाललं वाटतं. सांभाळ ग बाई ! तुझ्या इष्टेटीवर त्याचा डोळा दिसतो." हेमा मध्येंच म्हणाली.

" कांहीं तरीच ! मी तशी लहान नाहीं आतां ! तूं नसता आजीबाईचा आव आणून मला उपदेश करूं नको. "

" मनुष्याचा स्वभाव कधींच बदलत नसतो. सुनीतला मी चांगला ओळखतें म्हणून तुला सावध केलें. " कांहीं वेळ थांबून हेमानें पुनः तिला विचारलें, "खरं सांग प्रेमा, त्याच्यावर तुझं प्रेम तर जडलं नाहींना ? अग रिकाम्या देवळांत कुठलाही देव आणून बसवितां येतो."

" आतां मात्र तुझ्या सगळ्या शहाणपणाचं दिवाळं वाजलं असावं असंच मला वाटूं लागलं आहे. माझ्या या राखीव सौंदर्याचा आणि तारुण्याचा सौदा मी असा फुकापासरी उधळून लावीन आणि कोणालाही उतावीळपणानं माळ घालीन असं का तुला वाटतं? तुझ्यासारखा प्रेमाचा भुकाळूपणा मला नाहीं कधीं बाधत बाई ! अग मी स्वतः प्रेमा असल्यामुळं प्रेमाच्या राज्यांत पाऊल टाकायला मला अजून वेळ आहे. मी मला विसरेन असं तुला वाटतं ? "

" मी हें तुझं बोलणं खरं मानलं असतं; पण माझ्या विवाहाच्या रात्रीं तुझे ते लाल झालेले गाल, डोळ्यांतून वाहाणारे अनावर अश्रू आणि वारंवार उसळून येणाऱ्या हुंदक्यासरशीं निघणारे निःश्वास मी पाहिले असल्यामुळें प्रेमाला तूं अजून पारखी आहेस असं माझ्यानं म्हणवत नाहीं. मी तशी अगतिक झालेली पाहूनच तूं स्वतःच्या प्रणयाचा बळी देऊन मला सुखी केलंस. "

हेमाच्या या बोलण्यानें प्रेमाची पुसट होत चाललेली ज्वाला उफाळून आली. हृदय गुदमरल्यासारखें झालें. ' जर तसं झालं नसतं तर ' या अन्तर्निनादानें तिचा आवेश ओसरला आणि काल्पनिक गृहचित्रांतील इच्छित प्रेममीलनाचा आकांक्षित देखावा तिला दिसूं लागला. मिटल्या ओठांनीं आणि झांकल्या नेत्रांनीं तिनें तें चित्र पाहिलें. मनाला आवर घातला आणि दमल्या भागल्या स्वरानें ती हळूच म्हणाली, " ती वेळ निघून गेली. आतां काय त्याचं ! मी तें सगळं केव्हांच विसरून गेल्यें."

" आणि म्हणूनच मी तुला मान देतें. संयमानं समाधान कसं मिळवावं हें तुला चांगलं कळतं. आणि भावोजींशीं तुझी बाजू घेऊन त्या दिवशीं मी भांडल्यें ती यामुळंच. "

" म्हणजे ? त्यांना तूं हें सारं सांगितलंस वाटतं ! " प्रेमानें अधिरतेनें विचारलें.

" हें कशाला सांगूं ? तितकं मला कळतं; पण पर्यायानं सुचवलं. स्वतःचं प्रेम ज्या व्यक्तीवर आहे त्या व्यक्तीसाठीं कमालीचा त्याग करण्याचं अलौकिक सामर्थ्य एकट्या प्रेमांतच आहे, हेंच त्यांना मला सांगा

यचं होतं. त्यांना तें पटेना आणि त्याच आवेशांत ते निघून गेले. इच्छातृप्ति हेंच प्रेमपूर्तीचें लक्षण. त्यांतच समाधान. नसत्या त्यागाचं अवडंबर माजविणं ही स्वतःची फसवणूक आहे. हें आपलं त्यांचं पालुपद चालूंच होतं."

नकळत एक सुस्कारा सोडून प्रेमा म्हणाली, "कांहीं माणसांचा तसा स्वभावच असतो. त्यांची प्रवृत्ति त्यागाकडे नसून भोगाकडेच असते; पण याला कांहीं प्रेम म्हणत नाहींत. लोभ म्हणतात."

"तूं कांहीं म्हण; पण मला आपलं त्यांचं म्हणणंच खरं वाटतं. तितकी सहनशक्ति मला नाहीं म्हटलंस तरी चालेल." अंगावरचा सरकलेला पदर नीटनेटका करून कोचावरून उठतां उठतां हेमा म्हणाली.

"म्हणून तर मला असं करणं भाग पडलं." प्रेमानें सहजच्या स्वरानें उत्तर दिलें; पण हेमा हें ऐकायला तेथें थांबते कशाला ? ती केव्हांच निघून गेली होती.

आणि प्रेमाच्या या उत्तरांत जीव नव्हता. त्याग हा एक अभिनिवेश आहे. तें उच्च ध्येय आहे. शिखरावर चढण्यासाठीं मनुष्य आपल्या जिवाची भयंकर आटापीट करतो; पण शिखरावर जाऊन थोडा वेळ जातो न जातो तोंच दूरवर दिसणारें आपलें घर त्याला आठवतें, तो वेगानें खालीं उतरतो आणि घराकडे धांवत सुटतो. एवढा मोठा धीर गंभीर सागर, कणाकणांनीं आपलें शरीर झिजवून बाष्पाच्या रूपानें स्वर्गविहारासाठीं पळत जातो; पण तेथें राहणें कांहीं त्याला सहन होत नाहीं. पर्जन्याच्या रूपानें तो खालीं येतोच. सूर्यविकासी कमळ सूर्याकडे पाहून प्रफुल्लित होतें, स्वर्गाचें राज्य आपल्या हातीं आलें असें त्याला वाटतें; पण सूर्यास्तानंतर त्याचा चेहरा इतका कोमेजून जातो कीं सकाळचें आल्हादकारक कमळ तें हेंच काय, असा संशय उत्पन्न होतो.

उच्चत्व हें ध्येय म्हणून ठीक आहे. त्याग हा अतिमानवत्वाच्या दृष्टीनें योग्य आहे; पण त्या आनंदाचा अखंड उपभोग सर्वांनाच मिळतो असें नाहीं. विकारी आणि वासनाबद्ध जगांत राहून त्यागाचा निर्विकारी अखंड आनंद उपभोगणें कठीण आहे. निरपेक्ष प्रेमाचाही तोच प्रकार! सतत उद्योग आणि अविश्रांत मेहनत नसेल तर रिकामें अन्तःकरण अपेक्षेच्या

रजःकणांनीं मलिन होणारच. अपेक्षा आली कीं लालसा ठेवलेलीच. लालसेला भोगांवाचून तृप्तीच नाहीं. देहाची रचनाच तशी आहे. संयमानें आदर्शत्व येईल; पण विदेहावस्थेवांचून त्यांत टिकाऊपणा येणार नाहीं. अर्थात् बोलणें आणि सांगणें यांपेक्षांही वागणें आणि सहन करणें फार कठीण आहे.

हेमाच्या बोलण्यामुळें आणि पूर्वस्मृतीमुळें प्रेमाच्या अन्तःकरणांत विचारांचें वादळ उठलें. राखेनें झांकलेल्या ठिणगीप्रमाणें पुनीतवरचें सुप्तावस्थेंत दडपून ठेवलेलें प्रेम या वादळानें प्रकाशित झालेलें दिसूं लागलें. आज मी या घरांतील शेजारच्या खोलींत गृहिणीप्रमाणें अपत्याला खेळावीत बसलें असतें. प्रेमाच्या उच्चत्वाचा मोह मी आवरला असता, तर माझ्या सुखाआड कोणीच आलें नसतें. पुनीतनीं तर आनंदानें माझं पाणिग्रहण करून—

याच वेळीं हेमा मोठमोठ्यानें हंसत पुनीतचा हात धरून तेथें आली त्यामुळें प्रेमाचा विचारप्रवाह एकदम कुंठित झाला आणि तिनें चकित मुद्रेनें त्या दोघांकडे पाहिलें. हेमानें त्या स्थितींत तिला पाहून म्हटलें, "वाः तूं इथंच बसून राहिलीस वाटतं ! अग, एकादं पुस्तक तरी वाचायला घ्यायचं होतंस !" नंतर वांकड्या मानेनें पुनीतकडे पहात ती म्हणाली "ही इतका कसला विचार करते देवाला माहीत ! मी निघून गेल्यें हें सुद्धां हिला कळलं नाहीं ! ! एकट्या माणसाचं जिणं कांहीं चांगलं नाहीं म्हणून मी—"

"प्रेमा, चल. आपण जेवतांनाच बोलूं. तूं लॅबोरेटरींत आली असतीस तर बरं नसतं कां वाटलं ?"

"खरंच प्रेमा. तूं उगाच इथं बसून राहिलीस ! मला वाटलं, येशील माझ्यामागून ! आतां आधीं ऊठ पाहूं. घरांत पानंसुद्धां मांडलीं आहेत ! रात्र किती झाली माहीत आहे का ?"

"तूं तिकडे लॅबोरेटरींत येऊन इतका वेळ बोलत राहिलीस, त्यावेळीं तरी तुला वेळाचं भान कुठं होतं ? हिला इथं एकटी ठेवून तूं उगाच आलीस. मलाहि कांहीं काम करूं दिलं नाहींस."

"तर तर. मी अगदीं हातच धरून बसलें असेन !"

प्रेमाला कांहीं बोलतांच येईना. ती उठली आणि त्या दोघांकडे पहात दरवाजाकडे वळली. आज हेमाला इतका आनंद कसला झाला आहे हें तिनें जाणलें. दुसऱ्याचा बळी देऊन स्वतः सुखसौभाग्य भोगणाऱ्या हेमाचा तिला याचवेळीं प्रथम हेवा वाटला; पण मनांत उफाळून येणारे दुःखाचे कढ तसेच दाबून ती प्रसन्नतेचा उसना आविर्भाव आणीत म्हणाली, "निदान माझ्यासमोर तरी तूं हात धरून आलीस एवढं खरं. आतां जेवायच्या वेळींहि—"

"चल चल. कांहीं तरीच बोलशील." असें कृतक कोपानें म्हणून पुनीतसह हेमा तिच्या पाठोपाठ निघाली.

---

## : १५ : : थोडक्यांत बचावली !

जेवणाच्या वेळीं हेमा एकसारखी बोलत होती. पुनीतलाहि दुपारपासून प्रेमाशीं कांहींच बोलतां न आल्यामुळें तोही मनमोकळेपणानें निरनिराळ्या विषयांवर हास्यविनोदयुक्त टीका टिप्पणी करीत होता; पण प्रेमा मात्र फार बोलत नव्हती. आज हीच वेळ आपण कशी साजरी केली असती, गृहिणी या नात्यानं पुनीतशीं हौसेमौजेनें कसा वेळ घालविला असता आणि असल्या आनन्दोत्सवप्रसंगीं आपण कोणत्या गप्पा मारल्या असत्या, याचाच तिनें विचार चालविला होता.

प्रेमाच्या प्रयत्नांनीं आपण एका मोठ्याच संकटांतून वाचलें असें वाटून हेमा आनंदानें बेहोष झाली असल्यामुळें प्रेमाकडे तिचें लक्षच गेलें नाहीं. स्वतःच्या आनंदांत मनुष्याला दुसऱ्याच्या सुखदुःखाची कल्पनाही होत नसते असा नियमच आहे. हेमा तरी त्या नियमाला अपवाद कशी ठरल ? पुनीतला मात्र हेमाच्या आनन्दाचें रहस्य न कळल्यामुळें प्रेमाच्या विषण्णतेचें कारण जाणून घेण्याची तो खटपट करीत होता. हेमाचें तिकडे लक्ष्यच नव्हतें.

अशा थाटांत जेवणाचा समारंभ आटोपला. त्यानंतर तिघांनीं एकत्र बसून मुलाचें कोडकौतुक करण्यांत बराच वेळ घालविला. तोही प्रसंग प्रेमाच्या अन्तःकरणाला चटका लावण्याला कारण झाला. त्यानंतर ती निजावयास गेली. हेमा—पुनीतच्या खोलीशेजारींच तिची निजण्याची खोली होती, त्यामुळें त्या दोघांचें हितगुज तिला ऐकूं येतच होतें.

बऱ्याच वेळानें सर्वत्र शांत झालें. हेमाचें हंसणें खिदळणेंही गुदमरलेल्या आवाजांत मंद होत चाललें; पण प्रेमाची झोंप मात्र पार नाहींशी झाली. अजूनपर्यंत अन्तःकरणांतून उसळून येणाऱ्या उत्कट भावनेच्या निर्झरावर तिनें संयमाचा जड फत्थर लावून ठेवला होता. तो आपोआप बाजूला झाला आणि उत्तान विचारांचा उत्तेजक प्रवाह खळाळून वाहूं

लागला. पूर्ण एकान्त आणि स्वातंत्र्य यामुळें त्या प्रवाहाला अडथळाहि होण्याचा संभव नव्हता.

अर्थात् आजच्या एकतर्फी अनुकूल संवेदनांनीं तिची जागृत झालेली भूक तिला अनावर होऊं लागली. आतांपर्यंत पुनीतजवळ बसून ज्या शाब्दिक आनंदाचा तिनें भरपूर उपभोग घेतला, त्यानें तिचें आज समाधान झालें नाहीं. जगांतील सायन्सचीं समीकरणें सोडवितांना तिला इतके दिवस जो आनंद वाटला, तो बाह्यात्कारी होता. आज अन्तर्जगांतील सायन्सचें रहस्य उलगडतांना त्याचा काडीमात्र तिला उपयोग होईना. उच्च तत्वांचे व उदात्त विचारांचे कितीहि लेप दिले तरी हृदयाकाशांत गुदमरणारे ऊष्ण वारे आणि भडकलेल्या वासनाचे ज्वालामुखी बंद होत ना. अतृप्तीची अमर्याद पिपासा तिच्या नसानसांतून व्यक्त होऊं लागली. डोळे तारवटल्यासारखे झाले, जीभ कोरडी पडली आणि मस्तक संतप्त झालें. 'हेमा आज ज्या निस्सीम आनंदाचा उपभोग घेत आहे तो आनंद माझ्या मालकीचा होता.' हा एकच विचार तिच्या सर्वांगाचा दाह करूं लागला. इतकेंच नव्हे, तर त्या काल्पनिक आनंदाचा उपभोग घेण्यांतच ती मग्न झाली. मृगजलाप्रमाणें होणारी दृश्यतृप्तीच तिच्या आकांक्षेचा मुख्य विषय होऊन बसली. ती त्यांत मुग्ध झाली, लोभावली आणि सर्वांगानें त्याचा उपभोग घेऊं लागली. जागृतावस्थेंत स्वप्नसुखाचा अनुभव घेण्यांत ती मग्न झाली, त्याच तृप्तींत ती सर्वस्वाला विसरली, आणि परिस्थितीचेंही तिला भान राहिलें नाहीं.

'त्याग हा गौरवात्मक नसून भित्रेपणा व दुर्बलता व्यक्त करणारा एक आविर्भाव आहे असें विनीत म्हणाला तें खोटें नाहीं.' तिचे अनियंत्रित विचार सुरू झाले. 'प्रेमाला पिचवून, त्यावर त्यागाची राख टाकून मी काय मिळविलें? उलट त्यामुळेंच तर आज मी अशी तळमळत आहे. हेमासाठीं मी बाजूला सरलें नसतें तर पुनीतच्या अक्षय प्रेमाचा लाभ मला एकटीलाच मिळाला असता. आणि आज त्या आनंदाचा समुद्र उसळून राहिला असता! छे. छे. मी उदात्त विचारांच्या भलत्याच मोहाला बळी पडून जीवनाची राख केली. आतां या राखेंतून काय

निर्माण होणार? सगळा जन्म 'हाय हाय' म्हणतच घालविला पाहिजे—

—पण तसें काय म्हणून मी मरून जावें? माझ्या प्रेमप्रवाहाला कोण अडविणार? इंद्राचा ऐरावतहि त्याला अडवूं शकणार नाहीं. त्याच्या तुफानी लाटा आजहि बंद झालेला दरवाजा उघडूं शकतील. मी मनांत आणलें तर पुनीतला तेव्हांच आपलासा करीन! त्यांत कसला अपराध? आत्म्याचा छळ करून मिळणाऱ्या गौरवापेक्षां या अपराधाचा कलंक शतपटीनें बरा. आनन्दाच्या अथांग सागरांत बुडून मग मृत्यु कां येईना! त्या मरणांतहि जिवंतपणाच आहे. अतृप्त आकांक्षांची समाधि रचून कसला परमार्थ साधणार मी?—'

त्यागाच्या उदात्त हेतूचें तिच्यानें समर्थन करवेना. वासनेच्या भुकेलेल्या ज्वालांनीं ती हतबल झाली. स्वत:ची वंचना तिला सहन होईना. स्वत:ला अतृप्तीच्या खाईत लोटून त्यागाच्या उच्च प्रेमाचा गौरव करणें हा एक प्रकारचा भ्याडपणाच आहे. असें तिला वारंवार वाटूं लागलें. पण दुर्दैवानें दावा साधून जो दुवा सांधला गेला तो कसा तोडावा? हेमाच्या सौभाग्यावर दरवडा घालण्याचें सामर्थ्य मला कुठें आहे? तें साहस मी कसें करूं? छे. तें शक्यच नाहीं—

ती हताश झाली. आपण काय केलें हें जाणणाराहि कोणी नाहीं. 'अरेरे' असें म्हणून आपल्यासाठीं दोन अश्रु टाकील असें मायेचें माणूस तरी कोण आहे? हेमा पक्की स्वार्थी!! माझ्यासमोर ती हौस-मौज करून मला हिणविते! तिला त्याबद्दल कांहींच वाटत नाहीं! पुनीतला तर माझें प्रेम अज्ञातच आहे—

पण तें व्यक्त केलें तर पुनीत वळणार नाहीं थोडाच! ही अशी एकांताची संधि, सगळें जग झोंपी गेलेलें, मी काय केलें हें पहायलाहि कोणी नाहीं. मी एकटी तसा पुनीतहि या वेळीं एकटाच आहे. हेमा केव्हांच झोंपी गेली असेल! तृप्तीनंतर समाधान आणि समाधानानंतर गाढ झोंप हें मुळीं जगाचें तत्त्वच आहे. माझ्यासारखी तळमळणारी मीच. आतां अडथळा कसला? मनांत येईल तें मी यावेळीं करूं शकेन. कुणालाच मी भिणार नाहीं. आणि भ्यावं तरी कां? हेमाला मात्र सुखासमाधानानें

जगण्याचा अधिकार आहे आणि मलाच नाहीं?

—मी आणि पुनीत वारंवार एकत्र येतों. एकान्तांत असतों. माझ्या बौद्धिक सामर्थ्यावर त्याचें अत्यंत प्रेम आहे. त्यानें तशा प्रसंगीं माझ्याकडे कौतुकानें पहातांच मी माझें सगळें यौवनकौशल्य एकत्र करून जर केवळ नेत्रांनींच प्रेम व्यक्त केलें, माझी क्षुधा जाणवली तर तो काय मला दूर लोटील? अशा अनेक प्रसंगानंतर एखादे वेळीं तरी तो मला जवळ ओढून निर्भरालिंगन देईल–अहाहा! केवढा आनन्द मला लाभेल!! मला किती समाधान वाटेल—'

यापुढें तिच्यानें विचारच करवेना. कल्पनातिरेकानें ती वेडी झाली. त्या काळोखांत तिच्यानें क्षणभरही राहावेना. तिनें हलक्या हातानें दरवाजा उघडला आणि पावलें न वाजवितां ती पोर्चमध्यें येऊन उत्तर रात्रीच्या शीतलवायुलहरींनीं आपला दाह शांत करण्याचा प्रयत्न करूं लागली. तिची वेपभूषा अस्ताव्यस्त झालेली होती, पदर जमिनीवर पडला होता आणि भालप्रदेशावर मोत्यांच्या जाळीप्रमाणें घर्मबिंदु चमकत होते.

कर्मधर्मसंयोगानें पुनीतही याच वेळीं आपल्या खोलींतून बाहेर आला आणि त्यानें पोर्चमधला विद्युद्दीप लावला. अर्थात् प्रेमा त्याच्या नजरेला न पडणें अपरिहार्य होतें. दोघेंही एकमेकांना पाहून चकित झालीं. मात्र पुनीतची मनःस्थिति आणि प्रेमाची मनःस्थिति यांत जमीनअस्मानाचा फरक होता.

प्रेमाला वाटलें, 'आतांपर्यंत ज्या उत्तेजक कल्पनांनीं मी वेडावून गेलें होतें त्या कल्पनेची सिद्धीच माझ्यासमोर उभी आहे.' मनाच्या या भावनेसरशीं ती आनंदाचा आवेग आणि भीति यांनीं घाबरून गेली. तिचें सर्वांग कांपूं लागलें.

पण पुनीतच्या मनांत तसें कांहींच नसल्यामुळें तो त्या तिच्या आविर्भावानें चकित होऊन म्हणाला, 'ताई, अजून झोंपली नाहींस? बरं वाटत नाहीं का?'

शुष्क झालेल्या ओंठावरून कोरडी झालेली जीभ फिरविण्याचा व्यर्थ

प्रयत्न करीत अडखळणाऱ्या स्वरानें प्रेमा म्हणाली, ‘ तसं कांहीं नाहीं. झोंपच येईना म्हणून--- ’

‘ पण मला नाहीं तसं वाटत.’ असें म्हणून पुनीतनें पुढें होऊन तिच्या मस्तकाला हात लावून पाहिलें.

त्याच्या त्या स्पर्शानें प्रेमाची उरली सुरली शुद्धीही नाहींशी झाली. आतां पुढें काय होणार हें तिचें तिलाच कळेना ! पूर्ण एकांत, आणि निस्तब्ध रात्र. दोघें एकमेकांजवळ उभीं ! ! कोण तो बिकट प्रसंग !

‘ ताप बराच चढलेला दिसतो ! ’ पुनीत म्हणाला.

“ ताप कांहीं नाहीं; पण कपाळ थोडंस तापलं आहे खरं ”

“ मग मी एक औषध आणून देतों. ” असें म्हणून पुनीत मागें वळला.

पण तितक्यांत प्रेमानें त्याचा हात करून त्याला थांबविलें. ुनीत थांबला आणि तिच्या चेहेऱ्याकडे पाहूं लागला.

अगदीं आणिबाणीची वेळ होती ती ! ! अधोगतीचा भयाण खोलच खोल मार्ग समोर दिसत असल्याचा प्रेमाला भास झाला. ती दचकून म्हणाली. “ नको. कांहीं नको. मला आतां बरं वाटतंय. मी झोंपतें जाऊन. ” बोलतां बोलतां स्वतःला कसेंबसें सावरून घेऊन ती झर झर पावलें टाकीत आपल्या खोलींत येऊन धाडकन् बिछान्यावर पडली.

पुनीतला आश्चर्य वाटून ती गेली त्या दिशेकडे तो पहातच राहिला. त्या एकच स्पर्शात दुसऱ्याच्या सुप्त भावना जागृत करण्याचें तर सामर्थ्य नसेल !

पण कांहीं असलें तरी कडेलोटाच्या शिक्षेंतून प्रेमाचा थोडक्यांत बचाव झाला ही गोष्ट मात्र खरी !

---

## : १६ : : विचारांच्या वावटळींत—

रात्रीचें वादळ ओसरल्यानंतर प्रेमाला चांगली झोंप लागली आणि सकाळीं उठल्यावर हुषारीहि वाटली; पण त्यानंतर मात्र ती तेथें थांबली नाहीं. हेमाचा निरोप घेऊन व तिच्या मुलाला थोडा वेळ आंगाखांद्यावर खेळवून ती आपल्या मोटारींतून घरीं येण्याला निघाली; वाटेंत सुनीतला भेटण्याची तिला इच्छा झाली. कारण मगनलालनें पैसे घेतल्यानंतर केसची व्यवस्था काय झाली हें तिला समजावून घ्यायचें होतें. हेमानेंच नको म्हटल्यामुळें पुनीतकडे तिनें ती गोष्ट काढली नाहीं. आणि विनीतला त्या बाबतींत विचारावें असें तिला वाटेना.

कारण त्याचा आणि हेमाचा झालेला संवाद तिनें ऐकल्यापासून त्याच्यावर ती रागावली होती. शिवाय 'तो एक स्वार्थैकवृत्तीचा लोभाळू माणूस आहे. प्रेमाचा सन्मान कसा करावा हें त्याला कळत नाहीं. वासनातृप्ति हेंच विवाहाचें कारण असें त्याला वाटतें. तसेंच सुनीतवर माझें प्रेम जडल्याचें पुनीतजवळ बोलण्याला त्याला लाजहि वाटली नाहीं. संशयानें संसाराचें स्मशान करणाऱ्या क्रूर राक्षसाप्रमाणें तो निष्ठुर आहे. त्याच्याशीं काय बोलावयाचें!' असल्या अभिनिवेशानें ती त्याला टाळण्याचा प्रयत्न करीत होती.

अर्थात् सुनीतचीच भेट घेणें अगर त्याला आपल्या घरीं बोलावणें हेंच या बाबतींत योग्य दिसतें असें ठरवून तिनें आपली मोटार तिकडे वळविण्यास ड्रायव्हराला सांगितलें.

सुनीत दुकानांतच होता; पण गिऱ्हाइकाशीं बोलण्यांत गुंतल्यामुळें प्रथम त्यानें प्रेमाकडे पाहिलें नाहीं. गिऱ्हाइकाचा सौदा पटून माल देण्याची कामगिरी गड्याला सांगितल्यावर मोटारींत असलेल्या प्रेमाकडे त्याची नजर गेली. तो लागलीच पुढें होऊन म्हणाला, 'कशाला इकडे

येण्याचे श्रम घेतलेस प्रेमा! मला निरोप पाठविला असतास तर मीहि आलों असतों!"

"खरं? तर मग चांगलंच झालं! तुम्हीं संध्याकाळीं याल?" प्रेमा उत्सुकतेनें म्हणाली.

"हो अवश्य येईन." नंतर कांहीं वेळ थांबून त्यानें विचारलें, "पण कोणा मित्राची–वगैरे एंगेजमेंट ठरलेली नाहींना? नाहीं तर त्या दिवशीं सारखा उगाच रुसव्या फुगव्याचा प्रसंग यायचा! तो एक बॅरिस्टर त्या दिवशीं रागावून गेला म्हणून म्हणतों. रागावूं नको."

"तसं कांहीं नाहीं बरं. या केसच्या भानगडीमुळं असले प्रसंग उद्भवतात.' प्रेमा उगाचच उजव्या हाताच्या करांगुलीचें नख दातांनीं कुरतडीत म्हणाली. मात्र तिला तो टोमणा बराच जाणवला असावा असें तिच्या वक्र झालेल्या डाव्या भुंवईवरून व्यक्त होत होतें

"हं, ती केस" सुनीत कांहींसा खिन्न होऊन म्हणाला, "प्रेमा, तूं उगाच त्यांत पडलीस! पण आतां काय त्याचं!! गोष्ट होऊन गेली. मात्र या सगळ्या रहस्यमय प्रकाराच्या बाबतींत तुझ्याशीं मी मनमोकळेपणानं बोलणार आहे. कारण माझ्या यापुढें होणाऱ्या हालचाली निराशाजनक आहेत. भवितव्य कांहीं ठीक दिसत नाहीं. म्हणून मी निरवानिरव करण्याच्या मार्गांत आहें. तेव्हां कांहीं गोष्टी तुला तरी अज्ञात राहूं नयेत असं मला वाटतं."

"मला सगळं सांगितल्यावांचून मात्र कांहीं करूं नका, बरं."

"ते खरं आहे. आजवर तुझ्या उपदेशाप्रमाणं वागलों असतों तर असा प्रसंग कां आला असता!! मात्र आतांची वेळ निराळी आहे."

"खरंच विसरलें. त्या दिवशीं मी आलें तेव्हां तुमच्या दुकानांतून जी एक पंजाबी बाई बाहेर आली ती कोण?" अगदीं सहजगत्या आपण हा प्रश्न करीत आहों असें सुनीतला भासविण्याचा वृथा प्रयत्न करीत प्रेमानें विचारलें.

या प्रश्नावर सुनीत हंसला; पण तें हास्यहि विषादपूर्णच होतें. नंतर

आहे. आणि आश्चर्य हें कीं तीहि तुझ्या भेटीला येण्यासाठीं उत्सुक आहे. तेव्हां तिलाच तुझ्या घराचा पत्ता सांगतों म्हणजे झालें. कसें?"

या उत्तरानें प्रेमा चकितच झाली. हें एक तिला नवीनच रहस्य वाटलें. आश्चर्याचा पहिला आवेग ओसरल्यानंतर ती म्हणाली. "तेंहि उत्तमच. तुम्ही मात्र आज यायला विसरूं नका."

"नाहीं विसरत. इतक्या अगत्यानं बोलविणारं तरी कोण आहे मला!!" असें म्हणून त्यानें तोंड फिरविलें. प्रेमालाहि त्याच्या त्या शेवटच्या शब्दांनीं चांगलाच चटका लावला; पण नंतर विशेष कांहीं न बोलतां तिनें ड्रायव्हरला मोटार चालविण्यास सांगितलें.

तिचे विचार आतां त्या दिशेनें चालू झाले आणि ती जेव्हां घरीं येऊन पोंहोचली तेव्हां नित्यनियमाप्रमाणें आईकडे न जातां, आपल्या खोलींत जाऊन कोचावर आडवी झाली. 'सुनीत असें कां बोलतो, तो खिन्न कां, मगनलालच्या बाबतींत त्याला कांहींच कळलें नसेल का, आणि ती पंजाबी बाई मला भेटायला कशाला येणार?' या प्रश्नांकित विचारांनीं ती अस्वस्थ झाली. रात्रींच्या उच्छृंखल विचारांना तिनें केव्हांच मूठमाती दिली होती. विचारी आणि संयमी माणसांची ही संवयच असते. **मनुष्य हा केव्हांहि स्खलनशीलच आहे; पण ती जाणीव होतांच चट्कन त्यापासून मागें फिरणें, हेंच त्याचें वैशिष्ट्य. अशा अवघड मार्गानें जातां जातांच त्याला अतिमानवत्व येतें. नसत्या अभिमानाला बळी पडून आत्मवंचना न करणें आणि अन्तःकरणाकडे प्रामाणिक असणें हेंच यांतील रहस्य आहे.**

प्रेमा नेहमींप्रमाणें स्वयंपाकघरांत कां आली नाहीं हें जाणून घेण्याच्या इच्छेनें तिची आई चहाचा भरलेला कप हातांत घेऊनच आंत आली आणि मलूल चेहेऱ्यानें कोचावर पडलेल्या आपल्या लाडक्या मुलीच्या तोंडावरून हात फिरवीत म्हणाली, "रात्रीं जागरण झालं वाटतं! आधीं चहा घे पाहूं."

आईचें तें गोंजारणें आणि वात्सल्याचें बोलणें ऐकून प्रेमाला पुष्कळच बरें वाटलें. ती लाडिकपणानें आईच्या मांडीवर एक हात ठेवून चहाचा

एकेक घोंट घेत म्हणाली, " आई, तूं माझी अशी काळजी घेतेस म्हणूनच असं ढोंग करून केव्हां केव्हां मला एकीकडे पडण्याची हौस येते. आतां किती किती बरं वाटलं म्हणून सांगूं!"

" पोरी तूं फारच गोड बोलतेस ग! पण माझं म्हणणं कांहीं ऐकून घेत नाहींस " म्हातारीनें तिच्याकडे सहेतुक नजरेनें पहात म्हटलें.

मुलीनें लवकर लग्न करावें हीच आईची इच्छा असणार! दुसरें काय!! प्रेमाला हें माहीत होतें. त्यामुळें तो विषयच बदलण्याच्या हेतूनें तिनें नुकतेंच टेबलावर आणून टाकलेलें पत्र उचलून म्हटलें. " कुणाचं बरं हें पत्र ? "

तितक्यांत आईला कसलीशी आठवण होऊन ती म्हणाली, " अग, काल तूं गेल्यावर विनीत इथं येऊन गेला. तुलाच भेटण्यासाठीं तो आला होता."

" ते या बाजूला नेहमींच फिरायला येतात. मी असेन म्हणून सहज आले असतील झालं " त्या बाबतींतही जास्त बोलावें लागूं नये म्हणून प्रेमानें त्याला तितकेंसें महत्त्व न देण्याच्या इच्छेनें म्हटलें आणि पत्र फोडलें; पण विनीतनें क्षमायाचना केलेलें तें पत्र असल्यामुळें ती कांहींशीं चिडून म्हणाली " मनुष्य विलायतेला गेला म्हणजे पदोपदीं क्षमा, विनंति आभार, असले बिनअर्थाचे शब्द वापरायला शिकतो, नाहीं ग आई ?"

" असेल बाई, मला काय ठाऊक ! " असें म्हणून तिच्या आईनें रिकामा कप उचलून घरांत जाण्यासाठीं जमिनीवर पाय टेकले.

पण आईला राग आला हें प्रेमानें जाणलें आणि दोन्हीं हातांनीं तिला धरून म्हटलें, " असं रागवायचं नाहीं गडे ! मी लग्न करीत नाहीं असं का म्हटलं कधीं ? पण तुझ्याजवळून दूर जावंसं वाटतच नाहीं बघ. ती गेल्यें तर तुला तरी बरं वाटेल का आई ! "

मुलीचें हें बोलणें ऐकून आईचा राग कुठच्या कुठें निघून गेला. ती तिला कुरवाळून म्हणाली, " शिकलीस पण चीज केलंस पोरी ! किती ग गोड बोलतेस. पण असं पहा, माझे असे आतां किती दिवस उरले आहेत ? "

" माझी शप्पथ आहे बघ. असं भलतंच बोलायचं नाहीं. मी लग्न करतें; पण तूं माझ्या आयुष्यभर राहा बाई. नाहीं तर माझी कांहीं धडगत नाहीं. " प्रेमा अगदीं गहिंवरून म्हणाली. कारण वडिलांच्या अस्पष्ट स्मृतीनंतर तिचें जाणिवेचें जीवन मातृमयच झालेलें होतें. शिवाय ती अगदींच हळव्या मनाची भावनाप्रधान मुलगी होती.

" तूं अगदींच जगावेगळी मुलगी आहेस ! तुझ्या मनासारखंच सगळं होईल बरं. उगाच वेडप्यासारखं कांहीं तरी बोलूं नये. झं आतां लग्नाचं वय होऊन गेलं, हेमा तुझ्यापेक्षां लहान, पण तिनं आपला संसार थाटला--"

" पण मी अजून शिकणार आहें. मला अजून शिक्षणाचा कंटाळा आलेला नाहीं. "

" तें मला कळतं. तुला कसला कंटाळा आला आहे आणि कसली आवड उत्पन्न झाली आहे हें मी जाणतें. तुला नाहीं तें कळायचं. आणि कळलं तरी तूं बोलणारहि नाहींस. विनीत कसा चांगला मुलगा आहे नाहीं ? "

प्रेमा हंसून म्हणाली, " होय. श्रीमंत, शिकलेला सर्व कांहीं आहे. मग?"

" तुला तो चांगला शोभेल. "

" तेंहि खरं; मी कोणाला शोभण्यासाठीं जन्माला आलेली नसून ज्ञानप्राप्तीनं स्वतःचं अन्तःकरण शोभिवंत करणार आहें. "

" लग्न करून तें मिळवितां येत नाहीं वाटतं ? "

" आई, आजवरच्या संसाराची गोष्ट वेगळी होती. आतांचे संसार निराळे आहेत. अजाणतेपणांत होऊन गेलेल्या गोष्टी अंगवळणीं पडतात पण जाणतेपणांत त्याच गोष्टीची चिकित्सा करावी लागते. बरं वाईट पारखावं लागतं. परिणामाची कल्पना करावी लागते--"

" तुझ्यापुढं मी काय बोलणार बालणार बाई ! आमचं युग संपलं हेंच खरं. "

" तसं नव्हे ग. तूं सांगतेस त्यासंबंधानं मी विचार करतें. तुला त्रास वाटेल असं मी कधीं तरी कांहीं करीन कां ? "

"नाहीं. त्याबद्दल माझी खात्री आहे."

"झालं तर. तूं मला एवढ्या एका गोष्टीबद्दल आग्रह करूं नको. एवढं माझं ऐक."

"समजलं. मी बोलत नाहीं. पण स्वतःच्या मनाची मात्र तूं फसवणूक करूं नको बरं पोरी! पस्तावशील." सावित्रीबाई गंभीरपणानें म्हणाली.

"तें माझं मी पाहातें; पण तूं रागावली नाहींस ना? तूं रागावलीस म्हणजे मला ब्रम्हांड आठवतं बघ!" आपल्या आईच्या डोळयांकडे टक लावून पहात प्रेमा म्हणाली.

"नाहीं बरं. रागावेन कशाला? आतां अंग धुवून घे आधीं. लवकर जेव आणि झोंप. रात्रीं बरंच जागरण झालेलं दिसतं" असें म्हणून सावित्रीबाई घरांत गेली. मुलीचा स्वभाव तिला माहित असल्यामुळें तिनें आग्रह धरला नाहीं.

प्रेमाही आंग धुवायला उठली; पण 'लग्नाचा प्रश्न आतां कायमचाच आपल्यापुढें राहणार' या विचारानें ती भारावल्यामुळें तिचे सगळे व्यवहार, यंत्राप्रमाणें होऊं लागले. जेवतांनाही ती फार बोलली नाहीं.

पण जेवणानंतर जेव्हां तिला एकांत मिळाला तेव्हां तिचें विचारचक्र पुनः सुरूं झालें. लग्न! आम्हां मुलींच्या मागें हा एक ससेमिराच आहे, हेमा म्हणते लग्न कर, आई म्हणते लग्न कर, आणि मी होय म्हणतांच 'परीक्षा' आणि 'पहाणें' सुरूं; पण माझं मन काय म्हणतें याचा कोणीच विचार करीत नाहीं. माझं मन मोकळं आहे असं का यांना वाटतं? वयमानाप्रमाणं विवाहाची कल्पना उद्भवतांच मी वरयोजना करून टाकली. योग्य वाटलेला संगतीचा सहचरी मनाचा मालक केला आणि काल रात्रीं त्याचं प्रत्यंतरहि आलं. मग आतां माझं मन मोकळं आहे असं मी म्हणूं तरी कसं? काल जर माझा तोल सुटला असता तर रसातळीं जाण्याला वेळ का लागता; पण मनाला आवरलं.

—तरी पण असं किती दिवस चालणार? त्यांच्या लॅबोरेटरींत मिळून मिसळून काम करायचं म्हणजे वृत्ति भडकणारच. नेहमींच कांहीं संयम

करतां येणार नाहीं. शिवाय साहचर्याची त्यांत भर पडणारच. बरं अभ्यास न करतां घरीं बसावं तर तेंही कठीणच. रिकामपणा घालवायचं तरी कसं? उमललेलं फूल वायुस्पर्शानं पुनीत होण्याची इच्छा करणारच. अतृप्त आकांक्षेचे वाफारे कांहीं मला स्वस्थता लाभूं देणार नाहींत.

—मग विनीतची विनंती मान्य केली तर? हेमा, पुनीत आणि आई या सर्वांनाच आनंद वाटेल. विनीतनांही आनंद वाटेल. क्षमायाचनेनें मला प्रसन्न करण्याची त्या बिचाऱ्याची कोण धडपड! पण त्यांचीं तीं स्वार्थी सुखलोलुप मतं!

—आणि तसं पाहिलं तर स्वार्थी नाहीं कोण? निरपेक्ष प्रेमानं मला तरी कुठं सुखी होतां आलं! मनुष्याच्या जीवनाला परिस्थितीचं बंधन हें आहेच. उदार आणि उच्च मनोवृत्तीलाहि आकांक्षा नसतात असं नाहीं. आकांक्षा आली कीं देशकालपरिस्थिति पहावी लागणारच. उगाच वारेमाप विचारांच्या अधीन होऊन अनेकांच्या दुःखाला कारण होण्यांत काय अर्थ! आणि माझ्या मताप्रमाणं वागून मी सुखी होईनच अशी तरी खात्री कशी बाळगावी? भवितव्य कधींच कोणाला पारखतां येत नाहीं. आणि त्याचं प्रत्यंतर म्हणजे हेमाचा विवाह!

—तेव्हां मला जरी विनीत योग्य वाटला नाहीं, तरी हेमाला त्याची चांगली माहिती आहे. ती कांहीं अयोग्य मनुष्याशीं माझी गांठ घालून देणार नाहीं. शिवाय संसार हाच अपुरा असल्यामुळं त्यांत सुखदुःखाची कमजास्त विषमता असणारच! तसं पाहिलं तर आजच्या या स्थितींत तरी मी सुखी कुठं आहें? निदान विवाहाच्या बंधनानं सुखदुःखाची विभागणी तरी होईल. कार्याला कारणाची तरी जोड देतां येईल. आईला वृद्ध-पणीं सुख लागेल. हेमाच्या मनांत कुढत असलेलं शल्य निघून जाईल.

अशा रीतीनें स्वल्पविरामाकडून पूर्णविरामाकडे विचारांना गती मिळतांच तिनें विनीतकडून सकाळीं आलेलें पत्र उचललें आणि या नव्या भावनांनीं नटलेल्या मनानें ती त्याच्याकडे पाहूं लागली. पत्रांतील प्रत्येक शब्द तिच्या हृदयाला आनंदकारक वाटत होता. तेंच पत्र; पण

मनोवृत्तींत बदल झाल्याबरोबर सकाळचा उपहासात्मक आविर्भाव नाहींसा होऊन आशेचा उत्साह मुद्रेवर खेळूं लागला. अर्थात् 'सुखदुःख ही मानीव भावना आहे. कल्पनेचा तरंग आहे' असें जें वेदान्ती म्हणतात तें खोटें नाहीं तर! मग कल्पतरु हें नांव आपल्या अन्तःकरणालाच दिलें पाहिजे. नन्दनवन, स्वर्ग, नरक, अधोगति, पाप, पुण्य, या सर्वांना शोधण्याला बाहेर कुठेंच जाण्याचें कारण नाहीं. आपल्या अन्तर्जगांतच सर्व कांहीं आहे.

पण हा वेदान्त प्रेमानें थोडाच ऐकला असता! आणि ऐकला असता तर मनाच्या शांततेसाठीं, सर्वांना सुखी करण्याच्या काल्पनिक तत्त्वज्ञानाचा आधार घेऊन बाह्य जगांतील विनीत कशाला पसंत केला असता?

आणि ही पसंती तरी कायम टिकली?—

---

## : १७ : : नवा प्रकाश.

सुनीत आला त्यावेळीं सायंकाळचे चांगले चार वाजून गेले होते. प्रेमाचें अन्तःकरण प्रफुल्लित झालेलें असल्यामुळें बागेंतील नव्या उमललेल्या डालियाशीं ती हितगुज करीत होती. त्या दिवशींच्या सकाळसारखाच जर यावेळीं विनीत आला, तर प्रथम तो या डालियाकडे पाहील आणि—

पण तिच्या मनांतील हे विचार जागच्या जागींच थांबले. कारण सुनीत आला तो थेट तिच्याजवळ येऊन म्हणाला, " मीं मागं एकदां सांगितल्याप्रमाणं तूं डालियाची लागवड केलेली दिसते. त्यावांचून नाहीं याला एवढीं मोठीं फुलं यायचीं ! खरं ना ?'

प्रेमानें आपले सगळे विचार बाजूला लोटले आणि चटकन् डालियाचें फूल खुडून तें सुनीतच्या हातीं देत म्हटलें, " ही गुरुदक्षिणा बरं. माझी ही बाग आज इतकी रंगारूपाला आली याचं सर्व श्रेय तुम्हांलाच आहे."

" तर मग तूं मला विसरली नाहींस म्हणायचं. केससंबंधीं तुला माहिती पाहिजे होती नाहीं ना ? "

सुनीत अलीकडे जास्तच मितभाषणी बनला. या तिच्या विधानाला या त्याच्या प्रश्नानें दृढता आली आणि तिचा त्याच्याबद्दलचा आदर जास्तच दुणावला. तिनें उत्तर दिलें, " होय. ती एक काळजी आहेच. "

" हीसुद्धां काळजी तुलाच ? प्रेमा तूं एकादी शापभ्रष्ट देवता होऊन कां बरं जन्माला आली नाहींस ? कीं हेमाच्या सुखासाठींच तुझा जन्म आहे ? मला तुझं अतिशय कौतुक वाटतं आणि तुलाच गुरु करावा अशी इच्छा होते. गेल्या तीन वर्षांत तूं मला भेटली असतीस—पण तो विषय आतां नको."

" कां ! बोला ना ! माझ्या स्तुतीला मी कंटाळणार नाहीं." प्रेमा हंसून म्हणाली.

" स्तुति ? स्तुति नव्हे वस्तुस्थिति ! प्रेमा, तुला जीं माणसं जाणत नाहींत त्यांच्यासाठीं तूं आपल्या जिवाचं रान करतेस आणि ज्याला तुझी किंमत वाटते, ज्याला स्वतःचा जीव धोक्यांत घालून तुला वांचवावं असं वाटतं; त्याला—"

"पण तसा प्रसंग कुठं आला आहे ?" प्रेमानें मध्येंच विचारलें.

"प्रसंग अनेकदां आले. पण स्वतः भावनाप्रधान असतांना बुद्धिप्रधानतेच्या भलत्याच अभिनवेशानें धुंद बनलेलीं तुम्ही माणसं, ते प्रसंग जाणूनच कशाला घेतां ? आतांच पहा. हेमासाठीं मला कायमच्या कारागारांत अडकविण्याला तूं तयार झालीसच कीं नाहीं ? हेमाला सुखी करून तूं काय मिळविलंस आणि मी काय मिळविणार ? आतां पुनीतसाठीं म्हणशील तर माझी फांसावरही जाण्याची तयारी आहे. बरं मी असं विचारतों, या केससाठीं तूं सहा हजार रुपये कां खर्च केलेस ? "

या प्रश्नाचें उत्तर देणें प्रेमाला अवघड वाटलें. कारण 'मी कबुली जबाब देऊन तुरुंगांत जातों' असें सुनीतनें आपण होऊनच सांगितलें होतें. अर्थात् सराफाला बोलवून तो अतिप्रसंग करण्याचें कारण नव्हतें. आणि तसें करावयाचें होतें तर सुनीतची भेट घेऊन त्याच्याकडून अभिवचन मिळवावयाचें नव्हतें. या दुटप्पी वागण्यांत सुनीत हा विश्वासार्ह नाहीं असें व्यक्त करण्याचाच आपला हेतु दिसतो. अर्थात् उत्तर काय द्यायचें ? प्रेमाला तें देतांच येईना.

"हेमानं उठविलेल्या लोकवार्ता ऐकून प्रेमा, तूंही फसलीस. या सुनीतला तूं ओळखलं नाहींस ; पण तुझा हेतु चांगला आहे हें मी जाणतों. त्यासाठीं स्वतःचा अपमानही तूं सहन केलास. मगनलाल फसला; पण उद्यां तुझ्या लग्नाच्या वेळीं त्यानं तुला पाहिली तर काय प्रसंग ओढवेल याचा तूं विचार केलास का ? आतां लग्नच न करण्याचा तुझा विचार असेल तर उत्तमच; पण—"

प्रेमा घाबरून म्हणाली, "खरंच सांगतें. मी हें चांगल्या भावनेनं केलं. माझ्या मनांत त्यावेळीं इतक्या दूरवरचे विचारच आले नाहींत. आतां मात्र हें निराळंच होऊन बसलं."

"मग ती लोकवार्ता खरीच म्हणावयाची तर?"

"कसली?"

"विनीतशीं लग्न जुळविण्यांत हेमानं पुढाकार घेतला आहे ही?"

"इतक्यांत याला लोकवार्तेचं स्वरूप आलं?"

"वकील मंडळींत याच विषयावर आज चर्चा चालली होती. आपल्या घरांतील गोष्टी सामान्य लोकांत नेहमीं चर्चेचा विषय बनून राहतात याची श्रीमंतांना दादहि नसते. कारण सामान्य माणसांत मिसळणं त्यांना कमीपणाचं वाटतं ना?"

"विनीतनंच हें जाहीर केलं असलं पाहिजे." प्रेमा कांहींशी रागावून म्हणाली.

"विनीत आढ्यतेनें सांगतो तर पुनीत तुझी प्रशंसा करण्याच्या हेतूनं सांगतो. दोष कुणाला द्यायचा आणि कसा? शिवाय तूं एक अविवाहित कुमारिका आहेस या दृष्टीनं लग्नाचीं बोलणीं चालायचींच! पण तुझा अवघडपणा इतरांना कसा कळणार?"

प्रेमा बोलण्यांत इतकी हुषार; पण आज सुनीतच्या एकाही प्रश्नाला समयोचित उत्तर तिला देतां येईना. एका कर्तबगार आणि अत्यंत चतुर अशा धीरोदात्त पुरुषापुढें आपण आज उभी आहें अशी आजच तिला प्रथम कल्पना झाली आणि कल्पनेपेक्षां वास्तवता निराळी असते, प्रत्येक बाबतींत भावनाविवश होऊन चालत नाहीं हें तिला या वेळीं पटलें. ती खालीं मान घालून तशीच उभी राहिली. पुनीत आणि विनीत यांच्यापेक्षांहि सुनीतमध्यें कांहीं विलक्षण सामर्थ्य आहे असें तिला वाटूं लागलें.

तिची ती संकोचित वृत्ति आणि मुग्धता पाहून सुनीत हंसून म्हणाला "तुला अशी पाहण्यासाठीं मी आलों नाहीं, प्रेमा. बोलण्यासाठीं आलों आहें; तूं प्रत्येक गोष्ट आपल्या कल्पनेप्रमाणें चांगली म्हणूनच करतेस; पण वास्तवतेंत ती तुलाच बाधक होते. तूंच विचार करून पहा."

'तर मग मला दिलेला गुरुत्वाचा मान म्हणजे माझा उपहासच म्हणायचा!' प्रेमा उगाच रुसल्यासारखें करून डालियाचें दुसरें फूल तोडीत म्हणाली.

सुनीतनें हंसून उत्तर दिलें, "नाहीं. स्वतःचं कांहीं झालं तरी दुस-

त्याचं कल्याण करण्यासाठींच झटावयाचं हा तुझा गुण श्रेष्ठ आहे. आणि म्हणूनच मी तुला गुरुत्वाचा मान देतों; पण सगळींच माणसं जर तुझा असा फायदा घेऊं लागलीं, तर तुझी अवस्था काय व्हायची? पण त्या डालियाच्या अशा पाकळ्या कां तोडतेस? चल. घरांत जाऊं. बोलावलेल्या पाहुण्याचा कांहीं आदरसत्कार करशील कीं नाहीं? आणि मी असाच निघून गेलों तरी आई काय म्हणेल?"

"खरंच, चला पाहू." असें म्हणून प्रेमा पुढें झाली आणि हळूहळू येत असलेल्या सुनीतकडे मागें वळून पहात म्हणाली, "मग त्या केससंबंधानें काळजी करण्याचं कारण नाहीं ना?"

"नाहीं. आणि मलाहि कारावास पत्करावा लागेल असं वाटत नाहीं. आतां फक्त काळजी राहिली तुझी."

प्रेमाच्या विचाराला हा आतां एक नवीनच विषय मिळाला. ती त्याचाच विचार करीत घरांत आली. सुनीत मागोमाग होताच, त्याला पाहून सावित्रीबाईला आनंद झाला. ती म्हणाली, "बरी बाबा तुला सवड मिळाली. बैस. चहा ठेवतें."

"त्यासाठींच तर आलों; आणि आई, ती केसही आतां संपत आली बरं. गेल्या खेपेला माझ्यासाठीं तुझ्या डोळ्यांत पाणी आलेलं पाहून माझी आई आहे असं मला वाटलं. खरंच; आपल्यावर अगत्यानं आणि खऱ्या जिव्हाळ्यानं प्रेम करणारं कोणी तरी असावं असं वाटतं खरं." सुनीत पाटावर बसत मनमोकळेपणानें म्हणाला.

"आतां ती नोकरी सोडून तूं दुसरा कांहीं तरी उद्योग कां नाहीं पहात?"

"माझी स्थिति काय तुला माहीत नाहीं! पण आतां ती ग्रहदशा संपली असावी. कारण जुन्या ओळखीचीं माणसं माझ्याबद्दल काळजी वाहूं लागलीं आहेत." बोलतां बोलतां सुनीतनें प्रेमाकडे पाहिलें. निर्मळ अन्तःकरणाच्या त्या प्रेमळ नजरेमुळें प्रेमाला समाधान वाटलें, आणि आपली काळजी वाहणारा खंबीर मनाचा एक पुरुष आपल्या पाठीशीं उभा आहे अशी तिची खात्री झाली.

"तुझी काय वाईट स्थिति आहे? तूं लक्ष घातलंस तर सोन्याची लंका उभारशील!" आईनें म्हटलें. त्याचा हंसरा चेहरा पाहून तिलाहि त्याच्या पूर्वीच्या श्रीमंतीची आठवण झाल्यावांचून राहिली नाहीं.

"आतां मी लक्ष घालण्याचं ठरविलं आहे. विटांचा कारखाना विकून—"

"म्हणजे. तो कारखाना तुमचा?" प्रेमानें आश्चर्यानें विचारलें.

"तोहि एक मोठाच इतिहास आहे. त्या दिवशीं दुकानांत ती बाई पाहिलीस ना तूं, तिचा बाप तो कारखाना चालवितो. तो अत्यंत कुशल आहे. तो लाहोरकडचा राहणारा. मी त्याला फक्त पांच हजार रुपये दिले. कारण भांडवल नसल्यामुळें तो बेकार झाला होता. त्यांत नवऱ्यानें टाकलेली मुलगी पदरांत. हातीं आलेले पैसे त्याला देऊन मी वैतागानें निघून गेलों. आज त्या कारखान्याची चांगलीच भरभराट झाली आहे. त्या दिवशीं पंजाबांतील एक बडा शेट तो कारखाना पहायला आला आणि त्यानें तीस हजार रुपये देऊन कारखाना विकत घेण्याची इच्छा दर्शविली. त्या मुलीच्या बापानें माझ्याकडे बोट दाखविलें; पण मी कारावासाच्या तयारींत असलेला माणूस! मी कशाला तिकडे लक्ष देतों. शिवाय तुला तसं अभिवचन दिलेलं—"

"हं. हा चहा घे पाहूं आधीं" आईनें मध्येंच आठवण केली. कारण प्रेमा तर आ वासूनच तो इतिहास ऐकूं लागली. सावित्रीबाईही त्याच्याकडेच पहात होती. पण मध्येंच हाताला कढत कपाचा चटका लागल्यामुळें तिला चहाची आठवण झाली.

"हो. खरंच. मीहि विसरलोंच." असें म्हणून सुनीतनें कप उचलला.

"आतां त्या कारखान्याचं काय करणार?" प्रेमानें उत्सुकतेनें विचारलें. सुनीतच्या गतेतिहासाचें एक नवेंच पान तिला आज वाचावयास-नव्हे–ऐकावयास मिळालें होतें. शिवाय अभिवचनाची भानगड आई-समोर येऊं नये अशीहि तिची इच्छा होती.

"हा सगळा व्यवहार पुनीतमार्फत करावा म्हणतो."

“ आणि कारखाना नाहींच विकला तर ? ”

“ मागील देणघेणं घरवाडी सोडवायला पैशांची जरूरी आहेच. ”

“ मला तो कारखाना एकदां पहायचा आहे. दाखवाल का ? ”

“ केव्हांहि दाखवीन. शिवाय तेथें एक मोठा समारंभ करावा अशीहि माझी इच्छा आहे. ”

“ तसं झालं तर उत्तमच. तुमच्यासंबंधाच्या सगळ्या लोकवार्ता नाहींशा होऊन तुम्ही निष्कलंक व्हाल. ” प्रेमा आनंदानें म्हणाली.

“ कसल्या लोकवार्ता ? ” आईनें विचारलें.

प्रेमानें सुनीतकडे पाहिलें. सुनीत काय समजावयाचें तें समजला आणि म्हणाला “ ही केस नाहीं का झाली माझ्यावर, त्या बाबतींत.”

प्रेमाला सुनीतच्या चाणाक्षपणाचें कौतुक वाटलें आणि ती मनापासून हंसली.



## : १८ : : प्रेमाची तळमळ

अवघा दोन तास थांबून सुनीत घाईघाईनें निघून गेला; पण त्याच्या तेवढ्याच सहवासाचा प्रेमाच्या मनावर पुष्कळच परिणाम झाला. आधीं तो तिचा मित्र. एक घरंदाज श्रीमंत तरुण. कॉलेजपर्यंत एकत्र शिक्षण झालेलें. अध्ययनांत गढून गेलेला पुनीत न आवडल्यामुळें हेमा त्याच्या सहवासांत आली. त्यापूर्वी प्रेमाचाच तो सवंगडी. प्रेमाची आणि पुनीतची शिक्षणाची आवड एकसारखी. त्यामुळें त्या दोघांचा सहवास वाढत गेला. हेमाच्या अतिपरिचयामुळें सुनीत–प्रेमाची घडी विसकटली. बुद्धिप्रधानतेमुळें प्रेमाला पुनीत आवडला. सुनीतला वैषम्य वाटलें. तरी विचार करण्याला अवधी मिळण्यापूर्वीच हेमाच्या हातचें तो खेळणें बनला. पुढें विलक्षण योगायोगानें पुनीतशीं हेमाचा विवाह झाला. प्रेमा तर आधींच अंतरलेली ! अर्थात् सुनीत वेडा झाला, वैतागला आणि बहकला. हेमा त्याला टाळूं पहात असल्यामुळें तिनें त्यांत जास्त भर घातली.

'पण सुनीत तर अगदींच निराळा माणूस आहे ! तो पुरुषवर्गाचें भूषण आहे. हेमा त्याचा तिरस्कार करते, तो केवळ स्वतःच्या गतेतिहासावर प्रकाश पडूं नये म्हणून.'

ही विचारांची संगति जुळतांच प्रेमानें एक दीर्घ सुस्कारा सोडला आणि ती आपल्या खोलींत आली. दिव्याच्या झगझगीत प्रकाशांत तिला तें विनीतचें पत्र पुनः दिसलें. ती दचकली आणि 'बरं झालं, सुनीतनीं हें पाहिलं नाहीं.' असें म्हणून तिनें त्याचे तुकडे तुकडे करून टाकले. 'सुनीतच्या ऐवजीं विनीतचं आज आगमन झालं असतं तर त्या वेळच्या विचारांच्या भरांत मी त्याला विवाहाचं वचनहि देऊन टाकलं असतं,' असा एक ध्वनीहि तिच्या अन्तःकरणांतून उमटल्यावांचून राहिला नाहीं.

भावना, कल्पना आणि वास्तवता यांत विचारप्रवाहाच्या अनुकूल प्रतिकूल वेगामुळें कसे बदल होतात, मनुष्याला अतर्क्य शक्ति कां मानावी लागते आणि मनुष्य हा देशकाल परिस्थितीनें बांधला गेला असल्यामुळें कसा अगतिक आहे याचा तिला प्रत्यय आला. आतां आपला विवाह ही एक फारच अवघड बाब होऊन बसली आहे आणि आश्चर्य हें कीं, ही अवघडता एका शब्दानेंहि व्यक्त करतां येणें शक्य नाहीं. केवळ हेमामुळं हा प्रसंग आला, अतिकनवाळूपणाचं बक्षिस मिळालं, आणि तिच्या सुखासाठीं मी आपलं जीवन रुक्ष करून घेतलं! या विचारानें ती अस्वस्थ झाली.

—पुनीतनें तर माझ्या विवाहाच्या साखराहि वाटल्या. आतां त्याला, हेमाला आणि आईला काय सांगावं? विनीत लोभी आहे. वासनेनं अंध झाला आहे. तो तर आतां एकसारखा येत राहणार. आईनं नाहीं म्हटलं तरी अप्रत्यक्ष आग्रह ती करणारच. हेमाला तर माझ्या विवाहाची घाईच लागून राहिली आहे. पुनीतला मी माझी अवस्था सांगितली तर त्यानं विचार केला असता; पण माझं काल्पनिक पत्नित्वाचं अग्निदिव्य उघड करतांना हेमाचा विवाहपूर्वसहवास सांगावा लागेल. अर्थात् तोहि मार्ग बंद झाला. आतां ही गोष्ट कालावरच विसंबून ठेवणं भाग आहे.

—पण तोंपर्यंत मला स्वस्थता कशी मिळणार? विनीतचा प्रयत्न चालू राहणारच. हेमा माझ्या कल्याणासाठीं खटपट करणारच. मी म्हणतें, हेमाला ही नसती उठाठेव पाहिजेच कशाला? आणि तिनं विनीतची अशी काय माहिती मिळविली आहे? आईनं त्या दिवशीं लग्न झाल्याबद्दलची गोष्ट काढतांच तो कां दचकला? मी भावनेच्या आहारीं जाऊन, सर्वांना सुख व्हावें म्हणून त्याला विवाहाचं वचन द्यायलासुद्धां तयार झालें होतें.

—छट्. असा वेडेपणा नाहीं कामाचा. आणि मी सर्वांना सुखी करण्यासाठीं एवढी धडपडणारी कोण? शिवाय माझी ही धडपड मलाच एका अज्ञात जाळ्यांत अडकवीत आहे. कुणाला याची कल्पनाहि नसेल;

तरी पण माझ्या बाबतींत देव कांहीं तितका निष्ठुर होणार नाहीं. आज सुनीतमुळं माझ्या विचारांना निराळी दिशा लागली, मला नवी दृष्टि आली आणि भावनेच्या भरांत नुसत्या कल्पना लढवून भलतंच कांहीं करून बसूं नये असं वाटूं लागलं. अभावितपणानं आलेला अतर्क्यशक्तीचा हा संदेशच म्हणायचा !

—विनीत पंजाबांत होता. तेथेंच त्याचं शिक्षण झालं आणि तेथूनच तो विलायतेला गेला. अर्थात् विलायतेला जाईपर्यंतचा आणि विलायतेंत असतानाचा त्याचा इतिहास समजल्यावांचून मला त्याच्याशीं लग्न करायचं नाहीं असंच सर्वांना सांगावं. लहान आठ वर्षांच्या मुलीप्रमाणं मला कांहीं कोणी उचलून नेऊन माळ घालावयास लावणार नाहीं. वेळच आली तर प्रौढ कुमारिकांना मिळणार कायद्याचं संरक्षणही मी मिळवीन. नेहमीं हेमाच्याच मनाप्रमाणं वागावं आणि तिला सुखी करण्यासाठीं मी झटावं याचा अर्थ काय ? तिनं माझं मुळींच ऐकूं नये ?

विचारांच्या या दृढतेनें प्रेमाला चांगलेंच अवसान आलें; आणि या उत्साही विचारांच्या प्रेरकाकडे तिची नजर वळली. सुनीतनें अवघ्या दोन तासांच्या शब्दलाघवानें तिच्या दुबळ्या अन्तःकरणांत सामर्थ्याचा निर्झर निर्माण केला होता. शिवाय धर्म करतां कर्म उभें राहिलें म्हणजेहि मनुष्य कधीं कधीं साहसी बनतो. आकांक्षांच्या अतृप्तीला त्यागाचें महत्त्व देऊन अहंतेची उदात्त भूमिका स्वीकारली म्हणजे भुकाळू मनाची निःसत्त्वता प्रत्ययाला येऊन वासनांचा होणारा कोंडमारा सहन करावा लागतो. या सहनशक्तीनें सामर्थ्याचा ऱ्हास होतो. आणि स्वतःच निर्माण केलेल्या भस्मासुराच्या आहारीं जाण्याचा प्रसंग येतो. मनुष्याच्या नकळत्या मनाचे हे खेळ सर्वांनाच कळतात असें नाहीं; पण वेळींच तो सावध झाला नाहीं तर त्याची अधोगति होते. आणि याचा प्रत्यय एका निस्तब्ध रात्रीं प्रेमाला आल्यामुळें,— एकच स्पर्श तिचा कडेलोट करण्याला कारण झाल्यामुळें—यावेळीं तिची चूक तिला कळून आली. सुनीतच्या सजीव संदेशानें ती संजीवित

झाली आणि स्वार्थी लोकांच्या सुखाशा तृप्त करणें हें अतिमानवतेचें, उदात्त अन्तःकरणाचें ध्येय नव्हे हें तिनें जाणलें.

आणि यामुळेंच सुनीत तिला परमेश्वरासारखा वाटूं लागला. ‘ केसपेक्षां तुझीच काळजी मला जास्त वाटते ’ हे त्याचे शब्द तिला आठवले. ‘तुला दिलेल्या अभिवचनामुळें मी माझा वाढता व्याप आवरता घेतला ’ हें त्याचें समर्पण तिला कौतुकास्पद वाटलें. ‘कारखान्यांत एक मोठा समारंभ करावयाचा आहे’ असें त्यानें म्हणतांच ‘ तसं कराच, म्हणजे तुमचं निष्कलंकत्व सिद्ध होऊन तुम्हांला पुनः पूर्वींचा दर्जा प्राप्त होईल ’ असें तिनें अन्तःकरणाच्या जाणिवेनें सांगितलें. या सर्वांचा अर्थ म्हणजे क्षणिक उत्तेजन नसून त्यांत कांहीं तरी ईश्वरी संकेत आहे असेंच तिनें ठरविलें.

—हो. असंच. तसं नसतं तर त्यांचं निष्कलंकत्व सिद्ध व्हावं असं मला कशाला वाटलं असतं ! त्यांची ग्रहदशा संपली हीच गोष्ट खरी. आतां खात्रीनं पूर्वींप्रमाणं समाजांत त्यांना उच्च स्थान मिळणार. रावाचा रंक आणि रंकाचा राव करण्याचं सामर्थ्य काळांत आहे खरं. हेमासारखीं कांहीं उतावीळ माणसं क्षणप्रभावी काजव्यांना चंद्रसूर्यांची उपमा देऊन कृतार्थ होत असतील; पण तें क्षणभरच.

‘ आज आपल्यांत कांहीं तरी बदल झाला आहे. ’ असें प्रेमाला पुनः पुनः वाटे; मात्र काय बदल झाला आहे हें तिचें तिलाच कळेना; पण आतां सुनीतचा एकेक शब्द आठवून त्याचा अर्थ करूं लागल्याबरोबर तिला त्याचा उलगडा झाला. आणि ‘ ग्रहणानंतरचा सूर्यप्रकाश तीव्र असला तरी आल्हादकारक वाटतो ’ असें तीच स्वतःशीं पुटपुटली.

‘ मला आतां तो त्यांचा कारखाना पाहून त्यांत मन घातलंच पाहिजे. यासाठीं कांहीं पैसा घालावा लागला तरी हरकत नाहीं. वाढत्या भांडवलानें कारखान्याचीहि भरभराट होईल. आणि सुनीत एक बडे कारखानदार होतील...’

भावनाप्रधान प्रेमा कल्पनारम्य चित्रें रंगविण्यांत कुशल असल्यामुळें

ती किती वेळ तरी भविष्यकालांतील मनोवेधक दृश्याकडे मिटल्या डोळयांनीं पहात होती. मात्र तें दृश्य तिला शब्दानीं व्यक्त करण्याचें साहस होईना. त्या रात्रीचें तें भेसूर चित्र तिला भेडसावीत होतें. तरी पण ‘ तशीच वेळ आली तर सुनीतला तें सांगितल्यावांचून राहावयाचं नाहीं. ’ असें तिनें मनाशीं ठरवून टाकलेंच.

—तरी पण सुनीतनीं म्हटलं म्हणून ‘मगनलालच्या भीतीमुळं नाहीं बरं!’ असें ती बोललीच. आणि याच उद्गारांनीं तिचें धडपडणारें अन्तःकरण शांत झालें. तितक्यांत “ आज जेवायचं विसरलीस वाटतं ” हे आईचे उद्गार ऐकतांच ती धडपडून उठली. आणि ‘ आलें हं आई ’ असें म्हणून मागें वळन आरशांत पहात पहात खोलीबाहेर पडली.

---

## : १९ : : वादळी हवा !

" तुम्ही कांहीं म्हणा; पण प्रेमाचं लक्षण कांहीं मला ठीक दिसत नाहीं."

" आणखी काय नवीन प्रकार झाला ? " हेमानें उत्सुकतेनें विचारलें. कारण तिच्या दिराचे—विनीतचे—शब्द तिला आवडले नाहींत.

" तिचं सुनीतकडे जाणं येणं वाढत चाललं आहे. आतां तुम्ही मला कदाचित् दोष द्याल; पण स्पष्टच सांगतों, तिच्या हालचालींवर मी एकसारखें लक्ष ठेवून आहें. कारण अलीकडे प्रौढ मुलांमुलींत बाढत चाललेलं विवाहाआधींचें साहचर्य परिणामी घातक होतें असा लोकप्रवाद आहे."

विनीतचे हेहि शब्द हेमाच्या अन्तःकरणाला जाऊन भिडले. आपली तर अप्रत्यक्षच निंदा आपण ऐकत नाहीं ना, असाहि तिला क्षणभर भास झाला. कांहीं वेळ स्तब्ध राहून तिनें विचारलें, " तुम्हीं काय पाहिलें ? "

" काल इकडून जातांना ती त्याच्या दुकानाजवळ कांहीं वेळ थांबून त्याच्याशीं बोलत होती. सायंकाळीं तो तिच्या बंगल्यावर जाऊन दोन तीन तास तिच्याशीं बोलत होता. या भेटी—प्रतिभेटीचा अर्थ काय ? "

" खरं हें ? " क्रुद्ध होऊन हेमानें प्रश्न केला.

" मला खोटं सांगून काय मिळवायचं आहे ? शिवाय चालू केसमध्यें फिर्यादीकडून दिरंगाई चालली असून आरोपीच्या बायकोनं पैसे भरले अशीही कुणकुण ऐकतों. आरोपीचा वकील या बाबतींत मुग्ध आहे. तरी पण या केसमधून सुनीत सुटणार अशीं लक्षणं दिसतात. बदमाष आणि दगलबाज लोकांची आजच्या जगांत चलती आहे. म्हणतात, तें खोटं नाहीं. त्याच्या दुकानांत नेहमीं एक पंजाबी बाई असते असेंहि लोक बोलतात. एकदां तर मीहि तिला अस्पष्ट पाहिली. यावरून त्या मनुष्यासंबंधानें तुमचा काय तर्क चालतो ? सभ्य कुटुंबांतील मुलीबाळींत मिळून मिसळून वागण्याला तो योग्य ठरतो काय ? " आपलें बोलणें थांबवून विनीत गंभीर पण विषादपूर्ण मुद्रेनें हेमाच्या तोंडाकडे पहात राहिला.

हेमालाहि या प्रश्नाचें काय उत्तर द्यावें तें कळेना. तिला प्रेमाचा फारच राग आला. आतांच तिच्या घरीं जाऊन तिला यासंबंधानें जाब विचारावा असें तिनें ठरविलें; पण ' पुनीतला कळविल्यावांचून कांहीं करणं बरं नाहीं. ' असा एक विचार मनांत आल्यामुळें ती म्हणाली, " त्यांच्या-कडे यासंबंधानें तुम्हीं कांहीं बोललां ? "

" नाहीं. मी त्यालाच भेटण्यासाठीं कोर्टांतून सरळ इकडे आलों; स्वारी बाहेर गेलेली दिसते ! "

" कांहीं झालं तरी तुम्हीं निराश होऊं नका. कांहीं चुकीच्याहि समजुती होणं शक्य असतं. मी आतां स्पष्टच खुलासा विचारतें म्हणजे झालं. तुम्हीं माझ्याकडे बोललां हें ठीक केलं. या केसमध्यें तो चांगलाच अडकेल, अशी माझी अपेक्षा होती. "

" तें कांहीं नाहीं. अशा लोकांवर चॅप्टर केसच घातली पाहिजे. समाजांत असले लोक राहूं देणं म्हणजे समाजस्वास्थ्य बिघडवणं आहे. "

" हो. तुम्हीं म्हणता तसं झालं तर ठीक होईल. प्रेमाचेही डोळे उघडतील. " हेमा म्हणाली.

तिला आपल्या कायदेपंडित दिराचा बेत पसंत पडला. ' प्रेमाच्या लग्नांत सुनीतचं विघ्न नको. तो कायमचा नाहींसा व्हावा ' अशी तिची आंतरिक इच्छा होती. शक्य असतें तर प्रेमाच्या बाबतींत सुनीतला ती चार शब्दहि बोलली असती; पण त्याच्यासमोर जाण्याचें तिला धैर्य नव्हतें. पैशांनीं साध्य होईल असें कोणतेंही कृत्य करण्याची तिची तयारी होती, आणि म्हणूनच दिराला तिनें साहाय्याला घेतलें होतें.

पण पुनीतमुळें प्रत्येक बाबतींत तिला माघार घ्यावी लागत होती. त्यांतच प्रेमाचा हा बंडखोरपणा ! तसें पाहिलें तर हेमावर तिनें किती तरी उपकार केले होते. प्रेमाला दोष देण्याला तिला जागा नव्हती. उलट तिच्या आज्ञेंत हिनें वागायला पाहिजे होतें; पण सुनीतचा सूड उगविण्याच्या अभिनिवेशांत असल्यामुळें हेमाला त्या सगळ्या गोष्टींचा विसर पडत होता.

हेमा कांहींच बोलत नाहीं असें पाहून विनीत म्हणाला, " त्या दिवशीं

प्रेमाबद्दल मी तुमच्याजवळ ज्या गोष्टी बोललों त्याचा मला नंतर पश्चात्ताप झाला आणि मी क्षमायाचनेचं तिला एक पत्रहि पाठविलं."

"तें चांगलं केलंत, तुम्हीं—"

"काय चांगलं केलं?' असें म्हणत पुनीत आंत आला. त्यानें अंगावरचा पोषाखहि उतरला नव्हता.

"प्रेमाच्या बाबतींत आमचं बोलणं चाललं होतं. तिचं सुनीतकडे जाणं येणं यांना पसंत नाहीं, आणि तें योग्यच आहे." हेमानें मुख्य विषयाला सुरवात केली.

"कां योग्य आहे?" पुनीतनें प्रश्न केला.

या प्रश्नानें दोघेंहि दचकलीं. 'आपण एकदम इतकी घाई कारायला नको होती' असें हेमाला वाटलें आणि 'आपण या वेळीं इथं नसतों तर बरं झालं असतं' असें विनीतला वाटलें. कारण विचार करतां करतां ती गोष्ट इतकी महत्त्वाची आहे असें त्याला आतां वाटेना. शिवाय प्रेमावर इतका अधिकार चालविण्याचा आपला हक्क तरी काय हा प्रश्न होताच.

"आपली भावी पत्नी या दृष्टीनं हे तिच्याकडे पहातात, नाहीं का?" कांहीं तरी उत्तर दिलें पाहिजे म्हणून हेमा बोलली. विनीत स्तब्धच राहिला.

"पण या तुमच्या प्रयत्नाला तिची मान्यता आहे कीं नाहीं, हें नको का पहायला?"

"तिला काय कळतंय्?" हेमाला जणूं काय नवीनच अवसान येऊन ती जोरानें म्हणाली. कारण धुमसत असलेल्या या ज्वालामुखीचा एकदां स्फोट व्हावा अशी तिची इच्छा होतीच.

"ती इतकी परावलंबी नाहीं. आपणाला जी गोष्ट योग्य वाटली ती तिला सुचविण्याचं कार्य आपलं. मला वाटतं, यापेक्षां जास्त पुढं जाण्यांत अर्थ नाहीं."

पुनीतच्या म्हणण्याला विरोध करावा या हेतूनें विनीत म्हणाला, "आणि ती आडमार्गाला जात असेल तर?"

यावर पुनीतनें हंसून उत्तर दिलें, "ती तशी शहाणी आहे. तिची

बुद्धिमत्ता आम्हां सर्वांपेक्षां श्रेष्ठ दर्जाची आहे. तुला तिचा तितका परिचय नाहीं."

" त्यांना परिचय नसेल, पण मला आहे ना? सुनीत तिला फुसलावून आडमार्गाला नेत आहे. मी खात्रीनें सांगतें, तो तिचा अधःपात करणार!" हेमा अगदीं निवार्णीनें म्हणाली.

" तुझी कांहीं तरी चुकीची समजूत झालली दिसते. इतरांचा होणारा अधःपात टाळण्याचं तिच्यांत सामर्थ्य आहे. स्वतः तर ती कधींच फसणार नाहीं आतां, कोणी संकटांत सांपडला तर ती त्याला मदत करण्यासाठीं धांवून जाईल; त्यावेळीं स्वतःच्या जीवाकडेही पहाण्याचं तिला भान रहात नाहीं."

पुनीतचें हें बोलणें हेमाच्या हृदयाला जाऊन भिडलें. कारण तसा तिला अनुभवच आला होता; पण हें मान्य करणें म्हणजे आपला पराभव आहे. शिवाय तो विनीतसारख्या एका त्रयस्थासमोर! हट्टवादी हेमाला हें कसें मान्य होणार? तिनें उत्तेजित स्वरानें म्हटलें, " सुनीतचं आणि तिचं एकमेकांकडे जाणं येणं वाढत आहे. भाऊजींनींच या गोष्टी प्रत्यक्ष पाहिल्या."

विनीतकडे स्थिर दृष्टीनें पहात पुनीतनें विचारलें, " तूं त्या दोघांवर लक्षच ठेवलेलं दिसतं. सुनीत आणि प्रेमा पूर्वपरिचित आहेत. पूर्वी तो तिच्याकडे जात येत असे. तिची आईहि त्याला ओळखते. अशा स्थितींत तुझ्यासारख्या एका सुशिक्षितानं आणि त्यांतहि समाजांतील स्त्री-पुरुषांत मिळून मिसळून वागणाऱ्यानं त्या दोघांच्या बाबतींत तसा भलताच संशय घेणं योग्य नाहीं."

" पण तो एक बदमाष मनुष्य आहे, हें विसरतां कामा नये."

" आपण त्याला जामीन राहिला नसता, तर आज तो तुरुंगांतच दिसला असता. आणि प्रेमाची इतकी काळजी वाहण्याचाच प्रसंग आला नसता!"

हेमा आणि विनीत या दोघांचीं हीं बोलणीं ऐकून पुनीत चकित झाला; इतकेंच नव्हे तर 'सुनीतचा घात करावा असा तर यांचा बेत नसेल ना'

असाहि त्याला संशय आला. कांहीं वेळ स्तब्ध राहून विनीतकडे गंभीर मुद्रेनें पहात पुनीतनें विचारलें, "तुला सुनीतबद्दल काय माहिती आहे ? तुला इथं येऊन फक्त वर्ष सव्वा वर्षच झालं ! माझा तो स्नेही आहे. त्याची इष्टेट साठ सत्तर हजारांची आहे. आज जरी दुर्दैवानें ती गहाण असलो, तरी तो कांहीं कोणी रस्त्यावरचा भिकारी नव्हे. शिवाय तो पदवीधर आहे. घरंदाज घराण्यांतील तो एक सुशिक्षित तरुण आहे. निदान मी त्याला पांच हजार रुपयांना जामीन राहिलों यावरून तरी तुला त्याचं महत्त्व वाटलं पाहिजे होतं. त्याच्या देण्याघेण्याच्या भानगडी मिटल्या तर आज तो या शहरांतील एक धनाढ्य तरुण म्हणून पुढं येईल. शिवाय सध्यांच्या आरोपांतूनहि त्याची मुक्तता होणं शक्य आहे, असं आजच मला कळलं. या सगळ्या गोष्टींचा तूं विचार केला आहेस काय ? कायद्याचं एकांगी शिक्षण घेतांना व्यवहाराचे सामान्य धडेहि घेण्याला तुला सवड मिळाली नसावी, असं मला नाइलाजानं म्हणावं लागतं. आतां सांग, सुनीतकडे कोणत्या नजरेनें तूं पहाणार ?"

या प्रश्नाचें उत्तर विनीतला देतां येणें शक्य नव्हतें. हेमानें दिलेल्या अपुऱ्या माहितीवर विसंबून आपला एक प्रतिस्पर्धी या नात्यानें तो सुनीतकडे पहात होता. आणि प्रेमाकडे वळलेल्या वासनात्मक दृष्टीमुळें तो आंधळा झाला होता. त्यांतच हेमाकडून वारंवार मिळत जाणाऱ्या उत्तेजनाची भर पडलेली ! मग त्याच्यासारख्या विलासी आणि उच्छृंखल मनुष्याला इतर विचार कुठून सुचणार ?

विनीत कांहींच बोलत नाहीं असें पाहून हेमा म्हणाली, "तें कांहीं असलं तरी प्रेमाचा त्याच्याकडे असलेला ओढा मला पसंत नाहीं."

"तुला पसंत पडेल असंच तिनं वागावं असा प्रेमावर तुझा तरी काय अधिकार ? तिला काय कळत नाहीं ? तुझ्यापेक्षां शिक्षणानं आणि वयानं ती मोठी आहे."

"मोठी असली तरी जगाच्या व्यवहारांत ती लहानच आहे. आपण एकदां यासंबंधानं तिला स्पष्टच विचारावं. भाऊजींनीं तरी काय समजावं ?"

हेमाच्या या बोलण्याला पुनीतला मान्यता देणें भाग पडलें. कारण विनीतला वधूची परीक्षा करण्याला त्यानेंच बोलावून आणलें होतें. तरी-पण विनीत काय म्हणतो हें जाणून घेण्याच्या हेतूनें त्यानें त्याला विचारलें, "आमची प्रेमाताई तुला पसंत आहे. आतां तिची पसंती विचारायची, असंच ना ?"

"होय. पण तिनं आपल्या या वर्तनाचा खुलासा आधीं केला पाहिजे." विनीत म्हणाला.

"मग तिच्यावर तुझी अप्रत्यक्ष नजर होती, तुला ती विश्वासाई वाटतं नव्हती, हें तुला मान्य करावं लागेल !" पुनीतनें नाइलाजानें त्याला विचारलें. कारण प्रेमाच्या अगाध बुद्धिमत्तेवर व चातुर्यावर त्याचा विश्वास होता. आणि त्यामुळें तिला तसा प्रश्न विचारणें अपमानास्पद ठरेल हेंहि तो जाणून होता.

'तें कांहीं नको. तुझं लग्न ठरलं आहे. असंच तिला सांगावं. मात्र यापुढं सुनीत आणि तूं एकमेकांकडे जातां नये असं बजावून यावं.' हेमा उतावीळपणानें म्हणाली.

'तुझी इच्छाच असेल तर मी जातों; पण ही भाषा माझ्यापेक्षां तुलाच चांगली बोलतां येईल.' पुनीत संकोचानें म्हणाला.

'मी काय बोलायचं तें नंतर पाहीन.'

हेमाच्या या निर्वाणीच्या निकालानें पुनीतचा नाइलाज झाला. तो पोषाख उतरण्यासाठीं उठला आणि विनीतहि सुटकेचा निःश्वास सोडून जायला निघाला. मात्र जातां जातां आभारसूचक मुद्रेनें हेमाकडे पहावयास तो विसरला नाहीं.

---

## : २० : : विटांचा कारखाना.

आपल्याबद्दल हेमानें केवढें काहूर उभारलें आहे याची कल्पनाहि नसल्यामुळें प्रेमा आपल्या 'ओपल' मध्यें बसून दुसऱ्या दिवशीं सुनीतच्या दुकानांत आली आणि तेथून त्याच्यासह विटांचा कारखाना पहावयास निघाली.

शहराच्या बाहेर नदीच्या कांठीं एका उंच डोंगराशेजारीं रेल्वे स्टेशनापासून थोड्या अंतरावर या कारखान्याची उभारणी करण्यांत आली होती. पहिलीं दोन वर्षे खटपटींतच गेलीं. कारण कारखाना चालविणारा लाला रामशरण हा या भागांत नवीनच असल्यामुळें त्याला अडचणी पुष्कळ आल्या. वाळूचा पुरवठा करणें अवघड गेलें. सिमेंटच्या दरांत होणारी चढउतार त्याला नडली; पण खरेदी आणि मजुरी यांचें तंत्र जुळतांच सिमेंट कंपनीला या कारखान्याचें महत्त्व पटतांच, मालाची निपज उत्तम आणि विपुल करणें त्याला अवघड गेलें नाहीं.

विटा आणि कौलें हा माल मुख्य असला तरी मुख्य इमारत आणि सभोंवारची बाग यांना अवश्य असलेला, चुलीपासून फुलझाडें लावतां येणाऱ्या कुंड्यांपर्यंत इतकेंच नव्हे तर पन्हळी, कठडे, दरवाजे वगैरेसुद्धां अवश्य वस्तु या कारखान्यांत तयार होतात हें गिऱ्हाइकाला दाखविण्याकरितां, स्वतःला व मजुरांना राहण्यासाठीं लहान लहान घरें बांधण्यांत व बाग तयार करण्यांत लाला रामशरण यांनीं जें कौशल्य दाखविलें होतें तें कोणत्याही 'शोरूम' पेक्षां हृदयवेधक होतें. निरनिराळ्या निमित्तानें बाहेरील व शहरांतील प्रमुख लोकांना जमवून आपल्या गोड आणि कळकळीच्या भाषेनें लालासाहेब जेव्हां त्या कारखान्याची उपयुक्तता व भविष्यकाळीं त्याची असलेली आवश्यकता पटवून देत, तेव्हां तर सर्वांना त्याचें जास्तच कौतुक वाटे.

ते सांगत असत, “ अगदीं स्वस्त आणि लवकर आपलें घर तयार व्हावें असें जर तुम्हांला वाटत असेल, तें सुंदर आणि आकर्षक दिसावें अशी तुमची इच्छा असेल आणि सर्व ऋतूंत अनुकूल हवेचा लाभ मिळविण्याची आवश्यकता भासत असेल तर या मालाचा तुम्हीं उपयोग करा. सभोंवार बांधलेलीं घरें आणि तयार केलेल्या बागा पहा, टिकाऊपणाची खात्री करून घ्या म्हणजे आपल्या बंगल्याचे प्लॅन आमच्याकडेच आणावे असें तुम्हांला वाटेल. माती, दगड, मजूर आणि मनपसंत लांकूड याची उत्तरोत्तर कमतरता भासूं लागली आहे. कामधंदा, पेन्शन, नोकरी आणि शिक्षण यासाठीं शहरांत राहाण्याची आवश्यकता वाटत आहे, शहराबाहेर नव्या वसाहती स्थापन केल्यावांचून आरोग्य राहणें दुर्घट झालें आहे, अशा स्थितींत स्वल्प किंमतींत आटोपशीर घर बांधतां आल्यास उत्तम, असें साहजिक मनांत येतें; पण परस्वाधीनतेमुळें ती इच्छा फलद्रूप होत नाहीं. अशा वेळीं सिमेंट कांक्रीटच्या टिकाऊ वस्तूंचा हा कारखाना तुम्हीं आपल्या नजरेसमोर आणा, आपल्या भाग्यशाली गृहिणींना त्याची कल्पना द्या आणि मुलांबाळांच्या मनांत कुतूहल उत्पन्न करा म्हणजे सर्वांच्या एकत्र इच्छेनें, हातीं असलेल्या स्वल्प रकमेच्या साहाय्यानें तुम्हीं स्वतःच्या घरांत सुखासमाधानानें नांदूं लागाल.

‘ विटा आणि कौलें यांची उपयुक्तता व टिकाऊपणा सर्वांना पटत चालल्यामुळें मालाची निपज मोठ्या प्रमाणावर करावी लागत आहे. आणि या कामाची माहिती सर्वांना व्हावी म्हणून होतकरू मुलांनाही उद्योग शिकविण्यासाटीं या कारखान्यांत आम्हीं स्वतःच्या खर्चानें घेत आहों. तेव्हां भावी कारखानदार या नात्यानें तुम्हीं आपला एकेक मुलगा इकडे पाठवाल तर जास्त आपलेपणा वाढेल आणि माझ्यापेक्षां तम्हींच या कारखान्याचे प्रसिद्धिकर्ते व्हाल. . . ”

लाला रामशरणचीं हीं व्याख्यानें निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या प्रकारचीं असत. स्त्रियांना ते अन्तर्गृहाची उपयुक्तता पटवून देत तर मुलांना बागेचें व मोकळ्या हवेचें महत्त्व सांगत. एकंदरींत निपज आणि

प्रसिद्धि यांत ते नेहमीं गुंतलेले असत. दमून भागून घरांत आल्यावर त्यांची सुशील मुलगी मीना ही त्यांची प्रेमळ शुश्रूषा करून सगळा शीण-भाग घालवी; पण त्या परित्यक्तेची ती धांवपळ आणि तारांबळ पाहून ते मनांत म्हणत, ‘ देवा, माझ्या म्हाताऱ्याच्या आशीर्वादांत जर कांहीं सामर्थ्य असेल तर हिला लवकरच सुखाचे दिवस दाखीव. म्हणजे मग मी कुठें तरी एकाद्या तीर्थक्षेत्रीं खुशाल तुळसीदास वाचीत बसेन.’

प्रेमाला घेऊन सुनीत कारखान्यांत आला, तेव्हां लाला रामशरण हे अशीच देवाची प्रार्थना करीत बसलेले तिला आढळले. मीना त्यांच्या-साठीं गरम गरम फुलके तयार करीत कॉंक्रीटच्या शेगडीजवळ बसली होती. तिच्याकडे पाहातांच ‘ दुकानांत दिसलेली बाई ती हीच ’ अशी तिची खात्री झाली.

लालासाहेबांना प्रेमाची ओळख करून देतांना सुनीत म्हणाला, “ या शहरांत माझ्या हितासाठीं झटणारी ही प्रेमा. हिला आपला कारखाना पहायचा आहे. ”

“ आपभी मालक हैं. आपही दिखा सकते हो.” लालाजींनीं हंसत हंसत म्हटलें.

“ सुनीतबाबू, हमारीभि पहचानत—”

“ खरंच मी विसरलों; ” नंतर प्रेमाकडे वळून तो म्हणाला, “ही यांची मुलगी; हिचं नांव मीना. बिचारी सौभाग्यवती असून पतिसुखाला मुकलेली आहे. हिचे वडील हे लालासाहेब. हा कारखाना हेच चालवितात.”

प्रेमा मंद पावलें टाकीत मीनेजवळ गेली. पवित्र, शांत पण खिन्नतेची अस्पष्ट छटा असलेला मीनेचा सुंदर चेहरा पाहून भावनाप्रधान असलेल्या हळव्या मनाच्या प्रेमाला तिच्याबद्दल अत्यंत सहानुभूति वाटली.

प्रेमा आपल्याकडे येत आहे असें पाहून मीना उठली आणि खालीं वांकून तिला नमस्कार करीत म्हणाली, “ सुभागिनी का आशीर्वाद चाहती हूं. ”

मीनेच्या या वर्तनानें प्रेमाला गहिंवर आला आणि एकदम तिनें तिला पोटाशीं धरलें.

दोघींचें तें मीलन पाहून लालाजींचे डोळे भरून आले, ओंठ थरथर कांपूं लागले; शेवटीं तो आवेग त्यांना असह्य होऊन त्यांनीं वात्सल्यानें सुनीतला आपल्याजवळ ओढून बसविलें आणि आपला थरथरणारा हात त्याच्या पाठीवरून फिरविण्याला सुरवात केली.

प्रेमाला वाचा नसते. तें कृतींतच व्यक्त होत असतें. त्यामुळें बराच वेळपर्यंत सर्वत्र निस्तब्धता पसरलेली होती. मीनेसह प्रेमा खालीं बसलेली पाहून सुनीत प्रेमाला म्हणाला " मीनेला मराठीहि थोडं थोडं समजतं, बरं का?"

" हां. ये तूनें अच्छा किया. मै भी मराठी बोल सकता हूं! बोलो न " मनाला आवर घालण्याच्या हेतूनें लालाजी म्हणाले.

" मला हिंदी येत असतं तर बरं झालं असतें. आम्ही दोघी मन-मोकळेपणानं बोललों असतों. " असें म्हणून प्रेमानें सुनीतकडे पाहिलें आणि नंतर मीनेला म्हटलें,

" तूं मला भेटायला येणार होतीस असं ऐकलं! कां नाहींआलीस?"

" तुमी बडे लोक. पहचान नाहीं. इजाजत शिवाय आना कैसा हो सकता?" मीना खालीं पाहून मंद स्वरानें म्हणाली. कारण ' आपलं मराठी बोलणं या पाहुण्याबाईला कसं काय रुचतं कुणाला ठाऊक!' असें तिला वाटलें असावें.

" मी कोणी बडी नाहीं. आणि माझ्याकडे यायला परवानगीहि लागत नाहीं. आई आणि मी दोघंच असतों घरांत. तुम्हीं खुशाल केव्हांहि या. " प्रेमानें मीनाचे दोन्ही हात आपल्या हातांत घेऊन म्हटलें.

मीनेला या तिच्या प्रेमळतेमुळें जास्तच धैर्य येऊन ती म्हणाली, " लेकिन उस दिन आप के मोटार में— "

याचवेळीं सुनीत ओरडून म्हणाला, " मीनादिदी, मराठी मराठी— "

" हं. हं. भूल झाली " असें हंसत हंसत म्हणून ती प्रेमाला विचारूं लागली, " मोटारींत तुमच्याजवळ— "

" वेळ दुपारची आहे. लालाजींना भूक लागली असेल! " मीनेच्या विचारण्याचा अर्थ ध्यानांत येतांच तो प्रसंग टाळावा या हेतूनें प्रेमा मध्येंच म्हणाली.

मीनेलाहि आपण घाई केली असें वाटून ती उठली आणि वडिलांना उद्देशून म्हणाली, " अच्छा. मैं सबकूही परोसती हूं. भाग्यसे मेहेमान आये हैं. "

" हां. ये तो बात ठीक है बेटी. "

लालाजींच्या या बोलण्यावर ' आम्हीं जेऊन आलों आहों ' असें प्रेमानें व सुनीतनें दोघांनींही सांगितलें; पण मीना ऐकते कशाला! तिनें सर्वांचींच पानें मांडलीं, लोटा भरून पाणी ठेवलें आणि वाढण्याला सुरवात केली. अर्थात् लालाजींबरोबर त्या दोघांनाही बसावें लागलें. खट्टी डाळ आणि ऊन ऊन फुलके प्रेमाला फारच आवडले.

पण त्याच वेळीं कधीं न आलेला एक विचार तिच्या मनांत आला. 'सुनीत रोज कुठं जेवीत असेल बरं? ' तिनें आपल्याच मनाला प्रश्न केला; पण तिला त्या प्रश्नाचें समाधानकारक उत्तर मिळालें नाहीं. आणि ' स्वतःच जेवण करीत असेल ' या उत्तरानें तिच्या अन्तःकरणाला विलक्षण हुरहुर वाटली! ' अरेरे! इतकीं वर्षे त्यांनीं असंच आपलं आयुष्य घालविलं असेल काय? पूर्वी आचारी तरी होता; पण गेलीं तीन वर्षे! मिळालं तर मिळालं अन्न! केला तर केला स्वयंपाक!! कंटाळा आला तर उपासच!!! जेवण झालं कीं नाहीं हें कोण पहाणार? कुणाला अगत्य!...

फुलक्याचा मोडलेला तुकडा तसाच हातांत ठेवून अश्रुभाराक्रांतनेत्रांनीं तिनें सुनीतकडे पाहिलें. सुनीतहि त्याचवेळीं तिच्याकडे पहात होता. नजरानजर होतांच सुनीतनें मान फिरविली आणि लालाजींकडे पाहून म्हटलें, " एकादा एकटा माणूस, त्यांत पुरुष, तशांत माझ्यासा-

रखा अकिंचन, कसा काय जेवत खात असेल, याबद्दल उगाचच कांहीं माणसांना काळजी वाटते, नाहीं का लालाजी ? ”

“ जी ! ” लालासाहेब हंसून बोलूं लागले, “ एकादंच माणूस कां म्हणाना सुनीतबाबू ! बाकीचीं सगळीं ‘ भिकाऱ्यांनीं जगावंच कशाला ’ असें म्हणणाऱ्यांपैकींच ! ”

“ क्यौं, हमारी रसोई अच्छी नही हुयी बाबूजी ? ”

सुनीतच्या त्या प्रश्नानें प्रेमा केवढ्यानें तरी दचकली आणि एकदम उठली. मीनेनें सुनीतकडे पाहून हा प्रश्न विचारला त्याचें कारण हेंच.

प्रेमाला तो प्रश्न समजलाच नाहीं. कारण आपल्या अन्तःसंवेदनांशीं सुनीत इतका एकरूप झाला असेल अशी तिला अद्याप कल्पनाच नव्हती. साहजिक उद्भवलेल्या त्या जेवणाच्या प्रश्नानें तिला त्याची स्पष्ट कल्पना आली आणि आजवर नकळत्या मनाच्या कोंपऱ्यांत लपून बसलेले सगळे नाजूक मनोविकार जागृत झाले. इतकेंच नव्हे तर पुनीतच्या बौद्धिक साहचर्यांत उद्भवलेला प्रेमविकार हाहि सहवासजनित तात्पुरता असल्या-बद्दल तिची खात्री पटली.

नसत्या त्यागाच्या आणि उदात्त भावनेच्या अहंतेंतच आजवर मी झोंपून दिवस काढले म्हणायचे ! तें एक स्वप्नच तर ! आणि स्वप्न नसतें तर पुनीतचें अन्तःकरण माझ्या बाबतींत कोरडें कां राहिलें असतें ! आणि समसंवेदनांचा प्रत्यय तर मला आतांच प्रत्यक्ष आला. बाह्यसृष्टीं-तील रसायनाचें संशोधन करण्यांत काल घालविण्यापेक्षां अन्तःसृष्टींतील मानसिक घडामोडीचें पृथक्करण करण्यांत मी माझी अक्कलहुषारी खर्ची घातली असती तर ?...

‘ श्रीमंत माणसांना हात धुवायला पाणी द्यावं लागतं मीना ! ’ सुनीतच्या या आवाजानें प्रेमा आपल्या विचारतंद्रींतून भानावर आली आणि लाजून हंसऱ्या चेहऱ्यानें स्वयंपाकघरांत मीनेकडे गेली.

‘ बाबूजी, ही मुलगी विटांचा कारखाना पहाणार कीं विटांच्या कार-खान्यावर मालकी गाजवणार ? ’ लालाजींनीं हात धुवून खुर्चीवर बसतां बसतां सुनीतला विचारलें.

‘ उसमें क्या बडी बात है लालाजी ! वो अकेलीही पचास हजार रुपये अभ्भी दे सकेगी. लेकिन् हमें ऐसा नहि चाहता. ’

‘ वह बात ठीक है. अपनी जायदाद छुडानेकी कोशिश आप कर रहे है. तो कितना रुपया लगेगा आपको ? ’

‘ छब्बीस हजारमें सब कुछ होता है. ’

‘ और कारखाना चलानेके वास्ते भी उतनी जरूरी है.’

याच वेळीं एक तारेचा लखोटा शिपायानें आंत आणून लालासाहेबांजवळ दिला. तितक्यांत प्रेमा आणि मीना एकमेकींचा हात धरून बाहेर आल्या. वडिलांच्या नांवची आलेली तार पाहून मीनेला आश्चर्य वाटलें.

‘ क्या है ? ’ सुनीतनें विचारलें.

“ हम उस दिस शेटका नाम बोला था न ? उसनेही टेलिग्राम भेजदिया है. ‘ छोकरीका अंतिम शय्या हो गयी है. तुम दोनोको मिलनेका इरादा है. जलदी निकालो.’ येहि इसका मतलब.” नंतर लालाजींनीं मीनेकडे पाहून म्हटलें, ‘ मेलसे जाना पडता है. तुम भी चलो. मिनारका अंतिम इच्छा हमे नहि लौट सकता. ’

‘ तो अच्छा. चलो.’ एक दीर्घ निःश्वास सोडून मीनेनें अनुमति दिली.

‘ वखत देख कर, मिनारसे कबुली जबाब लिखके लेने में भूल न हो. शेठजीको भी सब बात बोल देना.’ सुनीतचें हें वक्तव्य अत्यंत गंभीरपणानें चाललें होतें. सुनीतचा असला गंभीर चेहरा प्रेमानें आजच प्रथम पाहिला. मात्र हे लोक कशाबद्दल बोलत आहेत हें तिला तितकेंसें चांगलें कळलें नाहीं.

‘ अच्छा. कारखानेकी देख भाल करो. चिठीमें सब हालत लिख देयेंगे. हमे आनेके बाद सब खुलासा हो जाता है.’ नंतर लालाजींनीं प्रेमाकडे पाहून म्हटलें, ‘ आम्हीं आजच लाहोरला निघतों. तुम्हीं कारखाना पाहा. हा आतां मोठ्या प्रमाणावर वाढविण्याच्या विचारांत आम्हीं आहों. तिकडून मी आल्यावर सगळा खुलासा करीनच. मात्र तुम्हीं स्वतंत्र राहा. दुसऱ्या कोणाच्या ताब्यांत जाण्याची घाई करूं नका.

माझे म्हाताऱ्याचे बोल ध्यानांत ठेवा. तसाच एकादा बिकट प्रसंग आला तर सुनीतबाबूजी आहेतच.'

इतकें झाल्यावर लालाजी जाण्याच्या तयारीला लागले व कारखान्यांतील मुकादमाला बोलवून कामें समजावून देण्यांत गढून गेले. प्रेमानेंही मीनेचा निरोप घेतला. पण निरोप देतांना मीनेचे डोळे भरून आले. थोडक्याच वेळाचा परिचय, भाषा भिन्न तरी पण दोघींनाहि एकमेकांबद्दल अत्यंत आपुलकी वाटत होती.

सुनीत कारखान्याकडे वळलेला पाहून प्रेमाहि त्याच्या मागोमाग निघाली. निघतांना मीनेला मिठी मारूनच तिनें तिचा निरोप घेतला. त्या दोघींचें इतकें महत्त्वाचें हितगज काय झालें तें त्यांचें त्यानांच माहीत.



## : २१ :

## : पहांटेपूर्वी—

प्रेमाला कारखाना पाहून आनंद वाटला. कांहीं कुंड्या, विटा, कौलें, बागेच्या व बंगल्याच्या उपयोगासाठीं घेण्याचेंहि तिनें ठरविलें. शिवाय मालाची जावक व वाढती लोकप्रियता पाहून लालाजींच्या कर्तबगारीबद्दल तिनें धन्योद्गारहि काढले. लालाजींचें नांव निघतांच सुनीत म्हणाला, ' ही कारखाना पहाणार कीं कारखान्याची मालकीण होणार, असं तुझ्या-बद्दल लालाजी मला विचारीत होते. '

मालकीण या शब्दांतील अपेक्षित अर्थ कोणता घ्यावा याचा प्रेमाला उलगडा होईना. कारण कारखाना विकत घेण्याचें तिच्यांत सामर्थ्य होतें आणि दुसऱ्या अर्थानें मालकाची पत्नी होण्याची आपली तयारी आहे कीं नाहीं याचा तिला विचार करावयाचा होता. ' मघांच्या सम-संवेदना तत्त्वानें सुनीतच्या अन्तःकरणांत आपणाला जागा आहे. ' असें तिला वाटलें. तेव्हां सुनीतलाच याचा अर्थ विचारला तर?

लागलीच तिनें आपला अन्तर्गत विचार बोलून दाखविला. तिनें त्याला विचारलें, ' मालकीण हा शब्द सापेक्ष आहे. तेव्हां मी काय समजूं?"

' लालाजींच्या विचारण्यांत सापेक्षता असेल; पण माझ्या विचारण्यांत एकच अर्थ आहे आणि तो म्हणजे पैसा. आज पन्नास साठ हजार रुपये घालून या कारखान्याची मालकी तुला पाहिजे काय?'

' तसं असेल तर पुनीतचा विचार घ्यावा लागेल.'

' मग पुनीतला मीहि विचारणार आहे; पण तसं नसेल तर?'

सुनीतच्या या प्रश्नाचें उत्तर प्रेमाला देतां येईना. ती कॉंक्रीटच्या एका कठड्याला धरून अधोमुख झाली. मनांत असूनहि उच्चारतां न येण्यासारखे कांहीं शब्द असतात. कानाला ते शब्द ऐकण्याची उत्सुकता

असून स्वतःच्या तोंडून ऐकण्याचा संकोच वाटतो. दुसऱ्याच्या तोंडूनच ते मधुर वाटतात.

सुनीत वेडा नव्हता. त्या तिच्या मुग्धतेचा अर्थ त्याला कळत होता. जेवतांना मध्येंच दचकून ती कां उठली, हें त्याला कळून चुकलें होतें; पण इतक्या स्वस्ताईनें तो सौदा ठरविण्याचें त्याच्या मनांत नव्हतें. सोन पसंत असलें तरी त्याचा कस लावून किंमत ठरविल्यावांचून तें घेववत नाहीं; घेण्याची पद्धतच नाहीं.

शेवटीं तो विषय तितकाच ठेवून त्यानें विचारलें, 'मीना तुला काय सांगत होती? तिनें विचारलेल्या गोष्टींचा तूं खुलासा काय केलास?'

'मी कांहींच बोललें नाहीं. आधीं मला तिच्याशीं धड बोलतांच येईना; पण तिनं मात्र लालाजीसारखंच 'घाई करूं नको. पस्तावशील. सुनीतबाबूजींना विचार.' असं बरंचसं कांहीं सांगितलं. मी यांत काय समजूं? विनीत तिच्या ओळखीचा आहे?'

'असं वाटतं खरं. तिला त्याची माहिती असावी; पण हेमाला या-संबंधानें तूं काय सांगणार?'

'तिला सांगण्याचं कारण?'

'तिनंच तर तुझ्या लग्नाचा पुढाकार घेतला आहे! आणि तिच्या सुखासाठीं तूं स्वतः बळी द्यायलाहि तयार आहेस!'

'कशावरून?'

'मगनलाल सराफाला तूं विसरलीस वाटतं! तिच्यासाठींच तूं तें साहस केलंस ना? आतांहि तिच्या म्हणण्याप्रमाणं तूं वागणारच. कारण तीच तुझ्या जीवनाचा आदर्श आहे.'

'पण आतां मला माझी चूक कळूं लागली. आणि तसं म्हटलं तर विलक्षण योगायोगानंच या गोष्टी घडून आल्या असं नाहीं का ठरत? कार्य होऊन गेल्यावर कारणाकडे मनुष्याचं लक्ष वेधतं! हा मुळीं रिवाजच आहे.'

'लॅबोरेटरींत उभी आहेस वाटतं तूं?'

'कांहीं तरीच! यांत कांहीं तरी हेतु आहे असं नाहीं तुम्हांला वाटत?'

‘ मला काय वाटतं तें मी आतांच कशाला सांगू ! ’

‘ मी जेवीत असतांना तुम्हीं माझ्या मनांतलं कसं जाणलं ? प्रयत्न केला तर मला तसं जाणतां येईल ! ’

‘ मग आजवर तसा प्रयत्न तूं कां नाहीं केलास ? ’

‘ ती माझी चूक झाली म्हणतें ना ! बरं हा वाद नको. ती मिनार कोण ? ’

‘ तेंहि एक रहस्यच आहे. पण तूं म्हणतेस त्याप्रमाणं विलक्षण योगायोगानं त्याचाहि तुला उलगडा होईल. स्वतःच्या हितानहिताचा तुझा तूंच विचार करायला शीक. दुसऱ्याच्या आधीन होऊन नसलेलीं उच्च तत्त्वं स्वतःच्या अंगीं आणण्याचा प्रयत्न करूं नको. हालाहल विष एकट्या शंकरानंच घेतलं, अशी कथा आहे ना ? लोककल्याणाचं वीरकंकण हातांत बांधणारीं माणसं हालाहल विष पचविणारीं असावीं लागतात. नाहीं तर तडफडून मृत्यु यायचा ! आत्महत्या म्हणतात तसल्या कृतीला ! तें जाऊं द्या. कारखाना तुला आवडला ना ? ’

‘ आजवर ही कल्पना कुणाला कशी सुचली नाहीं याचंच आश्चर्य वाटतं.’

‘ आश्चर्य कसचं ! उपयुक्त धंद्यापेक्षां अनुपयुक्त धंद्यांतच कित्येकांना गोडी वाटते. हा कारखाना आतां वाढवावयाचा आहे, म्हणून प्रथम मी माझी रक्कम काढून घेऊन गहाण पडलेली इस्टेट सोडविणार. आतां मला माझं म्हणून कांहीं असावं असं वाटूं लागलं आहे.’

‘ कारण ? ’ प्रेमानें सुनीतच्या तोंडाकडे पहात प्रश्न केला.

‘ कारण मलाही कळलेलं नाहीं. मला कळलं कीं, तुला मी अवश्य कळवीन. लालाजींच्या पत्राकडे आतां माझे डोळे लागून राहिले आहेत.

‘ दुकानांत जायचं ना ? ’ प्रेमानें अस्तास जाणाऱ्या सूर्याकडे पाहून सुनीतला विचारलें.

‘ हो, दुकानापर्यंत मी येतों, पण मला पुनः इकडे यावं लागेल. कारण आतां दुकानापेक्षां कारखान्यांतच मला जास्त वेळ राहावं लागणार.’

‘ जेवणखाण इथंच.’

" स्वयंपाक्याला तिथं काय आणि इथं काय दोहोंकडेही सारखंच. तें रोजचंच आहे.'

' एकादां आचारी कां नाहीं ठेवीत ? '

' तसे दिवस मला अजून आले नाहींत. मी माझी पैन् पै या कारखान्यांत घालीत आहे.'

' मग एकप्रकारें हालच म्हणायचे हे ! '

' आणि त्यासाठींच मघां जेवतांना तुझ्या डोळ्यांत पाणी आलं ना ! अग दुसऱ्याच्या मनांतलं जाणायला आपलेपणाला विसरावं लागतं. रासायनिक प्रयोगांतील जीवनतत्त्वं काय सांगतात. एक जीव कसा होतो ! '

प्रेमा यावर कांहीं न बोलतां आपल्या मोटारीकडे गेली. सुनीतहि तिच्या मागून निघाला; पण तो येत आहे असें पाहून तिनें म्हटलें, इतक्या लांब परत यायचं तर आतां कशाला येतां ? मी जाईन.'

' हो, तेंहि खरंच.

' बरं तर मी जातें. असें म्हणून प्रेमानें मोटारीचें दार लावून घेतलें. ड्रायव्हरनें मोटार चालू केली. मोटार दिसेनाशी होईपर्यंत सुनीत तिथेंच उभा राहून पहात होता. प्रेमाहि मागें वळून कांचेंतून त्याच्याकडे पहात होती. मध्यें डोंगर आड आला. तेव्हां तिनें आपले डोळे पुसले आणि समोर नजर वळाविली.

त्याच्या एकटेपणाबद्दल तिला आज प्रथमच वाईट वाटलें. आज घरीं गेल्यावर आईला सांगून सुनीतला जेवायलाच बोलवावं, त्यांच्या कारखान्याची हकीगत सांगावी, वगैरे अनेक गोष्टी तिच्या मनांत आल्या आणि त्यामुळें समाधानहि वाटलें. ' मीनेचं रहस्य समजेल तर तिलाही मी मदत करीन. किती सालस प्रेमळ आणि गोड जीव आहे तो ! मला तिची भाषा येत असती तर पुष्कळ पुष्कळ बोलल असतें. तिच्याकडे पाहून लालाजींना किती दुःख वाटत असेल ! ना कुमारी, ना विधवा ना मूल, ना मनाला विरंगुळा ! कसे तिनं दिवस घालवावे ? तिला टाळणारा तिचा नवरा माणूस तरी असेल का ? छे पुरुषांना स्त्रियांच्या अन्तःकरणाची किंमतच करतां येत नाहीं. त्यांना ती एक बाजारची निर्जीव

वस्तु वाटते. लहान मुलं बाहुलीचा खेळ करतात तशांतली गत; निर्जीव खेळणं आणि स्त्रिया सारख्याच. त्यांना भावना, आकांक्षा विकार, वासना वगैरे कांहीं आहे अशी मुळीं यांची समजूतच नाहीं; तसं असतं तर मीनेला परित्यक्ता म्हणून असा वनवास कां स्वीकारावा लागला असता! या महत्त्वाच्या गोष्टीकडे समाजाचं लक्षच जात नाहीं. उलट स्त्रियांनाच नांवें ठेवण्याकडे, त्यांच्या बाबतींत नसते दोष निर्माण करण्याकडेच यांचें लक्ष. स्वतः एकस्याच्या सुखाकडेच पुरुषाचं लक्ष गुंतलेलं; आणि स्त्रियाहि या बाबतींत मुग्धच!

.... आणि सुनीत तरी मनाचा कोट करून बसलेले! कांहीं थांगपत्ताच लागूं देत नाहींत. मी तरी काय समजूं आणि माझं अंतःकरण तरी उघड कसं करून दाखवूं! 'मालकीण' या शब्दाचा अर्थ करतांना त्यांनीं किती लपंडाव लढविले! खुलाशाची ती वेळ होती. अगदीं माझ्या ओंठावर शब्द आले होते; पण बोलवेनाच. तेहि स्वाभिमानी खरे. त्यांनीं तो प्रश्न जाणून बुजूनच टाळला. माझ्या मदतीनं मालकी मिळविणं त्यांनाहि अपमानास्पद. हेमाच उद्यां नांवं ठेवील. खरंच, तें नकोच तसं. आणि पुनीतचेहि पैसे त्यांनीं घेऊं नयेत. उद्यां हेमाला तेवढाच टेंभा मिरवायाला फावेल—

मोटार तिच्या पोर्चमध्यें येऊन थांबल्यामुळें तिला आपल्या विचारांना आवर घालावा लागला. वेळ सायंकाळची होती. सूर्य नुकताच अस्ताला गेला होता. बागेंत उमललेल्या फुलांचा वास सर्वत्र दरवळत होता आणि एक प्रकारचें प्रसन्न वातावरण निर्माण झालें होतें. प्रेमा मोटारींतून उतरली ती थेट आपल्या आईकडे गेली. ती तिची वाटच पहात असावी. कारण प्रेमाला पाहातांच तिनें म्हटलें, 'पुनीत आतांच येऊन गेला. तूं कारखाना पहायला गेल्याचं मी सांगितलं, तेव्हां तो थोड्या वेळानं येतों असें म्हणाला.'

आईचा हा निरोप ऐकून प्रेमाला थोडी भीति वाटली, पण सुनीतचें सांनिध्य आपणाला आहे असें वाटून तिला धीर आला. तिनें म्हटलें, 'तूं त्यांना बसवून कां नाहीं घेतलंस?—'

'बसायचं कशाला, मी हा आतां आलोंच ना?' असें म्हणत खुद्द पुनीतच तेथें आला. अर्थात् प्रेमा जास्त कांहीं न बोलतां आपल्या खोलीकडे वळली. खोलींत नुकताच दिवा लावण्यांत आला होता. पुनीतही तिच्या मागोमाग आंत आला आणि म्हणाला, 'ही काय नवीन भानगड आहे, प्रेमाताई? तूं सुनीतबरोबर कारखाना पहायला कशी गेलीस? लोकवार्ता फार वाईट असतात बरं!'

'ऐकणारे भेटले कीं लोकवार्ता निर्माण होतात.'

'पण विनीत त्यामुळं खवळून जातो ना! आज आमच्या इथं तुझ्यासंबंधानं केवढं वादळ निर्माण झालं! तुझं लग्न व्हायचं आहे हें तूं विसरली नाहींस ना?'

'उतावळ्या मनाच्या हट्टी हेमानं माझ्या लग्नाचीं हीं वाजंत्रीं वाजवायला सुरवात केली आहे. मला लग्न करायचं असलं तरी अस घाईनं आणि ती ठरवील त्याच्याशींच, असं कांहीं नाहीं! खुळी, वेडी आणि कोणीहि सहज फसवील अशी मी आहे का?'

'मी तसं म्हणत नाहीं. तुझं शहाणपण दुसऱ्या कोणाला येणार आहे? पण लग्न करायचं म्हणजे—'

'समजलं. तुम्हांला विचारल्याशिवाय मी कांहीं करणार नाहीं. मात्र त्या बाबतींत माझी आधीं खात्री करून घेईन. वरपरीक्षेच्या बाबतींत मी स्वावलंबनीच राहीन.'

'विनीतबद्दल तुझं काय मत आहे?'

'तुम्हांला त्याच्याबद्दल काय माहिती आहे?'

'तो चांगला विद्वान्, श्रीमंत आणि तरुण बॅरिस्टर आहे इतकीच. आतां नात्यानं माझा आतेभाऊ आहे ही गोष्ट वेगळी. त्याची आई लहानपणींच वारल्यामुळं आणि तो आपल्या वडिलांबरोबर लाहोरला गेल्यामुळं गेल्या वीसबावीस वर्षांत त्याची माझी भेटहि झालेली नाहीं.'

'मग त्या वीस बावीस वर्षांतील त्याचा इतिहास कळायला नको का? कीं हेमाला बरं वाटावं म्हणून मी ती सांगते तसं करूं? आणि त्या दोघांची इतकी घाई तरी कां?'

'खरं आहे तुझं म्हणणं. मला वाटतं तूं सुनीतच्या संगतींत बिघडशील अशी तिला भीति वाटत असावी.'

'मग सुनीतबद्दल तुम्हांलाहि तसंच वाटतं का?'

'नाहीं. शिवाय त्याच्यावर आलेला हा आरोपहि खोटा ठरूं पहात आहे! आतां तो अकिंचन असल्यामुळं तूं एकाद्या वेळीं त्याला पैसा देशील—'

'नाहीं. माझा पैसा घेण्याची त्यांची इच्छा नाहीं. शिवाय पैशाच्या बाबतींत तुम्हांला विचारल्यावांचून मी कांहींच करूं शकत नाहीं, हें सांगायला नकोच.'

प्रेमानें दिलेल्या या स्पष्ट उत्तरामुळें पुनीतची खात्री झाली आणि हेमानें घेतलेल्या भलत्याच संशयाबद्दल मनांतल्या मनांत त्यानें तिला दोषहि दिला. नंतर तो म्हणाला, 'तुझ्या बुद्धिमत्तेबद्दल माझी खात्री होतीच; पण तिनं नाइलाज केल्यामुळं मी आलों.'

'तें चांगलं झालं. मलाहि स्पष्ट बोलतां आलं–'

याच वेळीं चहा घेण्यासाठीं आईनें आंतून हाक मारल्यामुळें ती उठली आणि 'चहा इथं आणूं कीं आंतच–

'नको. मीच येतों. सुनीत काय म्हणत होता?' पुनीतनें जातां जातां विचारलें.

'ते तुम्हांला कारखान्यांत बोलविणार आहेत. त्यांनीं कांहीं तरी नवीन योजना आंखलेली दिसते. केसच्या निकालासाठीं ते थांबून आहेत.'

'त्याला भेटलं पाहिजे एकदां.' असें पुनीतनें म्हटलें आणि तो चहा घेऊं लागला.

---

# : २२ :

## : लपंडाव

दुसऱ्या दिवशीं हेमानें या गोष्टीचा विपर्यास केला. पुनीतच्या भेटीचा काय परिणाम झाला हें जाणण्याची उत्सुकता विनीतला होतीच. तो येतांच हेमानें सांगितलें, ' भोळ्या स्वभावाचीं माणसं लवकर फसतात भाऊजी ! प्रेमाला त्यांनीं सांगितल्यावर ती म्हणाली कीं, ' लग्नाच्या बाबतींत मी स्वावलंबी राहीन. त्यासंबंधानें मला कुणी आग्रह करूं नये ' आणि यांनीं तें ऐकलं ! '

' तुम्हींच मला नसती आशा दाखविली. लोकांतहि या गोष्टीची प्रसिद्धि झाली. आतां एक तर मी तिला नापसंत आहें असं ठरलं पाहिजे किंवा ती मला पसंत नाहीं असं मी सांगितलं पाहिजे. दोन्ही गोष्टी अवघड वाटतात. माझं एक सोडून द्या. पण तिला मी नापसंत केली असं सर्वांना कळलं तर कारणाची मीमांसा साहजिक होणार आणि त्यांत सुनीतचं नांव पुढं आणणं मला भाग आहे ! ' विनीतनें आपलें कायदेपांडित्य प्रदर्शित करून हेमाला एक प्रकारच्या पेंचांतच पकडलें. कारण पुनीतपेक्षां हेमा-नेंच या बाबतींत पुढाकार घ्यावा असें विनीतला वाटत होतें.

' तुम्हीं म्हणतां हें कांहीं खोटं नव्हे भाऊजी ! ' असें म्हणून हेमा थोडा वेळ थांबली आणि नंतर कसली तरी आठवण होऊन तिनें म्हटलें, ' मला वाटतं सुनीतबद्दल प्रेमाच्या मनांत तिरस्कार उत्पन्न केला तर ती माझं म्हणणं ऐकेल. त्यानं तिला भलभलत्या गोष्टी सांगून तिचा पैसा मिळविण्याचं कारस्थान चालविलं असावं. काल तो तिला कारखान्यांत घेऊन गेला होता. '

' पण हा तर एक कंगाल नोकर आहे ! याचा पगार तो कितीसा असणार ? आणि कारखान्याशीं याचा काय संबंध ? '

' तें कांहीं मला चांगलंस कळलं नाहीं; पण दुपारपासून तीं दोघें एकत्र होतीं ही गोष्ट खरी. मग कारखाना दाखविण्याचं निमित्त होतं कीं

काय न कळे. भाऊजी तुम्हीं कांहीं करा; पण प्रेमाला या बिकट प्रसंगांतून सोडविलीच पाहिजे. '

' मग पुनीतलाच सांगा ना ! '

' अं हंः, ते भोळे सांब आहेत. त्यांचं सगळं चातुर्य त्या लॅबोरेटरींत चालतं. शिवाय प्रेमा जें कांहीं सांगते तें त्यांना खरं वाटतं. तेव्हां आधीं प्रेमाचेच चांगले डोळे उघडले पाहिजेत. ती शहाणी आणखी असं सांगते कीं, ' विनीत पंजाबाकडे पुष्कळ वर्षे होते. तेव्हां त्यांची तिकडील सगळी हकीगत मला कळली पाहिजे. ' काय म्हणायचं आतां हिला ? माझ्यापेक्षां ती शिकलेली. त्यांत वडील, आणि हे तिची प्रशंसा करणारे ! ती म्हणे बुद्धिमान आहे. आणि ही असली तिची बुद्धि ! तेव्हां मला वाटतं कंगाल, फसवेगिरी करणारा, दगलबाज मुनीत तिच्या नजरेसमोरून दूर करावा. तो उच्छृंखल, स्वैराचारी आहे, त्यानं गुप्तपणानं लग्न केलं आहे, आपल्या बायकोला रडत कुंथत ठेवून दुसरीला फसवीत आहे, हें तिला दाखवून द्यावं म्हणजे आपोआपच अगतिक होऊन—हें काय भाऊजी, तुमचं माझ्या बोलण्याकडे लक्षच नाहीं. असे खिन्न चेहऱ्यानं तिकडे काय पहातां ? '

यावेळीं खरोखरच विनीतचा चेहरा म्लान झाला होता. स्वतःलाच माहीत असलेलें आपलें रहस्य एकाद्यानें एकदम सांगितलें म्हणजे तो मनुष्य जसा हतबल होऊन केविलवाण्या चेहऱ्यानें आकाशाकडे अगर दूरवर दिसणाऱ्या क्षितिजाकडे पहातो, तशीच यावेळीं विनीतची स्थिति झाली होती. मीनेची केविलवाणी मूर्ति, मिनारच्या बापाचा क्रुद्ध चेहरा आणि वडिलांची अंतकाळची तळमळ तर त्याला दिसत नसावीना ! हेमानें सुनीतवर लादलेले सगळे आरोप त्यालाच लागू होत होते. खुद्द एका साळसूद दिसणाऱ्या सैतानालाच स्वतःचें तिरस्कृत चरित्र ऐकण्याचा प्रसंग आला होता तर विनीतला त्याच्या जागीं आपलीच मूर्ति उभी केलेली दिसत होती. कसला विलक्षण प्रसंग तो !

हेमाला विनीतच्या या मनस्थितीची कल्पना न होऊन ती म्हणाली, ' असं काय भाऊजी ! बोलत कां नाहीं ! पुरुषासारखे पुरुष, त्यांत विद्वान

कायदेपंडित आणि या शहरांत मान्यमान्यतेला चढलेले असे तुम्ही असतां, सुनीतसारख्या एका उच्छृंखल माणसाला तो तसा आहे हें दाखविण्याला भितां? मग त्या दिवशीं तुम्हीं प्रेमाला भित्री आणि दुबळी म्हटलीत ती उगीचच तर!'

'वहिनी, तुम्ही म्हणतां त्या गोष्टी खऱ्या आहेत आणि तितका प्रयत्न केला तर सुनीत कसा आहे हें मी दाखवूनहि देईन; पण मला काय माझीं इतर कामें थोडीं आहेत?' विनीत कांहींसा भानावर येऊन म्हणाला. कारण ही चर्चा जितक्या लवकर आटोपेल तितकी बरी असें त्याला वाटत होतें. मीना, मिनार आणि हेमा यांपेक्षां प्रेमाचा चतुरपणा आणि बुद्धिमत्ता वेगळया प्रकारची आहे असें त्याला आतां वाटूं लागलें. ती भावनाप्रधान आणि अत्यंत हळव्या मनाची आहे या दोनच गोष्टी विचारांत घेऊन तिच्या सौंदर्यानें तो वेडा झाला होता. हेमाला व भोळया पुनीतला हातीं धरून प्रेमाशीं एकदां लग्न उरकून घेतलें म्हणजे मग इतर आपल्या भानगडी पुढें आल्या तरी त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं. हिंदु कायदा, पत्नीचे सर्व अधिकार पतीला देत असल्यामुळें तो तिची मन मानेल तशी वासलात लावूं शकतो हें त्याला माहीत होतें. शिवाय प्रेमामुळें हातीं येणारा मुबलक पैसा त्याला विलोभनीय वाटत होता. पैशानें सर्वांचीं तोंडें बंद करता येतात, मोठेपणा मिळवितां येतो, सच्चरित बनतां येतें, उदारधी म्हणून कीर्ति मिळविता येते आणि चरित्र प्रसिद्ध करून आदर्श पुरुषाचा मान मिळवितां येतो हें आधुनिक व्यवहारांनीच त्याला अपरिचित नव्हतें; पण मुळांत प्रेमानेंच ज्या ठिकाणीं वरपरीक्षेचे सर्व रीतरिवाज बाजूला ठेवून आणि पदवी लक्षांत न घेतां पूर्वचरित्राचा दाखला मागितला, तेव्हां त्याची सगळी अक्कलहुषारी आकाशांत विरल होत चालल्याचें त्याला दिसूं लागलें. आणि भरदिवसा नक्षत्रें मोजण्याचा प्रसंग आला.

पण हेमाला हें कसें कळणार? त्याची ती उदासीनता पाहून ती म्हणाली, 'आतां कामाची सबब सांगतां होय भाऊजी? दोन तीन दिवस प्रेमावर पाळत ठेवतांना तुमचीं कामं नाहीं आड आलीं तीं?'

'तें एकच काम त्यावेळीं माझ्या नजरेसमोर होतं वहिनी! शिवाय ही तुमची प्रेमा मला जगावेगळीच मुलगी दिसते! अविवाहित, प्रौढ, पदवीधर आणि घरंदाज अशी असतां तुरुंगांत पाऊल ठेवून असलेल्या एका बदफैली तरुणाबरोबर पाहिजे तिथ फिरते आणि त्याला घरीं आणून दोन दोन तास एकांतांत त्याच्याशीं बोलत बसते याचा अर्थ काय? आणि आश्चर्य हें कीं स्वतः अशी असतांना माझी चौकशी करण्याची अट घालते! पुनीतला तें योग्य वाटतं आणि तुम्हींहि माझ्याकडे तेंच बोलतां? या शहरांतील एक प्रख्यात बॅरिस्टर म्हणून लोक मला ओळखतात हें तुम्हां दोघांच्याही लक्षांत येत नाहीं! याचं कारण एकच. मी तुमच्या नात्यांतील असल्यामुळं अगदीं आपलेपणानं तुमच्याशीं वागतों; खरं ना?' विनीत अगदीं एकेरीवर येऊन बोलत होता. आकस्मिक उद्भवलेल्या या पेंचप्रसंगांतून निसटून जाण्याची त्याला दुसरी युक्तीच सुचेना. आणि कांहीं तरी अकांडतांडव करून मूळ मुद्यावरचें लक्ष उडवून टाकण्याचा वावदूक लोकाचा हा एक प्रघातच आहे. मानवी स्वभावाचें हें रहस्य ज्यांना कळत नाहीं ते असल्या त्राग्याला सहज फसतात.

आणि हेमा तशी फसलीहि. तिनें विनवणीच्या स्वरानें विनीतला म्हटलें, 'भाऊजी, मी कधीं तसं म्हटलं बरं? प्रेमाच्या बाबतींत तुम्हीं जास्त लक्ष घालावं याच उद्देशानं तिचं म्हणणं मी तुम्हांला सांगितलं! त्याचा तुम्हीं असा भलताच अर्थ करूं नका. तुमची योग्यता काय मला कळत नाहीं? असलं दुर्मिळ स्थळ प्रेमाला मिळायला तिला सात जन्म तपश्चर्या करावी लागेल!'

आपण केलेला लपंडाव पूर्णपणें साधला. आपल्यासंबंधानें हेमाचें मन स्वच्छ झालें. असें समाधान मानून विनीत म्हणाला, 'पण तिला कुठं तसं वाटतंय! शिवाय पुनीत द्याव तितक या गोष्टीकडे लक्ष देत नाहीं. कारण प्रेमानं ज्यावेळीं त्याला तसा प्रश्न विचारला त्याचवेळीं त्यानं असं उत्तर दिलं पाहिजे होतं.'

'त्यांना तितका पोंच नाहीं. प्रेमा बुद्धिमान् आहे अशी त्यांनीं आपली उगाचच समजूत करून घेतली असल्यामुळं ती सांगते तें त्यांना खरंच

वाटतं. आतां मलाच या कामांत पुढं झालं पाहिजे. संसार सजविण्याचं काम कधीं पुरुषांकडून होत नसतं. भाऊजी, तुम्हीं मात्र स्वस्थ बसूं नका. सुनीतच्या संबंधानं—'

'त्याची इतकी काळजी नको. मगनलालची भेट घेतली कीं तो त्याचं लग्नाचं रहस्य तेव्हांच सांगेल. मी एक दोन दिवसांत तेवढं काम करतों.'

असें म्हणून विनीत उठला, आणि एका अवघड प्रसंगांतून निभावलों अशा आविर्भावानें त्यानें सुस्कारा सोडला. मनानें मात्र तो स्वकर्माच्या जाळ्यांत गुंतत चालला होता. स्वतःचे सगळे खेळ त्याला डोळ्यांसमोर दिसूं लागले होते. 'प्रेमा जर तितकीच हट्टाला पेटली तर आपणाला नामानिराळें होऊन भागणार नाहीं. पुनीतहि तिचें म्हणणेंच खरें धरून बसेल आणि आपलें पूर्वचरित्र उघड होईल.' अशी त्याची खात्री होती. 'सहज कार्यभाग होईल म्हणून उगाच आपण या मधाच्या पोळ्याला हात घातला.' असें त्याला वाटूं लागलें. तळमजल्याच्या लॅबोरेटरींत पुनीत काम करीत होता; पण त्याची भेटहि न घेतां हेमाचा निरोप घेऊन तो निघून गेला.

हेमा मात्र 'आतां आपल्या मनासारखं होणार' या आशेंत गुंतून राहिली आणि विनीतची कर्तबगारी पुनीतला सांगण्याच्या हेतूनें ती लॅबोरेटरीकडे वळली.

पण त्याच वेळीं पुनीतचा निरोप घेऊन धीर गंभीर मुद्रेचा सुनीत आपल्याच नादांत बंगल्याच्या पायऱ्या उतरून जात असलेला तिला दिसला आणि ती दचकली. आज तीनचार वर्षांनीं प्रथमच तिनें त्याला पाहिल्यामुळें व त्याच्या धीरोदात्त मुद्रेवर एक प्रकारची दार्ढ्यता आलेली तिच्या नजरेला आल्यामुळें सगळे पूर्वप्रसंग आठवून ती घाबरलीच. तिचें पुढें पडणारें पाऊल मागेंच आलें. विनीतशीं बोलतांनाचा तिचा आविर्भाव जागच्या जागींच थिजल्यासारखा झाला.

तितक्यांत पुनीतहि बाहेर आला आणि तिच्याकडे पाहून हंसत हंसत म्हणाला, 'चला. मी एकदां जामिनकींतून मुक्त झालों. पुराव्याच्या अभावामुळें सुनीतवरची केस काढून टाकण्यांत आली. आतां तो मोकळा

झाला. आणि तेंच सांगण्यासाठीं तो आत्तां आला होता; पण तुझी मुद्रा अशी कां? आणि तिकडे काय पहातेस? तूं त्याला ओळखलं नाहींस वाटतं. आणि तोही तुझ्याशीं कांहीं बोलला नसेल!! अलीकडे तो बराच एककल्ली आणि गंभीर झाला आहे—'

पुनीत आपल्याच नादांत एकसारखा बोलत होता. आपला जिवाभावाचा मित्र एका निंद्य आरोपांतून मुक्त झाल्याबद्दल त्याला आनंद झाला होता; पण हेमाला काय वाटत होतें, हें तिचें तिलाच कळत नसल्यामुळें ती दिङ्मूढ होऊन गेली होती. तरी पण आपल्या कल्पनेप्रमाणें सुनीतच्या; या भेटींत तसा कांहीं मनाला लावून घेण्यासारखा प्रकार घडला नाहीं, एवढें जाणून तिनें एक निःश्वास सोडला आणि 'बरं झालं एकदाचं आपले पांच हजार रुपये वांचले.' असे कसेबसे शब्द उच्चारून ती मागें वळली. त्या गडबडींत विनीतबद्दल जें कांहीं ती त्याला सांगणार होती त्याचाही तिला विसर पडला.

---

## : २३ : : भूत भविष्याचें भेसूर चित्र !

आपल्या पांडित्यानें आणि वक्तृत्वानें हेमाचें समाधान करून विनीत आपल्या बंगल्यावर आला; पण त्याच्या मनाला कांहीं स्वस्थता वाटेना.

हेमाच्या तोंडून सुनीतबद्दल म्हणून जे उद्गार निघाले ते शब्दान् शब्द आपल्यालाच जास्त लागूं पडतात, असें त्याचें मन त्याला सांगूं लागलें. जणुं काय हृदयांतील बोलच प्रतिध्वनित होऊन ऐकूं आले असा त्याला भास झाला. लोकांना कितीहि फसविलें तरी मनुष्य हा आपल्या मनाला केव्हांच फसवूं शकत नाहीं याचें तें एक प्रत्यंतरच होतें. पाप-पुण्य, सद्‌गुणदुर्गुण, देवदानव, बरेंवाईट हीं सर्व द्वंद्वें मनानेंच निर्माण केलेलीं असतात, मनानेंच त्याची निश्चिति होत असते आणि अखेरचा निकालहि मनच देत असतें. त्या ठिकाणीं शब्दावडंबर आणि तात्त्विक सिद्धान्ताचे आधार व्यर्थ आहेत.

आज विनीतच्या अन्तःकरणाला चांगलाच धक्का बसला. प्रेमाच्या आशेनें हेमाला इरेला घालून विजय मिळविण्याचा अट्टाहास केला तर कदाचित् मातींत मिळून जाण्याचाही प्रसंग येईल, अशी त्याला भीति वाटली. मीनेला नवरेपणाच्या अरेरावीनें गप्प बसवितां आलें, वेड्या कोंकराप्रमाणें बंधनापलीकडे स्वच्छंदानें वागडणाऱ्या मिनारला लांडग्याच्या झेंपेनें दूर विलायतेपर्यंत नेतां आलें, कांहीं स्वैर विचारी कुमारिकांना पैसा, पदवी आणि अवास्तव गप्पा यावर झुलवितां आलें; पण प्रेमा तशी नाहीं. ती भावनाप्रधान आणि हळव्या मनाची असली तरी विचारी आणि पुनीत म्हणतो त्याप्रमाणें बुद्धिमान दिसते.

कदाचित् सुनीतला तर माझ्या पूर्वचरित्राचा कांहीं सुगावा लागला नसेल ना ? तसें असेल तर घातच झाला म्हणायचा ! या शहरांत राहायलाच नको. या बाबतींत पुनीतचा सल्ला घेणें व्यर्थ ठरेल. आणि हेमा तर क्षणभरही मला स्वस्थ बसूं देणार नाहीं.

चरित्रहीन मनुष्य इतका अगतिक होऊं शकतो ? तर मग हा समाज प्रथमच एकाद्या मनुष्याकडे डोळे उघडे ठेवून कां पहात नाहीं ? त्याच्या दिखाऊ प्रख्यातीवर कां भुलतो ? पाश्चात्यांचें हें अनुकरण असावें. कारण तेथें नांव, गांव, आईबाप, नातींगोतीं, संबंध वगैरे कांहीं कशाचीच जरूरी लागत नाहीं. तसें कुणाला कोणी विचारणें अपमानकारक मानलें जातें. त्याची जी प्रसिद्धि असेल तोच त्याचा परिचय. यापेक्षां जास्त चौकशी करणें रूढिबाह्य मानण्यांत येतें. निदान माझा तरी तसा अनुभव आहे. हिंदुस्थानांतहि अलीकडे प्रख्याति, वैशिष्ट्य, आणि पैसा एवढ्यांतच योग्यता ठरविली जाते. मलाहि येथें त्याचा परिचय आला.

पण आज मात्र नुसत्या आभासानेंच मी घाबरून गेलों ! लाला रामशरण रडून ओरडून मला हेंच सांगत होता. ‘ फुलपांखराचें आयुष्य दो घडींचें असतें. चमकणारा प्रकाश क्षणांत नाहींसा होतो. सुखाचा वाटणारा क्षण अल्पकालच टिकतो. निसर्गालाहि उन्हाळे पावसाळे पहावे लागतात. आल्हादकारक सकाळ आणि रमणीय वाटणारी सायंकाळ संधिकालापुरतीच मर्यादित असते. चकाकणारे तारे अमर असले तरी त्यांनाहि निष्प्रभ करणारा कोणी तरी असतोच. यासाठीं बाबूजी, नसत्या धुंदीनें माझ्या गरीब गाय पोरीला लाथाडूं नका. एकाहि जीवाचा तळतळाट तुमच्या सगळ्या आयुष्याची माती करायला पुरे आहे. फक्त कालावधि लागेल आणि माझी पोर झुरणीला लागून मरून जाईल...’

या त्याच्या बोलण्याचा उपहास करून मिनारशीं स्वैराचार करण्यांत मी गुंगून गेलों. मीनेची रडवी मुद्रा, तिनें आळआळवून माझी केलेली विनवणी आणि वडिलांनीं ‘ विकारांना विचारांनीं आवर घालावा. सुख हें देखत भुलीनें ठरवावयाचें नसतें. ’ असा केलेला उपदेश मला हास्यास्पद वाटला. हीं माणसें स्वार्थी आहेत असें मी ठरविलें आणि तसें ठरवीत असतांनाच स्वातंत्र्याच्या नांवाखालीं स्वतःच्या स्वार्थाला देव मानलें. सर्वस्वी माझ्यावर विश्वासून ज्या मीनेनें वडिलांच्या मनाविरुद्ध मलाच स्वार्पण केलें, प्रेमाच्या गोड नांवाखालीं जिच्या भावना उत्तेजित करून मी आपल्या मनाची करमणूक केली, तिलाच शेवटीं बदचालीची

ठरवून कोमेजलेल्या फुलाप्रमाणें बेपर्वाईनें फेंकून दिली.

मला त्यावेळीं समाजाची मुळींच भीति वाटली नाहीं. कारण समाजाशीं मला त्यावेळीं कांहींच कर्तव्य नव्हतें. वडिलांचा पैसा आणि माझें विद्यार्थी जीवन हेंच माझें जग. त्यांनीं मी करीन तें मानावें हाच माझा हक्क; पण आज समाजानें माझा तिरस्कार केला, त्यानें चरित्रहीन ठरविला तर त्याचा आज ना उद्यां माझ्या धंद्यावर परिणाम होईल आणि दोरी तुटून तरंगत जाणाऱ्या पतंगाप्रमाणें कुठच्या तरी घाणेरड्या डबक्यांत पडून हाय हाय म्हणत दिवस घालवावे लागतील, नाहीं तर उंच झाडावर अडकलेल्या त्याच्या विशोभित कलेवराप्रमाणें जीव टांगणीला लावून घटकापळें मोजावीं लागतील. त्यावेळीं मग लूत भरलेल्या कुत्र्याइतकीही लोक मला किंमत देणार नाहींत, कीं माझी कोणी कींव करणार नाहीं.

चटकचांदणीच्या तोलानें मिरवणाऱ्या मिनारनें मला वेडें केलें. मी तिला मन मानेल त्या गप्पा सांगितल्या आणि विलासांना चटावलेल्या तिच्या मनांत मी भलभलत्या स्वातंत्र्याच्या कल्पना भरवून देऊन, अपत्यवात्सल्याला वंचित करून, मातृत्व हें बंधन आहे असें सांगून, पितृभक्तीला भडाग्नि देऊन स्वैर वातावरणांत नेऊन सोडली. इच्छा आणि आकांक्षा निर्माण करणें सोपें असतें; पण त्यांची पूर्ति करण्यांत किती शक्तिक्षय होतो याची त्यावेळीं कल्पना होत नाहीं. आणि वास्तवतेचे चटके बसूं लागले, निर्माण केलेल्या इच्छा अपुऱ्या वाटूं लागल्या; स्वतःच उत्पन्न केलेली भुतें आपला जगड्व्याळ जबडा पसरून अंगावर धांवून येऊं लागलीं म्हणजे 'अरेरे आपण चूक केली' असें वाटतें. हें मनुष्यजीवन नव्हे अशी आपण दुसऱ्याची समजूत करूं लागतों.

पण विकारांचा आणि वासनांचा खवळलेला सागर असल्या शांतिमंत्रानें थोडाच शांत होणार? मिनारचें तसेंच झालें. ज्या विचारांचें बीजारोपण करून मी तिला घराबाहेर काढली त्याच बीजारोपणाचे वृक्ष बनून त्यांनीं तिला पार बदलून टाकली. तिनें मलाच दूर लोटलें. कारण ते विचारच विषारी होते. पाश्चात्य समाजरचनेच्या स्वतंत्र वातावरणांत

ते जास्तच फोंफावले आणि यांतून निघणाऱ्या वाफाऱ्यांची आग असह्य होऊन मला दूर जाणें भाग पडलें.

मीनेला मी घालविलें. मिनारनें मला घालविलें—कारण माणुसकीपासून पराङ्मुख होण्याचें शिक्षण मीच तिला दिलें होतें—आणि मिनारच्या वडिलांनीं इंग्लंडांतही माझा पिच्छा पुरवून मला सळो कीं पळो करून सोडलें. बरें, अशा वेळीं तरी मीनेचे अश्रु पुसून तिच्या वडिलांच्या शब्दाला मान देऊन सुखसमाधानाचा संसार थाटायचा! पण मी कायदेपंडित बनलेला! ती एक नवीनच धुंदी मला चढलेली! त्या कैफांत निशाबाजीची भर पडून स्वतंत्र धंद्याच्या मनोहर मनोरथांना बळी पडून त्या दोघांना तुच्छ मानलें आणि नव्यानवाईचा रंगेल संसार थाटण्यासाठीं राहत्या घराच्या आधारानें वडिलांच्या घरंदाजपणाच्या लोकसमजुतीवर विसंबून येथें आलों. वाडवडिलांची नामांकित पुण्याई कामाला आली, जमही चांगला बसला, मानमरातबही वाढला, पण—

हा विनीतचा पूर्वेतिहास त्याच्या धगधगणाऱ्या अन्तःकरणांत तडफडूं लागला. प्रेमाच्या एकाच प्रश्नानें त्याची बिनपायाची इमारत आंत पेट घेणाऱ्या ज्वालामुखीच्या धक्क्यांनीं हादरूं लागली. भूत-भविष्यकालाची भेसूर चित्रें त्याला भेडसावूं लागलीं. एका क्षणांत आपल्या उभारलेल्या मनोऱ्याच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडतील असें त्याला वाटूं लागलें आणि साहाय्यासाठीं त्यानें चौफेर पाहिलें.

तोंच नित्याप्रमाणें सायंकाळच्या वेळीं कागदपत्र घेऊन आलेला त्याचा कारकून समोर उभा असलेला त्याला दिसला. त्याच वेळीं तो आंत आला होता. पण विनीतला वाटलें, यापूर्वींच तो आला असावा आणि त्यानें आपले भडकलेले विचार ऐकले असावेत. अन्तःकरणांत तडफडणारे विचार तो बिचारा कसे ऐकणार? पण पस्तावलेल्या हृदयाचे बोल स्वतःच्याच कानाला कर्कशतेनें प्रतिध्वनित झालेले ऐकूं येत असतात, त्यामुळें विनीतला वाटलें आपण बेभानपणानें पूर्वचरित्राची बडबडच केली असावी. आणि तेवढ्याच एका सूत्राचा आधार घेऊन तो ओरडला, "इतका वेळ कशाला इथं उभं राहिला?"

‘ नाहीं. साहेब मी आतांच आलों.’ कारकून भीत भीत म्हणाला.

‘ बरं तर, ठेवा कागद आणि जा. नवीन काय आहे ?’

‘ आरोपी सुनीत याच्यावरची फिर्याद पुराव्याच्या अभावीं काढून टाकण्यांत आली.’

‘ पुराव्याच्या अभावीं ? म्हणजे ?’ हे प्रश्न विचारीत विनीत उठला आणि आपण काय करीत आहों याचें भान न राहून तो त्या कारकु-नाच्या आंगावर जवळ जवळ धांवून गेला.

‘ आज स्वारीला चांगलीच चढलेली दिसते तेव्हां आपण इथें उभें न राहाणेंच बरें ’ असें कारकुनानें ठरवून तो पळतच बाहेर निघून गेला.

त्या निर्मनुष्य खोलींत तसल्या त्या अविर्भावांत विनीतला कोणी एका ह्यानें पाहिलें असतें तर या कायदेपंडिताला उन्माद झाला असेंच त्यानें ठरविलें असतें.

---

## : २४ : : मित्रांची भेट

सुनीत एकटाच असल्यामुळें दुकान आणि कारखाना या दोहोंकडे लक्ष ठेवणें त्याला अशक्य झालें होतें; पण लालाजीचें पत्र येईपर्यंत त्याला ही अडचण सहन करणें भाग होतें. केसचा अनुकूल निकाल लागल्यामुळें आज त्याला शहरांत येणेंच भाग पडलें. अनेक दुरावलेल्या मित्रांनीं आज त्याचें अभिनन्दन केलें; पण त्यांत त्याला फारसें स्वारस्य वाटलें नाहीं. कारण ही जगराहाटीच अशी आहे. 'दिल्याघेतल्याचे आणि सुखाचे सांगाती ' पुष्कळ असतात; पण प्रसंगीं उपयोगी पडणारे फारच थोडे! प्रसंग आल्यावांचून ही पारख होत नाहीं. सुनीतला ही पारख झाली होती; म्हणून तो पुनीतलाच फक्त भेटला. कारण तोच त्याचा ' निदानीका दोस्त ' होता.

पुनीतच्या भेटींत त्यानें त्याला कारखान्यांत येण्याचें निमंत्रण दिलें आणि घाईघाईनें तो प्रेमाकडे गेला. तिला त्यानें ' आपल्या मुक्ततेचा संदेश ' दिला, सावित्रीबाईला नमस्कार करून तिचा आशीर्वाद घेतला आणि पुनः सवडीनें येईन असें सांगून दुकानांत थोडा वेळ बसल्यानंतर ठरल्याप्रमाणें पुनीत येतांच त्याच्यासह कारखान्याकडे आला.

कारखाना पाहून झाल्यावर दोघेही ऑफिसरूममध्यें आले. तेथें सुनीतच्या फोटोला हार घातलेला पाहून पुनीतनें तिकडे बोट करून सुनीतला विचारलें, "हें काय?"

सुनीत हंसून म्हणाला, ' कारखान्यांतील नोकर लोकांचा हा अत्याचार आहे. मी तो सहन केला इतकेंच. आज लालाजी इथं असते तर याहूनही निराळा प्रकार तुला पहावा लागला असता."

' अजूनहि मला स्पष्ट कल्पना आली नाहीं ! ' पुनीत साशंकतेनें म्हणाला.

तितक्यांत एका नोकरानें चहाचे दोन कप टेबलावर आणून ठेविले

आणि नमस्कार करून तो निघून गेला. तेव्हां सुनीतनें पुनीतला म्हटलें, ' हं. बैस. चहा घेतां घेतां मी तुला सर्व सांगतों. '

पुनीतनें बसून चहाचा कप उचलला. सुनीतनेंहि त्याचें अनुकरण केलें आणि सभोंवार पहात म्हटलें, ' लाहोरचे लाला रामशरण यांनीं चालविलेला हा कारखाना माझ्या मालकीचा आहे. आज याला तीन चार वर्षें होऊन गेलीं ! '

' म्हणतोस काय सुनीत ? ' पुनीतनें चकित होऊन विचारलें. तो हातांतील कपासह उठून उभाच राहिला. आपल्या जिवाभावाच्या मित्राचें हे रहस्य ऐकून त्याला अत्यानंद झाला. आश्चर्याचा पहिला आवेग ओसरल्यावर रिकामा कप खालीं ठेवून सुनीतला आपल्याकडे ओढीत पुनीत पुनः म्हणाला, ' मग इतके दिवस मला तूं अज्ञानांत कां बरं ठेविलंस ! '

' माझ्या वनवासांतील अज्ञातवासाचे ते शेवटचे दिवस होते आणि लोकदृष्टीनं मी त्याज्य ठरलों होतों. अखंड तळपणारे सूर्यचंद्र राहुकेतूंच्या क्षणिक ग्रासानं नामशेष होतांच सगळे लोक केवढा हलकल्लोळ करतात ! मग मी तर काय ! एक क्षुद्र मनुष्य ! परिस्थितीनें ग्रासल्यामुळं सर्वांनींच मला माणसांतून उठविलें ! मित्रांचीहि मति बदलली ! मी पार रसातळाला गेलों असं त्यांनाहि वाटलं, यांत आश्चर्य कसचं ? पण मित्रा, तूंच एकटा माझ्या साहाय्याला धांवून आलास. प्रेमाहि मला विसरली नाहीं. स्त्रियांना महाभारत करतां येतं आणि राज्यारोहणपर्वांत मंगलारती ओवाळण्याचं कार्यहि त्याच करतात ! तुमचीं दोघांचीं अन्तःकरणं किती थोर आहेत याची मला परीक्षा झाली—'

' पण हें आमचं पुराण संपीव एकदां. आणि कारखान्याबद्दल सांग.'

' त्या दागिन्याच्या आणि रकमेच्या घालमेलींतून कर्दमोद्भूत कमलाप्रमाणें हा कारखाना निर्माण झाला. नवऱ्यानं टाकलेल्या आपल्या मुलीचं ओझं डोकीवर घेऊन दुःखानं आणि वैतागानं भटकणारे लाला रामशरण मला भेटले. त्यांनीं सांगितलेली कल्पना मला ग्राह्य वाटली. आणि मी हताश झाल्यामुळें निराश झालेल्या माणसाच्या अन्तःकरणाची कल्पना

मला पटून हातीं असलेली सर्व रक्कम त्यांना देऊन आततायी माणसांच्या आवेगानं आत्महत्या करून मोकळं व्हावं म्हणून मी देशत्याग केला; पण खरं सांगतों, प्रेमानं तुझ्यासाठीं केलेला विलक्षण त्याग आणि अनासक्तपणानं व्यवहाराकडे पहाण्याची तुझी उदार वागणूक या दोन गोष्टी माझ्या नजरे-समोर येतांच ; माझ्या बाबतींत असलेला तुझा जिव्हाळा ध्यानांत घेऊन मी जगण्याचं ठरविलं आणि इथं आलों, तोंच दुर्दैवानें या प्रसंगांत सांपडलों आणखी कांहीं असेच गुंतागुंतीचे प्रसंग निर्माण झाले. त्यावेळीं मी कितीही अट्टाहासून माझी परिस्थिति कुणाला सांगितली असती तरी मी एक ढोंगी, फसव्या आणि कंगाल या सदरांतच गेलों असतों. अर्थात् तोंड मिटून बसणचें मला भाग होतें. आतां तें सर्व वादळ शांत झालं आहे. आतां माझ्या हातांतील गिलिटाची आंगठीहि जनतेच्या दृष्टीनें बावनकशी सोन्याची ठरेल— '

' तुझ्या या हकीगतींतील बरेच प्रसंग मला अज्ञात आहेत. तेव्हां त्यांचा खुलासा ऐकण्याची मला आवड नाहीं; पण प्रेमानं हा खुलासा केला असता तर— '

' तिला तरी काय माहीत होतं ? कालच तिला याची अस्पष्ट कल्पना आली. '

' तरच कालचं तिचं बोलणं थोडंसं दृढतेचं मला वाटलं. विनीत नांवाचा माझा एक आतेभाऊ इथं बॅरिस्टरी करतो. त्या दिवशीं माझ्या-बरोबर आलेला तूं पाहिलाच असशील. त्याच्याशीं प्रेमाचं लग्न करण्या-संबंधानं—'

' प्रेमाचा आग्रह तुला मोडवेना. आणि तूं तिच्या आग्रहाला संमति दिलीस. '

' होय. शिक्षण नाहीं, तर लग्न तरी व्हावं असं मला वाटलं ! पण तिनं विनीतच्या बाबतींत त्याच्या पूर्वचारित्र्याचा निराळाच मुद्दा उपस्थित केला, आणि मलाहि त्याची तितकी माहिती नसल्यामुळं मी गप्प बसलों.'

' तेंहि योग्य वेळीं कळेल; पण आतां आपण कारखान्याच्या बाब-तींतच बोलूं. हा कारखाना विकून मागील सर्व देणं भागवावं, घरवाडी,

शेतजमीन मोकळी करावी असं मी ठरविलं आहे. आणि ती सर्व भानगड मिटविण्याचं काम मी तुझ्यावर सोंपविणार आहें. पांच सहा वर्षांच्या मागचा श्रीमंत सुनीत तुला पहायचा आहे ना, तर मग हें एवढं तूं करच.'

'तेवढ्यासाठीं कारखाना विकण्याचं कारण नाहीं. उलट या कारखान्याची जी प्रख्याति माझ्या कानावर आली आहे, ती प्रशंसार्ह असल्यामुळं याची वाढ करण्याचीच तूं खटपट करावी असं मला वाटतं. कारण तुझी इतरांकडे असलेली सगळी ईस्टेट केवळ मित्राची वस्तु जपून ठेवावी म्हणून मी माझ्याच ताब्यांत घेतली आहे. मीच सगळा पैसा भरला. कांचनरावांनीं प्रेमाला दिलेली देणगी मी यांत घातली आणि वरचं उत्पन्न वजा केल्यास अगदीं थोडं देणं निघेल अशी माझी खात्री आहे. एक दोन वर्षांत तेंहि फिटून जाईल. तेव्हां तेवढ्यासाठीं हा कल्पतरू तोडून टाकण्याला मी केव्हांच तुला संमति देणार नाहीं.'

'बाकी तुझ्या संमतिशिवाय मी कांहींच करूं इच्छित नाहीं. प्रेमाकडे मी त्या दिवशीं हें बोललों; पण तिनं तुझ्या या व्यवहाराच्या बाबतींत मला अज्ञातच ठेविलं.'

'यासंबंधानं मी कुणालाच कांहीं सांगितलेलं नाहीं. मीच तिचा रिसीव्हर असल्यामुळं ती तरी कशाला चवकशी करते! बरं, या कारखान्याचे चालक लालासाहेब कुठं आहेत?'

'त्यांच्या एका स्नेह्याची तार आल्यावरून ते मीरतला गेले. तिथं त्या स्नेह्याची मुलगी आसन्नमरण असून यांना भेटण्याची तिला इच्छा झाली. तेव्हां मुलीसह त्यांना तिकडे जाणं भाग पडलं.'

'हं. त्यांच्या मुलीला नवऱ्यानं टाकलं आहे, असं मघां म्हटलं नाहींस का? मग त्या तिच्या नवऱ्याचा ठावठिकाणा तरी त्यांना लागला? त्यांना कांहीं मदत होण्यासारखी असल्यास आपण करूं. कारण असल्या चांगल्या मनुष्याच्या कर्तबगारीचा कारखान्याला उपयोग करून घ्यावयाचा म्हणजे त्याला दुःखमुक्त केलं पाहिजे. कसं?' पुनीतचें हें बोलणें त्याच्या मनःस्थितीला अनुसरून अत्यंत कळवळ्याचें होतें.

पण सुनीतला मात्र त्याचें हंसू आलें. कारण उदारधी मनुष्यहि आपल्या स्वभावाला अनुसरून कर्तव्य बजावीत असतांना न कळत कां होईना पण कांहींचा घात करीत असतो. कार्यमग्नतेचें हें लक्षण असेल; पण व्यवहारांत मात्र विषमता आणि उत्पात निर्माण करण्याला तें कारण होतें. सूर्य हा जीवनदायी खरा, पण तीव्रतापानें मरणारीं व तळमणारीं माणसें त्याला मरणदायीच ठरवितात. सुनीतच्या लक्षांत चटकन् हें तत्त्व आलें. कारण सुनीतसारख्या मनुष्याशीं प्रेमाला लग्न करण्याची घाई करणारा पुनीत मीनेच्या बाबतींत कळवळा दाखवितो; पण प्रेमाला निवडलेलें स्थळ सर्वस्वीं योग्य आहे कीं नाहीं, हें पाहण्याचें मात्र टाळतो. स्वार्थी लोक असल्या माणसाचा भलताच फायदा घेऊन आपला तळिराम गार करतात. दोघाचें खापर मात्र त्या बिचाऱ्याच्या डोकीवर फुटतें.

सुनीत हंसऱ्या मुद्रेनें आपणाकडे पहात विचारांत गढून गेलेला दिसल्यामुळें पुनीतनें पुनः विचारलें, ‘ लालासाहेबांच्या जांवयाचा ठाव ठिकाणा तुला माहीत आहे वाटतं ? ’

‘ असं वाटतं; पण प्रत्यक्ष पुराव्यावांचून मला तसं स्पष्ट सांगवत नाहीं. लालाजींचे पत्र येऊंद्या म्हणजे सगळं कळेल. त्यांच्या त्या मुलीचं नांव मीना. मीनेचा भाग्योदय व्हावयाचा असेल तर तो तुझ्यासारख्या परोपकारी आणि उदारधी गुरूकडूनच व्हावा अशी माझी इच्छा आहे. तेव्हां इतक्यांतच त्या संबंधानं तूं मला आग्रह करूं नको. एकाद्याचं वाईट करणं सोपं असतं; पण चांगलं करणं फार कठीण ! शिवाय इंद्राच्या आसनाखालीं लपलेल्या तक्षकाप्रमाणं तोही एका थोरामोठ्यांचा नाजुक बालेकिल्ला पकडून बसला आहे. ’

‘ तूंहि त्या प्रयत्नांत आहेसच म्हणायचा. मग ठीक. मी तसा उतावीळपणा करीत नाहीं. मात्र तिच्या कल्याणासाठीं माझं कितीहि नुकसान झालं तरी तें मी अवश्य सहन करीन. कारण अलीकडे असल्या विवाहित पुरुषांचा बेदरकारपणा जास्तच वाढूं लागला आहे. त्याला थोडासा तरी आळा घातल्याचं पुण्य लाभेल. ’

'एकदां स्पष्ट कल्पना आली म्हणजे तूं माघार घेणार नाहींस याबद्दल माझी खात्री आहे. दुसरी गोष्ट. आतां या कारखान्याकडेही तूं पूर्ण लक्ष घातलं पाहिजे. तुझ्या त्या लॅबोरेटरीपेक्षां हा सौदा फायद्याचा ठरेल.'

'तें मला मान्य आहे. लालासाहेब आल्यावर या संबंधानं अवश्य बोलूं. कारण सीमेंट–काँक्रिटच्या वस्तूंचा कारखाना महाराष्ट्रांत दुसरा नाहीं. तेव्हां मालाची भरपूर निपज झाल्यास फायद्याचं प्रमाणही वाढेल. जरूरी निर्माण झालेली आहेच.' असें बोलल्यावर कांहीं वेळ थांबून पुनीतनें विचारलें, 'प्रेमासंबंधानं एक गोष्ट विचारली तर तूं स्पष्ट सांगशील का?'

'तुझ्या एकट्यापुरता मी केव्हांही स्पष्ट आहे. तुला न कळविण्यासारखं असं माझ्याजवळ कांहींच नाहीं.'

'एकंदरींत प्रेमाचा तुझ्याकडे जास्त ओढा दिसतो. तेव्हां तिच्याबद्दल तुला काय वाटतं हें मला कळेल तर बरं!'

'मला तिच्याबद्दल अतिशय आदर वाटतो, तिच्या बुद्धिमत्तेचं कौतुक वाटतं, प्रेमळतेबद्दल सहानुभूति वाटते, वर्तनाबद्दल पूज्यभाव उत्पन्न होतो–'

'अशा प्रकारचं तिचं गुणवर्णन ऐकून घेण्यासाठीं मी नाहीं तुला तसा प्रश्न विचारला. कारण तें काम मलाहि करतां येईल. पण—'

आणि या ऐन आणीबाणीच्याच वेळीं सुनीतला त्या अवघड अवस्थेंतून मुक्त करण्यासाठींच म्हणून कीं काय, तारेचा शिपाई तेथें आला आणि त्यानें तारेचा एक लठ्ठ लखोटा सुनीतच्या हातीं दिला. सुनीतनें घाईघाईनें फार्मावर सही करून तो घेतला आणि शिपाई निघून गेल्यावर ती तार तो वाचूं लागला.

थोड्याच वेळांत वाचन संपलें. नंतर उत्सुकतेनें पहाणाऱ्या पुनीतकडे वळून तो म्हणाला. 'विनीत तुझं एकेल?'

'ऐकेल; तसा तो माझ्या बाहेर नाहीं.'

'आतां समजेलच. त्याला आपल्याबरोबर घेऊन तूं मीरतच्या हास्पिटलमध्यें आलं पाहिजे.'

'कारण?'

'कारण तुझ्या मघांच्या प्रश्नाचं उत्तर तुला तिथं मिळण्याचा संभव

आहे. लालासाहेबांच्या मीनेसाठीं–त्या परित्यक्तेसाठीं–कांही तरी करावं असं तुला वाटतं ना? मग चल तर. कारण तो कांहीं माझं ऐकणार नाहीं. आणि त्याला तर लालाजींनीं घेऊन यायला सांगितलं आहे.'

'त्यांचा याच्याशीं काय संबंध?' पुनीतनें आश्चर्यानें प्रश्न केला.

"तें मलासुद्धां कळत नाहीं. मात्र हें कारण त्याला कळतां कामा नये. 'कॉलऱ्यावर मी जें एक नवीन इंजेक्शन काढलं आहे त्याची त्या हास्पिटलमध्यें परीक्षा पहावयाची आहे' असं त्याला सांगून बरोबर आण. मी आधींच्या गाडीनं जातों. तूं त्याच्यासह दुसऱ्या गाडीनं ये. मीरतच्या स्टेशनावर मी उभा आहेंच. वेळ मोठ्या आणीबाणीची आहे. लालाजींसाठीं आपणा सर्वांना एवढा त्रास सहन केलाच पाहिजे. एका साध्वीवर उपकार करण्याची आलेली ही महान् संधि तूं दवडणार नाहींस अशी मला आशा वाटते. मात्र मी सांगितलेलं कारण त्याला सांगायला विसरूं नको. तुझ्या सर्व प्रश्नांचीं उत्तरें मी तेथें देईन.'

सुनीतच्या या निरवानिरवीनें पुनीतला आश्चर्य वाटलें; पण सुनीत प्रवासाच्या तयारीला लागल्यामुळें स्वतःशींच त्याच्या रहस्यमय बोलण्याचा आणि समयसूचकतेचा विचार करीत तो दरवाजाकडे वळला, तेव्हां सुनीतनें विचारलें, 'मग आपण आतां मीरत स्टेशनवर एकमेकांना भेटूं!'

'होय, तसंच.'

---

## : २५ : : अंधारांतील प्रकाशकिरण

मीरतचें तें हॉस्पिटल फार मोठें असलें तरी मिनारला ज्या खोलींत ठेवण्यांत आलें होतें ती खोली हॉस्पिटलच्या बाहेरच एका प्रशस्त जागेंत होती. त्यामुळें तेथें गडबड वगैरे फारशी नव्हती. मीनेचा सुकुमार हात आपल्या क्षीण हातांत घेऊन मिनार मंद स्वरानें मीनेची याचना करीत होती. तिचा श्रीमंत बाप विषण्ण चेहऱ्यानें दूरच्या एका कोचावर बसून लालाजीशीं विचारविनिमय करण्यांत गढून गेला होता. मधून मधुन क्षीणप्रभ होत चाललेल्या मिनारच्या चेहेऱ्याकडे पाहून तो दीर्घ सुस्कारे सोडीत होता. कोंपऱ्यांत असलेल्या टेबलाजवळ दोघी नर्स उभ्या राहून अगदीं अस्पष्ट स्वरांत एकमेकींशीं बोलत होत्या. त्यांतील एक नर्स आपली ड्यूटी संपवून जाण्याच्या तयारींत असावी. डॉक्टर नुकतेच येऊन गेले असल्यामुळें सगळीकडे गंभीर निस्तब्धता पसरलेली दिसत होती. खिडक्यांना पांढरे पडदे लाविलेले असले तरी मधून मधून येणाऱ्या वाऱ्याच्या झुळकेबरोबर कुठून तरी औषधाचा दर्प आल्यावांचून रहात नव्हता. ठिकठिकाणच्या फुलदाणींत ठेविलेलीं टवटवीत फुलें त्या तीक्ष्ण दर्पाचें निवारण करीत होतीं. तसेंच एखाद्या साशंक मनुष्याला मृत्यूची भीषण छाया दाराजवळच्या कोंपऱ्यांत दबा धरून बसलेली आहे असा भास झाल्यास तो कांहीं अगदींच चुकीचा ठरला नसता.

'निसर्गानं नटविलेलं कलाकौशल्य ओसरून गेलं तर आपणाला त्याचं कांहीं वाटत नाहीं; पण वादळानं त्याची वाताहत केली म्हणजे सहजच 'अरेरे' असे उद्गार निघतात. त्यावेळीं आपपर भावाचा विसर पडतो. जीवनाचंही तसंच आहे. मिनार, आतां कसला राग आणि लोभ घेऊन बसतेस?'

मीनेच्या या वाक्प्रवाहानें किंचित् संजीवित झालेली मिनार उद्गारली, 'कलेची मादकता वासनामय झाली म्हणजे जीवनाचा दीप अवेळीं

अस्तंगत होतो. इतका त्या दोघांचा निकट संबंध आहे. त्यावेळीं वादळाची कल्पनाच नसते.'

"कल्पना नसते म्हणूनच धक्का बसतो. म्हणून वास्तवता ही कल्पनामय न मानतां अनुभविकांच्या जिवंत बोलांवर आधारून ठेवावी लागते. 'वादळं होणारच. वाताहात होणारच; पण तीच खरी वास्तवता आहे म्हणूनच; जपून जा. विचार करून पहा. दिवा जाईल. नियतिचक्र निराळं आहे. अचिंत्य शक्तीचं कार्य अजाणतेपणाच्या उपहासानं न पारखतां जातिवंत जाणिवेच्या बोलांनीं पारखून पहा.' असे जे आवाज आपल्या कानावर येतात ते ऐकले पाहिजेत."

'तें खरं ग; पण आतां आठवून काय उपयोग ? माझं जीवन तर संपलंच; पण तुझ्या जीवनाला तरी ओलावा मिळूं दे.' थोडा वेळ थांबून मिनार म्हणाली, 'लालाजीनीं त्यांना बोलावलं आहे ना ?'

'होय. पण प्रत्यक्ष काय अनुभव येतो पहावं. तिथं सुनीतबाबूजी नांवाचे एक अत्यंत हुषार गृहस्थ आहेत, ते कोणतं कौशल्य लढवितात तेंच आतां पहायचं आहे.''

तिकडे त्या दोघांतही तोच विषय चालला होता. मिनारचा बाप लालाजींना सांगत होता, "विझत जाणाऱ्या दिव्याची कसली काळजी वाहायची! मिनारच्या मनाला समाधान वाटेल, तिच्या अंतकाळच्या यातना थोड्याशा कमी होतील असं कांहीं तरी कार्य झालं पाहिजे. ती मीनेला सुखी करूं शकली तर त्या समाधानानें तिचें आयुष्य चार सहा दिवस जास्त वाढेल. कृतकर्माच्या जाणिवेनें तिचें अन्त:करण तडफडत आहे. भलत्याच मोहाला बळी पडून तिनें आपलें मरण अकालीं ओढवून आणलें.'

'तिला अनुताप झाला आहे. अनुतापानं ती पवित्र होत आहे. पवित्र माणसाची इच्छा अपुरी राहात नाहीं. ईश्वराला ती पूर्ण करावी लागते. तेव्हां सुनीतची आणि तिची भेट होईल अशी मला खात्री वाटते. पुढें काय होईल तें मी काय सांगूं?'

'पण माझ्या या छोकरीसारखाच त्याला अनुताप झाला असेल का हो?'

मिनारच्या बापानें विचारलेल्या या प्रश्नाला काय उत्तर द्यावें हें लालाजींना कळेना. मीनेकडून त्यांना मिळालेली माहिती अगदीं वेगळी होती. तरी पण कांहीं तरी बोललेंच पाहिजे म्हणून ते बोलले, ' माझें मन तसें सांगतें. निदान आतां तरी त्याच्या मनावर तसा परिणाम झाला असला पाहिजे. परमेश्वरी योजना अतर्क्य असते.'

' माझ्या एकट्याच्याच बाबतींत परमेश्वर कसा हो अगदीं झोंपला ?'

" असं इतक्यांत म्हणूं नका. मिनारच्या अन्तःकरणाला अन्तकाळीं समाधानाचा लाभ झाला तरी ती त्याची कृपाच समजावयाची !" लालाजींनीं त्यांचें सांतवन करण्याच्या हेतूनें म्हटलें. कारण मिनार आतां वांचणें म्हणजे तिच्या हृदयाला असह्य वेदनांत तळमळत ठेवणेंच होय. ईश्वर तसें करणार नाहीं. तितका तो निष्ठुर कसा असेल !

आणखीं कांहीं वेळ जातो न जातो तोंच एका नर्सच्या मागून सुनीत आंत आलेला त्यांनीं पाहिला. ते एकदम उठले. सुनीतनें एकदां चौफेर दृष्टि फिरविली. आणि लालाजींना पाहतांच पुढें होऊन त्यांना नमस्कार केला. त्यांनीं त्याला उठवून कोचावर बसविलें आणि मिनारच्या बापाला म्हटलें, ' हे सुनीत बाबूजी त्या कारखान्याचे मालक. कितना कर्तव्य-दक्ष और अश्राफ आदमी है, देखो. इसके उपरही वो आफत आयी थी ! आणि सुनीत, हे मिनारचे वडील.'

सुनीतनें लागलीच त्यांना नमस्कार केला. तेव्हां त्याचे दोन्ही हात धरून त्याला आदरानें आपल्याजवळ बसवून घेत ते म्हणाले, ' आप आनेसे बहोत आनंद हुवा. देखो, बिछानेके उपर लेटीहुई है ये हमारी छोकरी मिनार! तो बोलो बाबूजी, विनीत आनेवाला है या नहि ?"

' क्यौं नहि ? उसका भाई और हमारा दोस्त पुनीतबाबू उसको ले कर आया है. दोनो को बाहार बिठाकर मै अंदर आया !'

' अच्छा. सुनीतबाबूजी, आप बडे अकलवंत हो. क्या अच्छा काम किया ! बोलो, इसके वास्ते क्या बक्षिस मांगते हो ?' म्हातारा शेटजी

आनन्दानें अगदीं बेहोष होऊन म्हणाला. कारण विनीत नुसत्या तारेनें येणें ही त्याला अशक्यांतली अशक्य गोष्ट वाटत होती.

‘ कुच्छ नही शेठजी, कुच्छ नही होना. अदमीकी पेहेछान लेने देनेसे नही होती ’ सुनीत म्हणाला. लाला रामशरणहि या उत्तरानें खूष झाला. कारण सुनीतनें असेंच बोलावें असें तो इच्छित होता.

त्यानें विचारलें, “ विनीतला आणण्याकरितां काय युक्ति केली सुनीतबाबूजी ? ”

“ अकस्मात् युक्ति सुचली, आणि माझ्या एका जिव्हाळ्याच्या मित्रानें ती सिद्धीला नेली. तेव्हां त्याचेच आभार मानले पाहिजेत. बरें आतां पुढें भेटीगांठी कशा काय व्हायच्या ? ”

हें विचारल्यामुळें लालाजींसमोर तो बिकट प्रश्न उभा राहिला. त्यांनीं मिनारच्या बापाला विचारलें. बापानें नर्सला सांगितलें आणि नर्स डॉक्टरला बोलवायला गेली. तितक्यांत सुनीतनें पुनीतला आंत आणून त्याची सर्वांना ओळख करून दिली. मीननें आपलें काम केलें. तिनें मिनारला फार सावधगिरीनें विनीत आल्याची वर्दी दिली. अशक्य गोष्ट शक्य झाली असें वाटून मिनारलाहि समाधान वाटलें. तिच्या निस्तेज नेत्रांत पाणी चमकलें. गालांवर टवटवी आली आणि तिनें विचारलें, ‘ मग ते आंत कां नाहीं आले ? ’

‘ डॉक्टर आल्यावर ते ठरवितील त्याप्रमाणें होईल. त्यांना बोलवायला नर्स गेली आहे. ’ मीननें हळूच सांगितलें.

तितक्यांत डॉक्टरहि आले. त्यांनीं प्रथम मिनारची प्रकृति तपासली आणि नंतर ते समाधानानें म्हणाले, ‘ सर्व ठीक आहे. दोन तासांत मुलाखत संपवा. ’

डॉक्टरच्या या निकालानें सर्वांना आनंद झाला. नर्सला बाहेर उभें रहावयाला सांगून डॉक्टर निघून गेले. त्यांना मिनारची सर्व माहिती होती. जातांना फक्त त्यांनीं विनीतकडे एकदां पाहिलें. कारण तो बाहेरच बसून होता.

पुनीत बाहेर येऊन त्यानें विनीतला विचारलें, ' मिनार नांवाची कोणी एक मुलगी तुला माहीत आहे? तुझ्याबरोबर ती विलायतेला गेली होती म्हणे. सध्यां ती आसन्नमरण होऊन मृत्युशय्येवर पडली आहे. आणि तुझी अखेरची भेट घेऊं इच्छिते. कां, असा घाबरलास कां? ती मरणोन्मुख आहे. तिचा बापहि आंत आहे.'

' तिचा बापहि तेथेंच आहे?' कांपऱ्या आवजानें विनीतनें विचारलें.

त्याचा तो प्रश्न, आवाज आणि चेहरा पाहून पुनीत तर चकितच झाला. पण सुनीतनें थोडीशी कल्पना दिली असल्यामुळें चटकन् त्यानें त्याचा हात धरला आणि त्याला आंत आणलें. विनीतनें आंत येतांच सभोंवार नजर फिरविली. सगळी वस्तुस्थिति त्याच्या ध्यानांत आली; पण रुग्णशय्येवर पडलेल्या मिनारकडे नजर जातांच तो एकदम थिजलाच. बिछान्यावरच तिच्या उशाजवळ अधोमुख होऊन मीनाहि बसलेली त्याला दिसली.

स्तब्धतेंत कांहीं क्षण गेले असतील नसतील तोंच, मिनारनें हाताच्या खुणेनें विनितला जवळ बोलाविलें आणि तोहि तिच्याजवळ बिछान्यावर जाऊन बसला. ती क्षीण स्वरानें म्हणाली, ' मैं किया हुवा पापका बदला लेने को चली. आप क्या करोगे?'

विनीत कांहीं न बोलतां तिच्या तोंडाकडे टक लावून पहात राहिला. स्वैराचाराच्या वादळांत सांपडून तिची झालेली शोचनीय वाताहात त्यानें जाणली; आणि हें पाहूनहि आपण सावध झालों नाहीं तर? आधींच पस्तावलेल्या त्याच्या अन्तःकरणाला त्या अन्तर्गत प्रश्नानें जोराचा धक्का बसला.त्याचे ओंठ हालले; विलग झाले. डोळे पाण्यानें भरून आले; हाताचीं बोटें थरथरूं लागलीं. त्यानें एकवार सर्वांकडे नजर फिरविली. सर्वांची नजर आपल्यावर खिळून राहिली आहे हें त्यानें जाणलें. यमाच्या काल्पनिक दरबारांत तर आपण उभे नाहीं ना, असा त्याला क्षणभर भास झाला आणि त्यानें जवळच भयचकित मुद्रेनें मिनारच्या बिछान्याजवळ बसलेल्या मीनेकडे क्षणभर पाहून मीनारच्या चेहऱ्यावर दृष्टि स्थिर केली.

गतायुष्याचा सगळा चित्रपट निरीक्षण करून झाला असें मानून

मिनार त्याला म्हणाली, ‘ जबान अटक जाती है. मुझे बोलनेका अख्त्यार नहि है. लेकिन मै चाहती हूं आप ऐसा न करो. भोली भाली मीना–’

पुढें तिच्यानें बोलवेना. श्वासोछ्वास जोरानें होऊं लागला. ती बोलण्याचा प्रयत्न करूं लागली. तिची ती धडपड पाहून विनीत घाबरला. त्यानें तिच्या मस्तकावरून हात फिरवीत हळूंच म्हटलें, ‘ हां मै मानता हूं. ’

या दोन शब्दांनीं बरेंच कार्य केलें; मिनारला थोडी हुषारी वाटली. तिनें आपल्या मस्तकावर असलेला त्याचा हात धरून म्हटलें, ‘ तो हमारा कहना मानोगे ! ’

‘ हां. दिलसे मानूं गा.’

‘ तो लो ’ असें म्हणून त्याच हातांत तिनें मीनेचा हात उचलून दिला आणि ‘ चंदरोज हुये. बादल मे धीरीहुयी मैना आयी है. पाक दिलवाली है. दिलसे संभालो. आपकी कुलस्त्री आपही संभालना चाहिये. छोडदेने से कहां जायेंगी बिचारी ! अंधकारकी रोशनी येहि है. ”

कसेबसे इतके शब्द उच्चारून मिनार श्रान्त होऊन पडली. विनीत तिला वारा घालूं लागला. मीनेनें तिच्या डोकीवरची पट्टी सरळ केली.

थोड्या वेळानें तिनें डोळे उघडून अस्पष्ट स्वरानें कांहीं शब्द उच्चारले; विनीतला ते ऐकूं गेले नसल्यामुळें तो खालीं वांकला. त्याचा उद्देश जाणून ती म्हणाली, ‘ इसमें मेरा समाधान है.”

“ हां. तो निश्चिंत रहो मिनार. मै इसका पति हूं. आखिरतक संभालूंगा. ’ विनीतनें स्पष्ट आवाजांत तिला सांगितलें.

आणि त्या शब्दांनीं मिनारच्या देहांत नवजीवन संचारलें. तिनें पुनः डोळे उघडले. तिची मुद्रा प्रसन्न दिसूं लागली. सर्वांना आनंद झाला. पुनीतनें स्पष्ट बोलून दाखविलें, ‘ छान बोललास विनीत ! तूं माझा भाऊ म्हणून सांगायला मला अभिमान वाटेल. चूक सर्वांच्या हातून होते; पण अनुतापपूर्वक ती सुधारणें हीच खरी माणुसकी.’

लालाजी सद्गदित होऊन म्हणाले, ' मै भी अंधकारमें प्रकाशकी झलक देखि.'

नंतर विनीत उठला आणि अधोमुख होऊन सुनीतसमोर जाऊन उभा राहिला. सुनीतहि कांहीं कमी नव्हता. त्यानें त्याचे दोन्ही हात धरून त्याला जवळ ओढून म्हटलें, ' बॅरिस्टरसाहेब ! काळजी करूं नका. पुनीतच्या साहाय्यानें मला एका सच्चा मित्राचा लाभ झाला, असेंच मी समजतों. कोणत्याहि प्रसंगीं मी तुमच्या पाठीशीं उभा आहें. शेटजींना आणि लालाजींना नमस्कार करा आणि त्यांचा आशीर्वाद घ्या.'

आणि आश्चर्य हें कीं, त्या कायदेपंडितानें त्या दोघांच्याही पायावर डोकें ठेवून नमस्कार केला. आणि तेवढ्यानेंच मिनारच्या चेहेऱ्यावर विलक्षण प्रफुल्लता आली. शेवटीं नर्सला डॉक्टरच्या आगमनानें ती मुलाखत आवरावी लागली.

———

## : २६ : : प्रेमाचा प्रश्न

'लालाजींची तार आल्यामुळें सुनीत घाईघाईनें मीरतला गेले' एवढीच हकीकत प्रेमाला समजली आणि तीसुद्धां तिनें कारखान्यांत येऊन चवकशी केली, तेव्हां! हेमा म्हणाली, 'कॉलऱ्याच्या इंजक्शनची परीक्षा पहाण्यासाठीं मीरतच्या हास्पिटलमधून बोलावणं आलं, तेव्हां भाऊजींना बरोबर घेऊन ते गेले.'

प्रेमाला मात्र या तीन्ही व्यक्ति एकेच ठिकाणीं एकेच वेळीं कां गेल्या याचा स्पष्ट उलगडा होईना; पण सुनीतच्या जाण्यांत कांहीं तरी तसेंच रहस्य असलें पाहिजे असें तिनें ताडलें. कारण, उगाच कारखाना सोडून तो जाणार नाहीं. तेव्हां तें रहस्य कळावें म्हणून ती रोज दुकानाकडून कारखान्याकडे एक खेप करूं लागली. तीन चार दिवसांतच सुनीत आला. प्रेमाला कारखान्यांत आलेली पहातांच त्यानें हंसून विचारलें, 'कां? कारखाना खरेदी करण्याचा लोभ सुटत नाहीं वाटतं?'

'मला काय करायचा आहे कारखाना? पण लालासाहेब आणि मीना केव्हां येणार, सांगा ना!' प्रेमानें त्या रहस्याचा उलगडा व्हावा म्हणून विचारलें.

'मीना आतां इथं कशाला येईल? तिचं विनीतशीं लग्न झालं. ती आली तर आपल्या बंगल्यांत जाईल!'

'म्हणजे? आहे काय हा प्रकार? घटस्फोटानंतरचं रीमॅरेज कीं काय?' प्रेमानें आश्चर्यानें प्रश्न केला.

'अग, तोच तिचा नवरा. त्यानं तिला टाकली होती, म्हणून ती परित्यक्ता. आज पांच सहा वर्षांपूर्वीची ही गोष्ट! पुनीतला तूं प्रश्न केलास ना, त्याचा उलगडा करण्यासाठीं मी त्यांना घेऊन तिकडे गेलों. विलक्षण योगायोग घडून आला आणि त्यानं तिचा स्वीकार केला.

इटकुली मिटकुली गोष्ट आणि परिणाम झाला इष्ट...' बोलतां बोलतां सुनीतला जोरानें हंसू आलें आणि अनेक दिवसांनीं आज तो पोटभर हंसला.

प्रेमा तर त्याच्याकडे नुसती पहातच राहिली. हेमाला ही हकीकत समजल्यावर ती काय म्हणेल याचाच ती विचार करीत होती.

तिची ती तशी मुद्रा पाहून सुनीत आपलें हंसें आंवरून म्हणाला, 'तूं नाहीं हंसलीस?'

'मला कशाला हंसू येईल! बिचाऱ्या मीनेचं कल्याण झालं हीच समाधानाची गोष्ट! मी विचार करतें आहे हेमाचा. तिला आतां काय वाटेल?'

'पुनीत तिला सांगेल, चांगली मनपसंत मुलगी आढळली, सुनीतचा आग्रह पडला, तेव्हां घेतलं उरकून लग्न! आणि विनीत तिला सांगेल, प्रेमाच्या आशेवर उगाच किती दिवस वाट पहात राहायचं? मुलगी दाखवायला आणली, तीच पसंत केली आणि शुभकार्याला विलंब लावूं नये म्हणून घेतलं लग्न उरकून! आतां सुनीतचा मोठा कारखाना आहेच जेवणावळीचे समारंभ उरकायला!! या हकीगतीच्या होतील मग लोक-वार्ता आणि काय हीं अलीकडच्या सुशिक्षितांचीं लग्नं! केव्हां होतात कळत सुद्धां नाहीं! सगळं कांहीं विवाहानंतर कळायचं!!' अशीं बोलणीं ऐकूं येतील; पण पुनीत आणि तूं यांनाच खरी हकीकत माहीत असणार. मीना तर लग्न झालेली मुलगी! तिला आपल्या नवऱ्याचं पूर्वचरित्र कुणालाही सांगण्याची हिंमत होणार नाहीं. मग विवाहानंतर विवाहा-आधींचं रहस्य कसं कळणार?'

'मी सांगेन सर्वांना!'

'मी नको सांगूं म्हणून सांगितल्यावर?' सुनीत चटकन् बोलून गेला.

प्रेमाला तेवढेच शब्द पुरे झाले. ती हंसून म्हणाली, 'तुम्हीं कोण मला सांगणार? आणि मी कां म्हणून तुमचं ऐकावं?'

'खरंच. तूं काय म्हणून माझं ऐकावं?' सुनीत सचिंत होऊन स्तब्ध राहिला.

'मी आईलाच विचारतें. ती तुम्हांला चांगली ओळखते. इतकं सचिंत कशाला व्हायचं तें!' प्रेमा मुद्दामच गंभीरपणाचा आव आणून म्हणाली. कारण सुनीतच्या त्या गंभीर मुद्रेकडे पाहून आणि त्याचा अर्थ जाणून तिला अनावर हंसूं येत होतें.

'मी मगनलालला विचारलं तर?' प्रेमाच्या उसन्या गांभीर्याचा पोकळ डोलारा भूमिसात् करावा या हेतूनें सुनीतनें तिलाच प्रश्न केला.

'पण यांत लोकांना काय विचारायचं! ज्याचा त्यानंच विचार केला तर?' प्रेमा कांहींशा रुसव्या स्वरानें म्हणाली.

'तें तर पुनीतनंच त्या दिवशीं मला विचारलं आहे. त्यावेळीं लालाजींची तार आली नसती तर त्यानं या गोष्टीचा निकालच लावून घेतला असता.'

'मग त्यांना जें उत्तर देणार होतां—' प्रेमा मध्येंच थांबली. कारण असें विचारणें अयोग्य ठरेल असें तिच तिलाच वाटलें.

'तें उत्तर मी सावकाश देईन; पण उद्यां कारखान्यांत एक मोठा समारंभ आहे त्याची तयारी मला आधीं केली पाहिजे—'

याच वेळीं पुनीत आंत आला आणि म्हणाला, 'वाः प्रेमा इथंच आहे वाटतं! आई म्हणाली, रोज ती कारखान्यांत जाते, मी तिकडूनच आलों. खरंच तें. कारखाना चालविण्याची हौस दिसते आमच्या प्रेमाताईला!'

'विनीत आले वाटतं सहकुटुंब?' प्रेमानें विचारलें.

या प्रश्नाचें उत्तर देण्यापूर्वी पुनीतनें सुनीतकडे पाहिलें. तेव्हां सुनीत म्हणाला, 'हिला माहीत आहे सगळं!'

'तरच मला त्या दिवशीं हिनं तसा प्रश्न केला. कांहीं म्हटलं तरी स्त्रियांचीं अन्तःकरणं जाणणं मोठं कठीण असतं हीच गोष्ट खरी. आम्हां पुरुषांचीं अन्तःकरणं इतकीं खोल नाहींत.'

'आणि विनीतसारख्यांनाही हाच न्याय लावायचा काय?' प्रेमानें मुद्दाम विचारलें.

'तूं आम्हांला बोलूं देणार आहेस थोडीच ? बरं पण उद्यांच्या समारंभाचं काय ?'

सुनीतला उद्देशून पुनीतचें हें वाक्य होतें. सुनीतही त्याच विचारांत होता. त्यानें एका नोकराला हांक मारली आणि मुकादमाला बोलावून घेऊन येण्याला सांगितलें. तेव्हां प्रेमानें विचारलें, 'कसला समारंभ ?'

'कारखान्याचा वाढदिवस आणि विनीतच्या लग्नाची जेवणावळ' सुनीतनें उत्तर दिलें.

'कुणाची ही फसवणूक ? मनाची कीं जनाची ?' प्रेमानें पुनः विचारलें.

'मनाची फसवणूक करणें हा मनुष्याचा धर्म आहे. ती तो नेहमींच करीत असतो; पण लोकांना फसविण्यासाठींच असे समारंभ करावे लागतात. ओंठातून शब्द काढायला पोटाची भरती करावी लागते. जुनापुराणा रिवाज आहे हा !' हेंहि उत्तर सुनीतनेंच दिलें. आणि दारांत उभ्या असलेल्या मुकादमाला तो म्हणाला, 'उद्यां कारखान्याचा वाढदिवस आहे आणि जेवणावळ आहे. लालाजी सकाळीं येतील. सगळी तजवीज ठेवा.'

तितक्यांत पुनीतला कांहीं आठवण होऊन तो म्हणाला, 'तोरणं लावून मंडप उभारा आणि ताशेवाजंत्रींहि आणा.'

'त्याचं काय कारण ?' सुनीतनें विचारलें.

'उद्यां समजेल. लालाजींची खास सूचना आहे ही.' पुनीतनें प्रेमाकडे पहात सुनीतला उत्तर दिलें. मुकादम बिचारा आळीपाळीनें दोघांच्याहि तोंडाकडे पहात होता.

शेवटीं सुनीतनें त्याचा तो अवघडपणा जाणून म्हटलें, "लालाजींची सूचना असेल तर तसं अवश्य करा. ते सकाळीं आल्यावर कळेलच."

'निमंत्रणं सर्वांना गेलीं ?' मुकादम गेल्यावर सुनीतनें पुनीतला प्रश्न केला.

'तीच तर सगळी कामगिरी उरकण्यासाठीं मला फिरावं लागलं, आणि इतका उशीर झाला. तुम्हीं दोघं आपलीं इथं बोलतच बसलां!'

‘ बोलण्याचा मुद्दा एवढाच होता, विनीतच्या विवाहाबद्दलची हकीगत मी सांगितली तशीच लोकांना समजली पाहिजे. आणि ही म्हणाली ‘ मी काय म्हणून तुमचं ऐकावं ? ’ याच प्रश्नावर वादाला सुरवात झाली.’ सुनीतनें प्रेमाकडे पहात पुनीतला सांगितलें.

‘ या असल्या नसत्या बंधनामुळंच अंधारांतील प्रकार उजेडांत येत नाहींत आणि मग विवाहानंतर त्याला वाचा फुटते.’ प्रेमानें कांहींशा रुसव्या भाषेनें खुलासा केला.

‘ हें कांहीं तरीच बरं कां. माझी आज्ञा कां मानावी, हाच हिचा प्रश्न. सुनीतनें शेवटच्या वाक्यावर जोर देऊन म्हटलें.

‘ याचं उत्तर उद्यांच मिळेल बरं, प्रेमाताई ! ’ समजुतीच्या स्वरानें पण हेतुगर्भ मुद्रेनें प्रेमाकडे पहात पुनीत म्हणाला.

पुनीतच्या या बोलण्यांत कांहीं तरी रहस्य आहे असें वाटल्यामुळें प्रेमा स्तब्ध राहिली, आणि तो वाद तितक्यावरच थांबला.

---

## : २७ : : मनाचे पडसाद

पण घरीं आल्यावर मात्र पुनीतच्या त्या संदिग्ध बोलण्याचा तिला उलगडा झाला. कारण तिची आई म्हणाली, ' इतक्या घाईनं कसं उरकायचं ग हें कार्य ? '

प्रेमानें विचारलें, ' कसलं कार्य, आई ? '

" पुनीत येऊन म्हणाला ' उद्यां प्रेमाताईंचं लग्न आहे. सुनीत तुला पसंत आहे ना ? ' मी म्हटलं ' प्रेमाला विचारलंस कां ? ' आणि त्यानं सांगितलं ' हो. ' अलीकडे हीं अशींच लग्न होतात का ग ? "

प्रेमाच्या डोळयांत आनंदाश्रू उभे राहिले, आणि तिला हंसूहि आलें. व्हावीशी वाटणारी गोष्ट नकळत झाली म्हणजे अन्तःकरण आनंदानें भरून येतें. मुलानें न सांगतां अवश्य असलेलें काम केलें, पत्नीला न सांगतां जाणून तिनें पतीची परिचर्या केली, पत्नीची इच्छा जाणून पतीनें तिची इच्छा पुरविली तर जो आनंद होतो त्याला मोल नसतें. त्या आनंदाचा उपभोग मनुष्याला मनांतल्या मनांतच कितीतरी वेळ घ्यावासा वाटतो.

प्रेमाहि या वेळीं असल्याच अनिर्वचनीय आनन्दाचा उपभोग घेऊं लागली. आईला तिनें म्हटलें, ' पुनीतनीं केलं तें योग्यच असणार आई ! मला त्यांत आनंद आहे. '

यावर आई विशेष कांहीं बोलली नाहीं. जेवण झाल्यावर प्रेमाला मात्र झोंप आली नाहीं. ' लालाजी आणि पुनीत यांनीं हा बेत ठरविलेला दिसतो. वाजंत्रीं वाजायचीं विनीतच्या विवाहाचीं आणि लग्न व्हायचं माझं. लोक समजणार कारखान्याच्या मालकाच्या मुलीचं लग्न आणि होणार खुद्द मालकाचा विवाह ! बाहेर आणि आंत केवढा हा फरक ! माझ्या लग्नाला मगनलालची भीति आणि विनीतचा समारंभ होणार केवळ लोकांना

दाखविण्यासाठीं. हे लपंडाव आईला कसे कळणार ? मी गप्प बसणार माझ्या मनासारखं होणार म्हणून आणि विनीत स्तब्ध राहाणार लोकापवादांतून आपली मुक्तता होणार म्हणून ! काल्पनिक का होईना पण भलत्याच अभिनिवेशानं एका जबाबदार तिऱ्हाइतासमोर मी त्यांची पत्नी म्हणून सांगून मोकळी झाल्यें, आणि विनीत स्वतः-च्याच परित्यक्त पत्नीला बाळगायला तयार झाला. दोन्ही प्रसंग विलक्षण ! मी लग्नावांचून पत्नी म्हणून राहावें तर तें आईला, मला, त्यांना आणि निकट संबंधीयांना पत्करणार नाहीं. विनीतनें मीनेला तशीच आणून बाळगावी तर तेंही लोकापवादाला कारण होईल. निकट संबंधीयांना लग्न हा प्रकार विलक्षण वाटेल. बरें टाकलेली बायको बाळगली म्हणून सांगावें तर अविवाहित म्हणून लग्न करायला हा कसा तयार झाला ! लफंगाच दिसतो असं लोक म्हणतील. तेव्हां विनीतला लोकांसाठीं आणि मला मनाच्या समाधानासाठीं विवाहानंतर लग्न आणि जेवणावळ करणें भाग आहे. मनाची आणि जनाची लाज राखण्यासाठीं अनेकांवर असे प्रसंग येत असतील !

—बरं, इतरांचं असूं द्या. हेमाचं आणि विनीतचं तसं पाहिलं तर गुपित पुष्कळ आहे. हेमाला तर आपल्या गुपिताचा प्रत्यक्ष पुनीत-जवळही उलगडा करतां येणार नाहीं. विनीतलाहि आपलं गुपित जनतेला सांगायला तोंड नाहीं. माझं तसं कांहीं आहे का ? आहे. तो रात्रीचा प्रसंग ! पुनीतच्या पावित्र्यामुळंच माझा बचाव झाला !! हें मी सुनीतना सांगूं शकेन ? न सांगितलं तर जन्मभर माझं अन्तःकरण मला टोंचत राहील. कदाचित् मी त्यांत आजारी पडेन आणि बेशुद्धावस्थेच्या प्रलापांत बडबडूं लागेन. त्यापेक्षां आधींच मोकळ्या मनानं सांगितलं तर ? सुनीत माझा धिःकार करतील ? चालेल केला तरी; पण जन्मभर दोघांत अन्तर आणणारा तो अविश्वासाचा भीतिदायक पडदा नको. ते पस्ताव्याचे जळजळीत निखारे नकोत. तर मग सकाळीं प्रथम हेंच काम करावं...

प्रेमानें इतका विचार केल्यावर तिच्या मनाला निर्मळ आनंदाचा

लाभ झाला. मंगलवाद्यांचा रमणीय अन्तर्निनाद तिला ऐकूं आला, आणि सुखस्वप्नांत मग्न होऊन ती झोंपी गेली.

   

विनीत आणि मीना.

मीना म्हणाली 'लग्नानंतरचा भोजनसमारंभ म्हणजे हास्यास्पद प्रकारच नाहीं का?' विनीतनें उत्तर दिलें, जनापवाद, टाळण्याठीं अनेकांना असे अनेक प्रकार करावे लागतात. मानापमानाच्या भरीला बळी पडून असं करावं लागतं.'

मीनेनें हळूच म्हटलें, 'प्रेमाशीं लग्न जुळविण्याचा प्रयत्न केला नसता तर असा प्रसंग आला नसता!'

विनीतनें उत्तर दिलें, 'खरं आहे तें; पण अनेक पापं पचल्यावर अमुकच एका पापाच्या वेळीं शिक्षा भोगण्याचा प्रसंग येईल असं कुणाला कळतं थोडंच!'

'आतां तरी—' या मीनेच्या अर्धवट प्रश्नावर तो स्निग्ध दृष्टीनें तिच्याकडे पहात म्हणाला, 'हें एवढं प्रायश्चित्त पुरें झालं. थोडक्यांत बचावलों. मंडळी सज्जन भेटली. नाहीं तर मी जन्मांतून उठलों असतों. शिवाय मिनारच्या आत्म्याला शांति देतां आली. आतां मी राजरस्त्यानंच पाऊल टाकीन. स्त्रियांबद्दलची माझी कल्पना प्रेमानं अगदीं पार बदलून टाकली.'

मीना हंसून म्हणाली 'आणि म्हणूनच उद्यां तिला चांगला नजराणा देऊन मी तिच्या पायावर डोकं ठेवणार आहे.'

'तसं करच. मला आनंद वाटेल.' इतकें अंन्तःकरणपूर्वक बोलल्यावरच विनीतला गाढ झोंप लागली.

   

विनीतच्या गृहप्रवेशसमारंभाची सगळी जबाबदारी पुनीतनें हेमावर सोंपविली होती. तरी पण ती त्या गडबडींत स्वतःला विसरली नाहीं. प्रेमाचें लग्न सुनीतशीं होणार हें तिला कळलें. तिला एक प्रकारें आनं-

दच झाला. कारण तसें झालें नसतें तर प्रेमाचें भावनाप्रधान मन आणि पुनीतचा भोळा भाबडा स्वभाव यांचं ऐक्य होण्याला विलंब लागला नसता. त्यांत पूर्वीच्या अजाणत्या प्रेमाची स्मृति दिली असती कीं, आटोपलाच कारभार! बरं प्रेमाशिवाय सुनीत एकटाच राहिला असता, तर माझ्या पूर्वसहवासाचीं गाडलेलीं भुतं त्यानं उठविलीं असतीं. पुरुषांच्या मनाचा कुणी निर्वाळा द्यावा? दुसऱ्या कोणापेक्षां सुनीतचीच मला जास्त भीति वाटत होती. प्रेमाच्या सहवासांत तो गुंगला म्हणजे माझ्याबद्दलचा हेवादावाहि तो विसरून जाईल! तो चंद्रहार! आमचं—सुनीतचं आणि माझं—गुपित पहाणाऱ्याचं तोंड बंद करण्यासाठीं मीच विकला. आतां तो उद्यां सोडवून आणून लग्नाची भेट म्हणून प्रेमाच्या गळ्यांत घालावा म्हणजे झालं. तसं करण्याला आतां माझी मी मुखत्यार आहें. शिवाय 'चित्रींच्या निर्जीव हंसानें गिळलेल्या त्या हाराची' साडेसातीहि संपेल! सुनीतलाहि न सांगतां समजेल कीं, ही तहनाम्याची निशाणी आहे. बाकी तो तसा चांगला आहे . . . आणि या विचारांतच, आपल्या निजलेल्या मुलाचा गोड मुका घेऊन ती त्याच्या शेजारीं झोंपी गेली. पुनीत दुसऱ्या दिवशींच्या समारंभाच्या गडबडींत असल्यामुळें तिकडे आलासुद्धां नाहीं.

ø ø ø ø

पुनीत अविश्रांत मेहेनत करीत होता. निःस्वार्थीपणानें सर्वांना सुखी करण्यासाठीं झटणाऱ्या देवाला झोंप घ्यायला वेळ कुठें आहे? सगळी मंडळी आपापल्या आनंदमग्न विचारांत झोंपी गेली; पण पुनीत जागेपणींच झोंप घेत होता. कारण सर्वांना अत्यानन्दाचें दान देणाऱ्याला झोपेचें समाधान जागृतींतहि मिळूं शकतें. सुनीतशीं भावी काळाचें हितगुज करीत सकाळीं येणाऱ्या लालाजींची तो वाट पहात होता. त्याला प्रेमाची वारंवार आठवण होत होती.

तो म्हणाला, 'तिचं आतां शिक्षण सुटलंच!'

सुनीतनें हंसून उत्तर दिलें, 'वेडा आहेस तूं पुनीत! स्त्रियांना काय भावनाच नाहींत असं तुला वाटतं? तुझं जर शिक्षणाकडे इतकं लक्ष होतं

तर तूं कशाला लग्न केलंस?'

पुनीत म्हणाला, 'खरंच. मी तो विचारच केला नाहीं. त्या दिवशीं रात्रीं प्रेमा आमच्याकडे झोंपायला आली होती. दोन वाजतां मी उठलों आणि बाथरूममध्यें जाण्यासाठीं विजेचा दिवा लावला. पहातों तों पोर्चमध्यें आपली ही उभी! मला आश्चर्य वाटलं आणि काळजीहि उत्पन्न झाली. तसाच गेलों आणि डोक्याला हात लावून पाहिला, तों तें भयंकर तापलेलं!! 'मी औषध आणतों' असं म्हणून मागें वळलों, तोंच माझ्या हाताला धरून ती अडवून म्हणाली 'कांहीं नको. मी झोंपतें. अंगाचा दाह होऊं लागला म्हणून वाऱ्यावर आलें.' आणि तशीच धडपडत ती आपल्या खोलीकडे गेली. तूं म्हणतोस तें खोटं नाहीं. शिक्षणांत कितीही गढून गेली तरी तिला भावना आहेत!'

पुनीतचें हें सप्रयोग विधान ऐकून सुनीत काय समजायचें तें समजला. आणि पोट धरधरून हंसला.

नंतर त्यानें विचारलें, 'तूं कर्तबगार, परोपकारी आणि शूर आहेस खरा; पण हेमा केव्हां केव्हां तुला 'भोळा सांब' असं म्हणते? अगदीं हें अंतरींचं हितगुज असणार; पण आपलं विचारतों.'

यावर पुनीतहि पोट धरून हंसत म्हणाला, 'बरोबर ओळखलंस तूं. केव्हां केव्हा ती असंच मला म्हणते. पण ती वेडी आहे. स्वतःच्या सुखा-समाधानापलीकडे तिला कांहींच दिसत नाहीं. प्रेमा तिच्यापेक्षां किती तरी बुद्धिमान आहे. आतां येईलच तुला अनुभव!'

सुनीतनें म्हटलें, 'मला कशाला तिचं शिक्षण पाहिजे? असली बुद्धिमान तर करील आपल्या मुलांना विद्वान! कारण मुलांच्या विद्वत्तेला त्यांची आईच जास्त कारण होत असते..."

बरेच दिवसांनीं एकत्र आलेल्या त्या मित्रांचें हें बोलणें असेंच उजाडेपर्यंत चाललें होतें. **लगीन घरीं सगळी मंडळी झोंपी गेली तरी मुख्य मालकाला झोंपच नसते.** मात्र ही सगळी तारांबळ विवाहानंतरची **होती हें विसरतां कामा नये.**

---

## : २८ :

## : समारंभ !

विनीतला पैशाची आवश्यकता आहे हें जाणून मिनारच्या इच्छेप्रमाणें शेटजींनीं बरीच मोठी देणगी देऊन मीनेची विनीतबरोबर रवानगी केली. मात्र त्या समारंभानंतर दोघांनींहि मिनारकडे परत यावें असें ठरलें; मीनेनेंच आपण होऊन ठरविलें. कारण तिनेंच तिचें सौभाग्य तिला मिळवून दिलें असल्यामुळें तिची अखेरची सेवा करावी असा तिचा हेतु होता. विनीतलाही तिची इच्छा अमान्य करवेना.

पुनीत आणि सुनीत अगोदरच निघाले होते. लालाजींनीं पुनीतला काय कानमंत्र द्यायचा तो दिला होता. कारण सुनीतनें आपलें अन्तःकरण एकट्या लालाजींकडेच उघडें केलें होतें. त्यानें आपला सगळा इतिहास त्यांनाच सांगितला होता. कारण पुनीतला कळवितां न येण्यासारख्या त्यांत बऱ्याच गोष्टी होत्या.

लालाजी सर्वांच्या शेवटीं निघाले आणि समारंभाच्या दिवशीं सकाळींच ते कारखान्यांत येऊन दाखल झाले.

प्रेमा तर त्यांच्या आधीं येऊन सुनीतशीं हितगुज करीत बसली होती. तिनें सुनीतला जेव्हां आपल्या अन्तःकरणांत सलणारें तें शल्य—तो त्या रात्रींचा विशिष्ट प्रसंग—सांगितला तेव्हां अगदीं प्रथमच त्यानें तिचे दोन्ही हात धरून तिला आपल्याजवळ बसवीत हंसून म्हटलें, ‘ यांत नवीन काय आहे ? मला रात्रींच समजली ही गोष्ट ! अग वाढत्या वयांतील वासनांचा हा खेळ चालायचाच ! पण संयमनानं स्वतःची शुद्धि करण्याचा प्रयत्न करणं आणि त्यांत सिद्धि मिळविणं हें श्रेष्ठ कर्तव्य तूं बजावलंस याचाच मला आनंद वाटत होता. संयम, अनुताप आणि कबुली हेच पावित्र्याचे खरे मार्ग आहेत! तूं आतां निष्कलंक झालीस. प्रेम हें निर्मल असतं आणि तूं—माझी प्रेमा—म्हणजे निर्मलतेची सजीव मूर्ति आहेस; पण मी तुला योग्य आहे ना ? ’

प्रेमा लाजून अधोमुख झाली. तेवढ्या एकाच प्रश्नानें सुनीत तिला आदर्शपुरुष वाटूं लागला. कारण त्या प्रश्नांतच त्यानें आपल्या पूर्व इतिहासाची कबुली दिली होती. अर्थात् उत्तर देण्याचें तिला कारणच उरलें नव्हतें; पण त्याच वेळीं आंत येणाऱ्या लालाजींनीं तो प्रश्न ऐकून म्हटलें, ' अगदीं योग्य. वधूवरांनीं विवाहाच्या क्षणापूर्वीं आपलीं अन्तःकरणें, संवयी, अपराध, आणि भविष्यकाळच्या आशा एकमेकांसमोर प्रांजलपणानें उघड कराव्या. त्यांत आड-पडदा राहिला तर विवाहानंतर वारंवार ठेंचाळत जाण्याचा प्रसंग येतो. आजकालच्या प्रौढ वधुवरांनीं हा रिवाज, अवश्य पाळला पाहिजे. त्यांत कुणाला भिण्याचं अगर लाजण्याचं मुळींच कारण नाहीं. मंगलाशीर्वादांत सावधगिरीचा इषारा देऊन बाजूला सर-णारा स्वस्तिक चिन्हयुक्त अन्तःपट तो हाच. त्यानंतर प्रेमानं एकमेकांचा हात धरून तोलून, सांभाळून, वाटेंत येणाऱ्या अड-चणी सहकारितेनं बाजूला सारून सत्यलोकाप्रमाणें–व्याहृति-क्रमानें–असणाऱ्या उन्नतीच्या अवघड सात पायऱ्या एकमेकांच्या हृदयाची एकतानता करून कशा ओलांडाव्या हें शिकविणारी तीच सप्तपदी. परस्परांच्या बाबतींत असलेली लाज, संकोच आणि संशय यांचें, त्रिमूर्तिरूप अग्नींत हवन करून डोळ्यांवर येणारा वैयक्तिक अभिमानाचा धुर दूर केल्यावांचून, उन्नतीच्या शिखरा-वर नेणारी ही एकतानता—हृदयैक्यता–निर्माण होत नाहीं; म्हणून सप्तपदीपूर्वीं होम करावा लागतो. समजलं ना माझ्या आवडत्या मुलांनो!'

लालाजींना पहातांच दोघेंही अर्धींच उभीं राहिलीं होतीं. ' मुलांनो ' हे त्यांच्या तोंडचे शब्द ऐकतांच दोघांनाही गहिंवर आला आणि त्यांनीं त्यांच्या पांयावर डोकीं ठेविलीं.

प्रेमाची आई, हेमा, मीना, विनीत आणि पुनीत लालाजींना भेटण्यासाठीं म्हणून आंत येत होतीं; पण गंभीर स्वरानें त्यांचें चाललेलें बोलणें ऐकून तीं दारांतच थबकलीं. विवाहानंतरहि न होणारा तो विवाहाचा खुलासा ऐकून

सर्वांचेच डोळे भरून आले. प्रेमाच्या आईनें तर ‘ असं कोण सांगणारं आहे माझ्या बाळीला!’ असें म्हणून आनंदातिशयानें ओले झालेले डोळे पुसले. पुनीतनें तवढ्यांतच घाई करून बाहेर बसलेल्या वाजंत्र्यांना ‘बजावा’ म्हणून जोरानें सांगितलें आणि त्या मंगलवाद्यांच्या गजरांत, भैरवीच्या मधुर आलापांत ‘सुखी भव. शतं जीव शरदः शतं’ असा लालाजींनीं सद्गदित स्वरानें त्या उभयतांना आशीर्वाद दिला. विनीत आणि हेमा यांच्या मनावर तर या गंभीर दृश्याचा विलक्षणच अनुकूल परिणाम झाला. मीनेलाही आपल्या वडिलांची खरी योग्यता आज कळली. प्रेमाच्या आईचीहि बाह्य समारंभाच्या थाटामाटाची हौस फिटली. अपराधांनीं भारावलेलें आपलें अन्तःकरण जोरजोरानें ओरडून हलकें करावें असें हेमाला वाटलें; पण तिच्यानें तें साहस करवलें नाहीं. आणि सर्वांनाच तें साधत नसतें.

अलौकिक विवाहानंतर चार पुरोहितांनीं सुनीत–प्रेमाचा लौकिक विवाह अगदीं ठराविक मंडळींत आवश्यक कार्यक्रमानें थोडक्यांत आटोपला. कोणाला त्याची विशेष जाणीव झाली नाहीं. बाहेरच्या मंडळींत मीना–विनीताचाच गौरव आणि मिरवणूक चालली होती. निमंत्रित मंडळी जमतांच सुनीतच्या विवाहाची बातमी सांगण्यांत आली. एक गरीब, इस्टेटीला पारखा झालेला, सामान्य नोकर इतकीच त्याची प्रसिद्धि असल्यामुळें चार जुनेपुराणे मित्र वधूवरांचें अभिनंदन करण्याला पुढें झाले; पण वधूकडे पहातांच त्यांचे डोळे दिपले. मगनलालला मुद्दाम वगळण्यांत आलें असलें तरी सायंकाळीं प्रेमाच्या बंगल्यावर त्याला थाटाच्या मेजवानीचें निमंत्रण होतेंच. मीना–विनीतचा गौरव मात्र सर्वत्र चालू होता. कारण मीना ही कारखान्याच्या मालकाची मुलगी आणि विनीत हा प्रख्यात तरुण बॅरिस्टर; मग काय विचारतां! ‘ मिष्टान्नभुक् ’ स्तुतिपाठकांना काय तोटा!!

जेवणानंतर मात्र हा रंग पालटला. मंडपांत उंच व्यासपीठावर लालाजींच्या अध्यक्षतेखालीं पुनीतनें लहानसें भाषण करून प्रथम सुनीत आणि नंतर विनीत यांना हार घातले. नंतर लालाजींच्या सूचनेवरून आधीं दिलेल्या माहितीप्रमाणें बॅरिस्टर विनीत हा भाषण करावयास उभा

राहिला. त्यानें मोठ्या कौशल्यानें सुनीतचें चरित्र थोडक्यांत सांगून तोच कारखान्याचा मालक आहे आणि आज मी, पुनीत व लालाजी यांनीं त्याच्याशीं सहकार्य करून कारखाना वाढविण्याचें ठरविलें आहे. या मुद्यावर विस्तृत भाषण केलें. नंतर समारोप करतांना लालाजींनीं आपल्या गोड भाषेनें कारखान्याची चार वर्षांची प्रगति दाखवून देऊन भविष्यकाळीं कारखान्यांत निर्माण होणारा माल सध्यांच्या राहाणीला किती उपयुक्त आहे हें अनुभवानें पटवून दिलें व अशा कार्याला प्रारंभ करण्याचें श्रेय, सुनीतनें स्वतःच्या आणिबाणीच्या प्रसंगीं कसें घेतलें हें मनोवेधक शब्दांनीं सांगून त्याचें अभिनंदन केलें.

या भाषणानें सुनीतबद्दल लोकमत अत्यंत अनुकूल झालें. आणि सर्वांनीं त्याचा जयजयकार केला. हा जयजयकार ऐकून प्रेमाला किती आनंद झाला असेल याचें निराळें वर्णन करण्याचें कारण नाहीं.

शेवटीं सर्वांचे आभार मानतांना सुनीत म्हणाला, 'मला मिळालेला हा मान माझ्या प्रेरक शक्तीला आणि पुनीतसारख्या प्रेमळ मित्राला देऊन मी आहे तसाच राहातों. कारण सन्मानाची मादकता मला पचत नाहीं, हें मी पूर्वीच ठरवून टाकलें आहे. सर्वांनीं या कारखान्याकडे आपुलकीच्या दृष्टीनें पाहून निमंत्रणाप्रमाणें येण्याचे श्रम घेतले आणि सहभागी होऊन वाढदिवस साजरा केला याबद्दल आभार मानतों. तसेंच यापुढेंहि कारखान्याचें चालकत्व लालासाहेबांनींच पत्करलें आहे असें जाहीर करतों. कारण त्यांच्या निरुपम कौशल्यामुळें कारखान्याची भरभराट झाली हें कोणीहि कबूल करील.'

समारंभ समाप्त झाल्यानंतर मंडळी जातांना 'लग्न कुणाचं' कारखान्यान्याच्या मालकाचं कीं मालकाच्या मुलीचं?' याच प्रश्नाची चर्चा करण्यांत गुंग झाली होती.

इकडे मीना, हेमा आणि प्रेमा यांच्या निराळ्याच गोष्टी चालल्या होत्या. प्रथम एकमेकींचें अभिनंदन आणि गौरव करण्यांत त्यांचा बराच वेळ गेला. शेवटीं हेमा प्रेमाकडे पाहून विनोदानें म्हणाली, 'शेवटीं तूं बोलल्याप्रमाणं केलंस. सुनीतशींच संसार थाटलास! पुढं होणाऱ्या गोष्टी

नकळत बोलल्या जातात हेंच खरं! त्याचं काल्पनिक पत्नीत्व पत्करण्यासहि तूं भ्याली नाहींस. यावरून अतर्क्य शक्तीनं तुझी वरयोजना पूर्वीच निश्चित करून ठेविली होती, असं म्हणावं लागतं.'

मीनेनें विचारलें, 'सुनीतबाबूजींनीं स्वतःला मिळालेल्या मानाचा वाटा आपल्या प्रेरक शक्तीला दिला. ती शक्ति कोणती बरं ?'

हेमानें उत्तर दिलें, 'अग दुसरी कोणती ? हीच. आणि या चंद्र-हारानं हें सगळं घडवून आणलं म्हणून मी तो या शक्तिदेवतेलाच अर्पण करतें.' असें म्हणून पूर्वसंकल्पित चंद्रहार तिनें प्रेमाच्या गळ्यांत घातला.

'शेवटीं मलाच हार होय !' प्रेमा तिच्याकडे पहात म्हणाली. नंतर थोडा वेळ थांबून तिनें हेमाला विचारलें, 'पण माझी ही पसंती आतां तरी तुला आवडली ना !'

'एकदांची तुझी पसंती मला आवडली म्हणून तर हा प्रसंग आला. आतां आणखी यावेळींहि असं काय विचारतेस ?'

हेमाच्या या बोलण्यानें प्रेमाला मागची आठवण झाली. पुनीतची आपली पसंती हेमानं मिळविली हाच त्याचा अर्थ ! पण भूतकालाची आतां आठवणच कशाला असें मनांत आणून प्रेमानें विचारलें, 'तसं बोलूं नको. मनापासून सांग. माझी प्रेमळ पाठराखीण या नात्यानं सांग. मी यांची निवड करण्यांत चुकलें नाहीं ना ?'

प्रेमाच्या या प्रश्नाचें महत्त्व जाणून हेमानें उत्तर दिलें, 'ताई, तूं कांहीं चुकली नाहींस. शिवाय योगायोगानंच न मिळणारं सान्निध्य मिळत असतं हेंहि विसरतां कामा नये; तरी पण मला वाटतं कितीहि तावून सुला-खून पहा. पुरुषांची खरी परिक्षा आणि पसंती ठरते ती ----

विवाहानंतर.'



इटकुली मिटकुली गोष्ट आणि परिणाम झाला इष्ट...' बोलतां बोलतां सुनीतला जोरानें हंसूं आलें आणि अनेक दिवसांनीं आज तो पोटभर हंसला.

प्रेमा तर त्याच्याकडे नुसती पहातच राहिली. हेमाला ही हकीकत समजल्यावर ती काय म्हणेल याचाच ती विचार करीत होती.

तिची ती तशी मुद्रा पाहून सुनीत आपलें हंसें आंवरून म्हणाला, 'तूं नाहीं हंसलीस?'

'मला कशाला हंसूं येईल! बिचाऱ्या मीनेचं कल्याण झालं हीच समाधानाची गोष्ट! मी विचार करतें आहे हेमाचा. तिला आतां काय वाटेल?'

'पुनीत तिला सांगेल, चांगली मनपसंत मुलगी आढळली, सुनीतचा आग्रह पडला, तेव्हां घेतलं उरकून लग्न! आणि विनीत तिला सांगेल, प्रेमाच्या आशेवर उगाच किती दिवस वाट पहात राहायचं? मुलगी दाखवायला आणली, तीच पसंत केली आणि शुभकार्याला विलंब लावूं नये म्हणून घेतलं लग्न उरकून! आतां सुनीतचा मोठा कारखाना आहेच जेवणावळीचे समारंभ उरकायला!! या हकीगतीच्या होतील मग लोक-वार्ता आणि काय हीं अलीकडच्या सुशिक्षितांचीं लग्नं! केव्हां होतात कळत सुद्धां नाहीं! सगळं कांहीं विवाहानंतर कळायचं!!' अशीं बोलणीं ऐकूं-येतील; पण पुनीत आणि तूं यांनाच खरी हकीकत माहीत असणार. मीना तर लग्न झालेली मुलगी! तिला आपल्या नवऱ्याचं पूर्वचरित्र कुणालाही सांगण्याची हिंमत होणार नाहीं. मग विवाहानंतर विवाहा-आधींचं रहस्य कसं कळणार?'

'मी सांगेन सर्वांना!'

'मी नको सांगूं म्हणून सांगितल्यावर?' सुनीत चटकन् बोलून गेला.

प्रेमाला तेवढेच शब्द पुरे झाले. ती हंसून म्हणाली, 'तुम्हीं कोण मला सांगणार? आणि मी कां म्हणून तुमचं ऐकावं?'

'खरंच. तूं काय म्हणून माझं ऐकावं?' सुनीत सचिंत होऊन स्तब्ध राहिला.